श्री: संस्कृति प्रकाशन :

संत शिरोमणि

श्री. मन्मथस्वामी महाराज

कृत

# श्री परम रहस्य

संपादक

डॉ. शि. शि. स्वामी वीरमठ अहमदपूर.

# प्रस्तावना

सोळाव्या शतकांतील वीरशैव संत मन्मथस्वामी यांचे विपूल वाङ्मय मराठवाड्यात उपलब्ध होत आहे. त्यांच्या अभंगाचा गाथा प्रसिद्ध झाला असून त्याच्या तीन अवृत्त्या उपलब्ध आहेत. (१) वीरशैव गुरूकुल, सोलापूर यांनी प्रसिद्ध केलेला "मन्मथ बोधामृत" हा ग्रंथ (२) इ. स. १९६३ मध्ये संस्कृती प्रकाशनाने प्रसिद्ध केलेला शिवसांप्रदायी गाथा आणि (३) काडादी वीरशैव धर्मादाय निधीने इ. स. १९६५ मध्ये प्रसिद्ध केलेला "मन्मथगाथा" त्यांची "अनुभवानंद" व "स्वयंप्रकाश" ही आध्यात्मिक प्रकरणें डॉ. पंडित आवळीकर यांनी प्रसिद्ध केली आहेत. यांचे 'ज्ञानबोध' हे आध्यात्मिक प्रकरण श्री अनिलकुमार बडवे यांनी "इंद्रायणी" मासिकातून नोव्हेंबर १९६३ मध्ये संपादिले आहे. मन्मथस्वामींची "गुरूगीता" श्री शांतितीर्थ संगय्या स्वामी यांनी गतवर्षी मन्मथ पोर्णिमेला (कार्तिक शु. १५ शके १८९५) कपिलधार येथे नगर जिल्हा ऐतिहासिक वस्तुसंग्रहालयाच्या सहकार्याने संपादून प्रसिध्द केली आहे. या गुरूगीतेस पुरस्कार लिहिताना मी मन्मथस्वामींच्या वाङ्मयाचा अभ्यास होणे किती अगत्याचे आहे. यासबधी माझे विचार मांडले होते. त्यांच्या वाङ्मयाच्या संशोधनाचा एक प्रकल्प मराठवाडा विद्यापीठाच्या मराठी विभागाने हाती घेतला असल्याचाही उल्लेख मी केला होता,

"परमरहस्य" हा मन्मथस्वामींचा प्रमुख तत्वविवेचनात्मक ग्रंथ होय. हा ग्रंथ माझे स्नेही डॉ. ष. ब्र. शिवलिंग शिवाचार्य स्वामी, मठाधिपती अहमदपूर, यांनी यापूर्वी इ. स. १९६१ मध्ये प्रसिद्ध केला होता. त्यांनीच परमरहस्याची दुसरी आवृत्तीही संपादिली असून ती या ग्रंथाच्या रूपाने प्रसिद्ध होत आहे, याचा मला आनंद वाटतो. परमरहस्य हा ग्रंथ शके १८०९ मध्ये बार्शी येथील

श्री पारलिंग प्रभु यांनी प्रसिद्ध केला. ( बार्शी प्रत ) शके १८५३ मध्ये लातूर येथील धर्मवीर देशीकेंद्र महाराज यांनी प्रसिद्ध केला. ( लातूर प्रत ) डॉ. शिवलिंग शिवाचार्य यांनी १९६१ मध्ये हा ग्रंथ प्रसिद्ध करताना बार्शी प्रत आणि लातूर प्रत या दोन्ही मुद्रित प्रती बरोबरच त्यांनीं या ग्रंथाच्या पुढील चार हस्तलिखित प्रतींचाही विचार केला १ सूकनो, २ हढोळती, ३, मांजरी ४ बोरी, तसा निर्देश त्यानी परमरहस्यच्या १९६१ मध्यें संपादिलेंल्या प्रतींच्या "हितगुजा" त केला आहे. ६–७ वर्षे या सर्व प्रतींचा घांडोळा घेऊन त्यांनी आपली प्रत प्रसिद्ध केली. यापूर्वींच्या मुद्रित प्रती वपूर्ण असल्याचे त्यांच्या प्रत्ययाला आले होते. आणि म्हणूनच विविध हस्तलिखितांच्या आधारे परमरहस्याची पुर्ण प्रत त्यानी संपादिली. त्या प्रतींतील त्रुटी नष्ट करून त्यानी सदर अवृत्तीचे संपादन केले आहे.

परमरहस्य ह्या मूळ संस्कृत ग्रंथाचा हा मराठी आवतार आहे. या संस्कृत ग्रंथावर आपण प्राकृत भाषेत टीका लिहित आहोत. असे मन्मथस्वामींनी ग्रंथाच्या प्रारंभी व शेवटी म्हटले आहे. त्यातील शेवटच्या अध्यायाला म्हणजे सतराव्या अध्यायाला उल्लेख असा आहे.

कपिलधार पुण्यधाम । तेथेच जालो मी पूर्ण काम
टीका केली सुगम । परमरहस्याची । १७ । ११५ ।
इति श्री परमरहस्य-सारमृत । शिव-गौरी संवादी वर्तत
त्याची टीका करोनी प्राकृत । कृतकृत्य मन्मथ । १७-११६ ।

टीकेसाठी परमरहस्य या ग्रंथाचीच निवड का केली याचे कारण सांगताना मन्मथस्वामी म्हणतात –

ह्या परमरहस्य ग्रंथ परिकर । वीरशैव धर्माचे बीजांकुर
भावे करिता रक्षण साचार । रक्षी शंकर तयाते । १६-११२ ।

हा ग्रंथ म्हणजे "वीरशैव धर्माचे बीजांकुर" होय. या शब्दांत स्वामींनी त्याचे महत्व विशद केलें आहे. शिव हे अंतिम सत्य असून ते वस्तुत: निर्गुण, निराकार आहे. वेदांनाही अगम्य असलेल्या ह्या तत्वाचे भक्तांना आकलन व्हावे. या साठी शिव गुरूरुपाने भक्तांना तारतो, या त्वाचेवितश आकलन या परमरहस्य नामक ग्रंथाच्या द्वारा भक्तांना व्हावे

म्हणून परमरहस्य यावर टीका करण्याचा आदेश आपणास मिळाला असे स्वामी म्हणतात. –

तुज रुप ना रेखा ना नाम । आम्ही भक्ती धरोनी ठेविले नाम
ए-हवी वेदशास्त्रासी अगम्य । अगोचर तु ॥
परि भक्तिलागी अकारलासी । गुरूरुप होऊनि तारिसी भक्तासी
म्हणोनी अज्ञापी परमरहस्यासीं । टीका करावया ॥ १ १७-१८।

ही टीका करताना मन्मथस्वामी विनयाने म्हणतात की ही कांही व्युत्पन्न कवि नाही किंवा तत्वज्ञही नाही. केवळ शिवकृपेनेच मी हें लेखन करीत आहे. –

मी तव नेणे विवेक - प्रबोध् । बोलो नेणे साहित्य संगीत शब्दु
येथे कृपादृष्टी पाहोनी प्रबंध् । चालवा स्वामीं । १ - १०
तुमचिया वरदाने ग्रंथ पूर्णपणी । निर्मिन आता । १ - २३ ।

आणि म्हणूनच या निर्मितीचे श्रेय ते तुकोबा प्रमाणे स्वतःकडे घेत नाही. "मज विश्वंभर बोलवितो" असे तुकोबा म्हणतात. तर "वक्ता येथे विश्वनाथ" ( १ – २४ ) किंवा मन्मथ शिवलिंग म्हणे । मज वदविले स्वामीनें ७ – १०२ या शब्दांतही मन्मथस्वामीं पण तीच भूमिका व्यक्त करतात. हे ग्रंथकर्तृत्व आपले नव्हेच, जगन्नियंत्याचेच ते कर्तृत्व आहे तेव्हा त्याचे बरेवाईट श्रेयही आपले नव्हेच. जणु आपल्या निमित्याने शिवच ग्रथ निर्मितो करित आहे. जणू त्यांच्या स्वार्थासाठीच तो हे सारे करित आहे, तेव्हा मी उगीच 'कुंथाकुंथी' का करावी, असे मोठ्या सूचकतेने म्हणत असतानाही आपली ही परमरहस्य टीका कशी समर्थपणे सिद्ध होणार आहे या विषयीचा आत्मविश्वासच ते एका परिने व्यक्त करतात. असे म्हणण्यास हरकत नाही.

मी परिहार कासया देऊ आता । तुमचे तुम्ही बोलवा ग्रंथा
टीका करवाल आपुलिया स्वार्था । मज कुंथाकुंथी कायसी ?
ग्रंथ संवाद शिव - गौरीचा । ठेवा तुम्हा शिवगणाचा
यालागी बोलवाल वाचा । आपुलिया सुखालागी । १ - ३१ - ३२ ।

या संपूर्ण ग्रंथाची पार्श्वभूमि शिव – गौरी संवादाची आहे. यामुळे तत्वविवेचन असूनही एका प्रसंगाची बैठकही ग्रंथास लाभली आहे. श्रीकृष्ण आणि अर्जुन यांच्या संवादाची बैठक जशी गीतेस लाभली तद्वतच येथे शिव – गौरी संवादाची बैठक परमरहस्यास लाभली आहे. पार्वतीने उपस्थित केलेल्या प्रश्नांचीं उत्तरे शिवानी दिली आहेत. एका अर्थाने ब्रह्मजिज्ञासा आणि तिचे समाधान वा तृप्ती अशा प्रकारचेच ह्या रचनेचे स्वरुप आहे. त्यामुळे विश्वामागील रहस्य परमरहस्य कोणते हा या ग्रंथांतील विवेचनाचा केंद्रबिंदू आहे. खरे म्हणजे साऱ्या अध्यात्माचाच तो केंद्रबिंदू आहे. विविध धर्मांच्या निर्मितीमागील ती शाश्वत प्रेरणा आहे. ज्या प्रेरणेने विविध धर्मप्रवर्तकांना अंतर्मूख केले. विचार प्रवण केले. आणि खऱ्या अर्थाने ' अस्वस्थ ' केले ती ही प्रेरणा होय. विविध धर्मामधील हे अंतःसूत्र आहें. या स्नेहसूत्राने हे सारे धर्म बांधले गेले आहेंत. हा विचार जेव्हा आपण करु लागतो त्यावेळी धर्माधर्मांतील भेदभाव नष्ट होतात. व ज्या ज्या धर्मप्रर्वतकांनी मानव मात्राच्या कल्याणासाठी ह्या परमरहस्याचा शोध घेतला. त्यांच्या बिषयीच्या आदराने आपण नतमस्तक होतो.

मन्मथस्वामींनी आपल्या या ग्रंथात या परमरहस्याचा उलगडा क्रमाक्रमान केला आहें. सतरा अध्यायाच्या या रचनेतही क्रमबद्धता जाणवते. प्रत्येक अध्यायात ज्या विषयाचे विवेचन केले आहें. तो अध्याय स्वतंत्रपणे वाचताना स्वयंपूर्ण वाटतो. त्याचप्रमाणे इतर अध्यायाबरोबर वाचताना त्याचे इतर अध्यायाशी आलेले नातेही आपणास जाणवते, अशा प्रकारे हें सतरा अध्यायही एकमेकाशी अंतःसूत्राने बांधले आहेंत. आणि त्यातून स्वामींना ज्या परमरहस्याचा बोध करावयाचा आहें. ते परमरहस्य उलगडत गेले आहें. विचारांची संगती व त्यातील युक्तीसंगतता हें भाष्यग्रंथाचे एक महत्वाचे वैशिष्ट्य या ग्रंथातही जाणवल्यावाचून राहात नाही. साधकांच्या मनांत ज्या ज्या शंका निर्माण होतात, त्या शंका म्हणजेच येथे पार्वतीने विचारलेले प्रश्न होत. या प्रश्नाची उत्तरे शिवाने दिली आहेंत.या ग्रंथातील पहिले सोळा अध्याय म्हणजे शिवचंद्राच्या सोळा कळा होत. व सतरावा अध्याय सतरावी कळाही जीवन कळा होय. असे कवी म्हणतो. –

शिवचंद्राच्या ह्या सोळा कळा। भवदुःख तप्तजीवा निववितो सकळा
ही सतरावी जीवनकळा । अक्षय असे निश्चये । १७ - ३ ।

" शिव " आणि " चंद्र " यांचे साहचर्य लक्षात घेता शिवाने दिलेली उत्तरे हीच या सोळा कळांच्या अध्यायाच्या रुपाने प्रकट झाली आहेत. यातील मर्म लक्षात येते. पहिल्या अध्यायात ' भक्ती ' म्हणजे काय ' मुक्ती ' म्हणजे काय ' ज्ञान ' म्हणजे काय व ' विज्ञान ' म्हणजे काय तसेच ' धर्म ' म्हणजे काय व ' कर्म ' म्हणजे काय यासारख्या साधकाच्या मनात निर्माण झालेल्या विविध प्रश्नांचा विचार केला असून सोळाव्या अध्यायात " शिवधर्म भूमंडळी कसा उत्पन्न झाला ? " या विषयी विवरण केले आहे. आणि या धर्माचा संस्कार ' वीरशैव संस्कार ' करुन घेण्यातच साधकास आपले उद्दिष्ट कसे साधता येते याचा विचार सतराव्या अध्यायात केला आहे. साधकांच्या मनांतील शंका व त्यांचे निरसन करुन त्याला अंतिम सुख प्राप्त करण्यासाठी सांगीतलेला उपाय परमरहस्य व त्याच्या प्राप्तीचा मार्ग—असे ग्रंथाचे स्वरुप आहे. एका अर्थाने लौकिकापासून पारलौकिकापर्यंत केलेला अपूर्व प्रवास आहे. खऱ्या ' वीरशैवा ' ने खऱ्या भक्ताने हा प्रवास केला पाहिजे. त्यातच त्याचे हित आहें. ही प्रेरणा सामान्य माणसाला मिळावी, हें या ग्रंथाच्या निर्मितीमधील प्रयोजन आहें. जनहिताची कळकळ ही त्याची बैठक आहें. अध्यात्मिक उद्‌बोधन ही ग्रंथामागील प्रमुख प्रेरणा आहें.

सामान्य मानवाचे संसार सुख हें साध्य असते. ते लाभले की सर्व मिळाले, असे त्याला वाटते. –

भुक्ती जे बोलिजे । अन्न - धन - संसारसुख जें ।
ते सद्युन्भुक्ती जाणिजे । देता मी ईश्वरू । १–४४ ।

पण ही भुक्ती म्हणजेच कांही जीवनाचे सारसर्वस्व नव्हें. भुक्ती पेक्षा मुक्ति ही श्रेष्ट आहें. ह्या मुक्तिचे स्वरुप कसे आहें. ? –

निर्गुण पाचवी सायूज्यता जाणिजे । तेणे स्वये परब्रम्ह होईजें
देह असता जाता अखंड असिजे । वस्तुचि आपण । १–४६ ।

मुक्तीचा अपूर्व अनुभव मन्मथस्वामी पुढील प्रतिमेच्या द्वारे साकार करतात. –

तरंग क्षीरसागरीचा । भंगता न भंगे सागरूचि साचा
तेवि देह भंगता न भंगे ब्रम्हीचा । ब्रम्ह पुतळाचि तो । १-४७ ।

पिंड – ब्रम्हांडातील नाते जाणवले की 'स्वरूप' कळते. हे निजतत्व म्हणजेच 'विज्ञान' होय. विज्ञानात ज्ञानाची जाणीवही निमालेली असते. 'सोऽहं' पदाची प्राप्ती झाल्यानंतर ज्ञानाची जाणीवतरी कशी उरणार? ज्ञान आणि विज्ञान यातील भेद हा असा आहे. विज्ञान हे या संदर्भात ज्ञानापेक्षाही श्रेष्ट आहे. असे मन्मथस्वामी म्हणतात 'विज्ञाना' चे हे स्वरूप त्यानी फारच सुस्पष्टपणें चित्रित केले आहे.

पिंड - ब्रम्हांडीचा आणोनि झाडा । सत्‌चिदानंदाचा निवाडा
करोनि जाणिजे निजतत्व पुडा । त्या नांव विज्ञान
जाणोनी तेची होईजे । जालेपणाचा आठव आटिजे
जाणीव ज्ञानाची मग निमे सहजे । विज्ञान तेचि जाण । १ –४९ ।

'कर्म' आणि 'धर्म' यांचे स्वरुपही त्यांनी स्पष्ट केले आहे. निष्काम कर्म हेच श्रेष्ट कर्म असे म्हणतात (१–५२) "अधर्माची शीग निमे । तोची धर्म" (१–५१) अशी ते धर्माची व्याख्या करतात.

भुक्ति व मुक्ति कर्म व धर्म ज्ञान व विज्ञान यातील भेद गुरूकृपेने कळतो. ज्ञानांजन लावून गुरू अज्ञानांधःकार नष्ट करतो. त्याच्यामुळेच ज्ञानचक्षु प्रकाशतो, (१–६८) जेव्हा संसाररुपी अरण्यात अऽहंभ्रांतीने आपली दिशाभूल होते. आणि कामक्रोधरुपी सिंह-व्याघ्र आपल्याला ग्रासतात, तेव्हा या गुरूच्या कृपेनेच त्या श्वापदांचा विनाश होतो. असा हा गुरू "शुद्ध शोधुन सुपंथी लावतो" (१ – ६९ - ७०) म्हणून गुरूस शरण जावयास हवे. गुरूमुळे 'शिवयोग' प्राप्त होतो, असे सद्‌गुरू महात्म्य स्वामींनी आपल्या ग्रंथाच्या पहिल्याच अध्यायात प्रतिपादिले आहे. गुरूचे विशेष महत्व यासाठी जाणवते की, त्यांच्यामुळे जो अखंड मंडळाकार । ती व्यापुनी असे चराचर । ते पद दाखवी निरंतर तया सदगुरूसी नमो नमो। एवढेच नव्हे तर "गुरूपरता नाही देव" असे त्यांनी म्हणून टाकले आहे.

गुरूतीर्थाचे माहात्याही त्यांनी दुसऱ्या अध्यायात सविस्तर वर्णिले आहे. तथापी ज्या गुरूचे माहात्म्य वर्णिले आहे, तो केवळ 'गुरू' नाही तर तो 'सद्‌गुरू' आहे हे लक्षात घ्यावयास हवे.

"धर्म अधर्मी करी विवेक। पादपूजा कीजे त्याची ( २–६६। ) जो सुशिल, शांत, भाविक आणि नित्य साधक आहे अशाच गुरूस सद्‌गुरू म्हणता येईल. क्रोधी, द्वेषी, तामसी, जंगमद्रोही आहे. त्यास सद्‌गुरू कसे म्हणता येईल.? कांही अयोग्य गूरूमुळे समाजाची अवनती होते, बुवाबाजीस प्रारंभ होतो. म्हणून गुरू हा सद्‌गुरू आहें की नाही हें परखून घ्यायाला हवे, ही महत्वाची सूचनाही स्वामींनी दिली आहें. म्हणून ते म्हणतात. –

जो तीर्थ प्रसादाचा भेद जाणे। वीरशैव तयासीच म्हणणे
येर ते हिंडतीं पोटा कारणे। भाट नागर जैसे ते
तीर्थ करावे जयाचे। शुद्ध सर्वांग असावे तयाचे
तीर्थ न करावे अंगहीनाचे। ऐसे शास्त्र वदलसे । २ - ५५८।

तिसऱ्या अध्यायात 'वीरशैव' ची लक्षणे आहेंत, ती साधकांच्या दृष्टीने महत्वाची वाटतात. परमरहस्यातील एकूण विवेचनातच हा भाग विशेष महत्वाचा आहें, असे म्हटल्यास ते अनुचित ठरणार नाही. वीरशैवाची लक्षणे मांगण्याच्या निमित्याने " अदर्श साधक कसा असावा " याचेच जणू चित्र मन्मथस्वामींनी रेखाटले आहें. शिवाचेच प्रतिक असे जे लिंग, त्याच्याबाचून जगणे ही गोष्ट वीरशैवास कधीच सहन होत नाही. वीरशैव नोहें पोटेवाईक (३–१८) शिवधर्माची निंदा त्यास सहन होत नाही. –

अलिंगी अथवा लिंगधारी। जो शिवधर्माची निंदा करी
त्याचे मुख न पाहे कांतारी। तो वीरशैव जाणावा । ३–३५।
ज्ञान वैराग्य मिळे क्रियेसी। राखे तोची वीरशैव जाणावा ।३–४५।

वीरशैवाचे विचार व आचार शुद्ध असतात. ज्ञानी आणि आणि अज्ञानी पुरुषाचो लक्षणे वर्णन करित असताना ज्ञानदेवानी 'ज्ञानेश्वरी' च्या तेराव्या व सोळाव्या अध्यायात जे विवेचन केले आहे, त्याचे स्मरण या ठिकाणी झाल्यावाचून राहात नाही. आदर्श 'वीरशैव' कसा असावा

हे सांगताना मन्मथस्वामींनी त्याचे व्यक्तिचित्र पुढील शब्दांत रेखाटले आहे.—

अशा धरोनि बोधिना । पूजा मान इच्छिना
परस्त्रिस पाहिना । कामदृष्टी कदा । ५६ ।

जीव-हिंसा करीना । शब्दे कोणासी दुखविना
भुवाई उचलिना । कोणावरी । ५७ ।

जयाचे नांव विरक्त । तो कासयासी नोव्हे लिप्त
श्वान वमन मानित । भोग विलास सर्व ते । ५८ ।

तयासी लोह कांचन । गारा आणि समरत्न
मान अपमान समान । आनंद भरित सर्वदा । ५९ ।

या वीरशैवास जाणिवेचा तोरा नाही की क्रियेचा उबारा नाही. तो खरा 'शिवयोगी' च असतो. ( ३-६३ ) तो सदाशिव स्वरुप झालेला असतो. आणि म्हणूनच शिवासी तादात्म्य पावल्याच्या एका अपूर्व अवस्थेत अनुभव तो घेत असतो. त्याचे वर्णन स्वामींनी अत्यंत मोजक्या व रेखीव शब्दांत केले आहे. —

बाह्य अभ्यांतरी अवघाची । कोंदाटल परब्रह्म तोची । ३७-६ ।

असा गुरु असेल तर त्याला "मानव" तरी कां म्हणावयाचे ( "गुरू न म्हणावा मानव" (३-१०६) असा सद्गुरू लाभला की आपणही ब्रह्मरुप होतो. —

म्हणोनि गुरू परब्रह्म भाविजे । मग आपणही ब्रम्ह होईजे
श्रीगुरू निजवस्तू जाणिजें । सेवा किजे सद्भावे । ३ – १०७ ।

चवथ्या अध्यायात "बंधमोक्षा" ची स्थिती व रीती कशी असते, याचे विवेचन केले आहे. सहाव्या अध्यायात "सद्गुरू" नाथाचे स्वरुप वर्णिले आहें. सद्गुरू हाच उद्धारकर्ता असल्याने "मनुष्य म्हणू नये तयाला । परब्रह्म तो ( ५-३५ ) असे त्याचे वर्णन स्वामी करतात, याच संदर्भात त्यांचे गुरुदेव महादेव । उभयी नसे भेदभाव (२-५१) हें वचनही लक्षात घेण्याजोगे आहे. स्वामींनी वर्णिलेला गुरू हा सद्गुरू आहें, हें

लक्षात घ्यावयास हवे. धर्माच्या क्षेत्रात बुवाबाजी होउ नये, यासाठीही स्वामींनी काही विचार प्रखरपणे मांडले आहे. –

एक गुरू एक लिंग एक प्रसाद । एकरुपी तेथे खंडला भेद
दुसरे नास्ति म्हणोनि मोक्षपद । अभंग वो वरानने । ५ – १०७ ।

तसेच –

भिन्न गुरू असता जाण । भिन्नाचारे वर्ते मन
तेथे स्त्री-पुरुषा सौजन्य । कदाकाळी असेना । ५–१०९ ।

कारण यामुळेच – - -

दोन भाव दोन भक्ती । भिन्नाचारे उत्पन्न होती । ६–२१० ।

सहाव्या अध्यायात "प्रकृतिकाया ?" आणि "ज्ञानकाया" यांचे स्वरुप स्पष्ट करुन त्या दोहोंतील भेद वर्णिला आहे. प्रकृतिकायेत अविद्या असते. गुरूनें ज्ञानामुळे या अविद्येचा विनाश होऊन तिचे "ज्ञानकायेत" रुपांतर होते. ज्याला ही ज्ञानकाया प्राप्त होते, तो जन्म–मृत्यू आणि दिक्काल यांच्याही पलीकडे जातो. दिक्कालातीत अशा अवस्थेचा अनुभव त्यास प्राप्त होतो. एका अर्थाने ही मुक्ती अवस्था असते. या अवस्थेचे वर्णन सहाव्या अध्यायाच्या २७ ते ३१ ओव्यात केले आहे, ते लक्षात घेण्याजोगे वाटते. षडाक्षरी मंत्राचे महत्वही या अध्यायाच्या उत्तरार्धात विषद केले आहे,

"वस्तू" ही संज्ञा वारकरी सांप्रदायासारख्य महाराष्ट्रातील अन्य सांप्रदायातील संतांनीही 'परतत्वा' साठी योजिली आहे. ह्या अगम्य कळेचे साधकास ज्ञान होणे अवश्य आहे. सातव्या अध्यायात या वस्तूचे विवरण केले आहे. तर आठव्या अध्यायात 'स्थावर' व 'जंगम' यासंबंधी विवेचन करीत असताना लिंग, देह प्राण हे एकमेकामध्ये कसे 'मिश्रित' झाले आहें, ते सांगितले आहेत. –

जैसा प्राण लिंगसिद्ध झाला । तो सर्वेंद्रिय व्यापूनि राहिला
व्याप्य व्यापकत्वे देही भरला । जळी अग्नीसम पै

जैसे जळ उष्ण होय अग्नीसंगे । तैसे देहमिश्रित लिंगार्चनयोगे
प्राण तरी सहज अंगे । एकचि असे । ८-४-५ ।

जीवात्मा आणि परमात्मा यातील परस्परसंबंध पुढील ओवीत स्पष्ट केला आहे. –

ऐसी ज्याची सर्व संबंधे तुटली । त्याची लिंगकळेसी बुद्धी बाधली
तया प्राणलिंग पदवी आली । तो अंश होय माझाची । ८ – ७ ।

लिंग हे वस्तुतः एकच, केवळ त्यात नामभेद आहे असे म्हणून जंगमाचे महत्व विशद केले आहे. –

जैसे पुष्प परिमळात । कि परिमळ पुष्पांत
भेद नाही येरयरात । तेवी लिंग जंगमी । १०-६ ।

पण योग्य पुरुषास जंगमपद मिळाले नाही तर धर्म भ्रष्ट होण्याची शक्यता असते म्हणूनच –

जंगमवेश देउनि हूड । न मिरवावा सिंहासनी
तेणे होय धर्म भ्रष्ट । पापे अचरति अरिष्ट
तयासंगे शिष्यश्रेष्ट । श्रद्धा त्यागिती धर्ममार्गी । १०-३६ ।

सर्व बाबतीत "शुचित्व" हे जंगमाच्या व्यक्तिमत्वाचे लक्षणीय वैशिष्टय होय, असे स्वामींना वाटते म्हणूनच ज्ञानदेवाप्रमाणेच नव्हें कांही अंशी ज्ञानोबाच्या भाषेतच ते म्हणतात. –

अंतरी ज्ञाने शुद्ध झाला । बाहेरी क्रियेने क्षाळीला
शुद्ध शुचित्व बोलिला । शिवाचारा संपन्न तो । १-१२७ ।

जंगमाने विवेकाचा दंड धारण करावा, विकारांच्या पशुचे निवारण करावे आणि परमत्वाची खापरी हेच आपले परम भूषण म्हणून मिरवावे ( १०-१३० ) कुंभाराच्या चाकाखालील खुंटा जसा अढळ असतो तसे त्यांनें विकाराच्या बाबतीत अढळ, निश्चल असावयास हवे. ( १०१४५ )

वीरशैव मतातील अत्यंत महत्वाच्या अशा "षट्स्थल" सिद्धांताचे विवरण बाराव्या व त्या पुढील कांही अध्यायात केले आहे. जीवाचे सार्थक

करण्यासाठी साधकाने 'अंतिम सत्या' स व जंगमास शरण जावे आत्मोन्नतीचे साधन करावे. असे पंधराव्या अध्यायात सांगितले आहे. सोळाव्या अध्यायात 'शिवधर्मा' चा प्रसार बसवेश्वरांच्या पूर्वी पासून कसकसा होत गेला आणि विविध आचार्यांनी त्याचा वेलविस्तार कसा केला याबद्दल विवेचन केले आहे. त्यात पंच आचार्यांचीही माहिती दिली आहे, त्यामुळे वीरशैव धर्माच्या परंपरे विषयीची सप्रमाण माहिती उपलब्ध झाली आहें. एका परीने वीरशैव धर्मांच्या उद्भाविषयी आणि विकासाविषयी अलेखच या अध्यायात रेखाटला आहे. त्याचे सार पुढील ओवीत सांगता येईल. –

ऐसी शिवाचार दीक्षा जाण । पंचाचार्य करिती सपन्न
शिवाचाराते स्थापून । जना भक्ति लाविती । १७–४७ ।

चंद्राच्या सोळा कळांप्रमाणे परमरहस्याचे हें सोळा अध्याय आहेत. जणू शिव चंद्राच्याच या सोळा कळा होत, असे मन्मथस्वामी म्हणतात. शेवटच्या म्हणजे सतराव्या अध्यायात वीरशैव धर्माच्या संस्कारां विषयी व आचार धर्माविषयीची माहिती सांगितली आहे.

अशा प्रकारे 'परमरहस्य' या ग्रंथात वीरशैव धर्माच्या तत्त्वज्ञानाचे आचार धर्माचे पूर्वपीठिकेचे आणि विकासाचे सुस्पष्ट प्रतिबिंब उमटले आहें.

मन्मथस्वामींच्या सांप्रदायासंबंधी व परंपरेसंबधी कांही वाद आहेत. आपल्या सांप्रदायाविषयी व परंपरेविषयी स्वामींनी परमरहस्याच्या सतराव्या अध्यायाच्या शेवटी पुढील उल्लेख केला आहें. तो संशोधकांना उपयुक्त वाटेल.

हा ग्रंथ तरी ईश्वरमुखीचा । ईश्वर तोचि नागेश साचा
भिन्न भेद म्हणता वाचा । दुखंड होय
तोचि तो अवतरोन । नागेश नामाभिधान
मिरवे एवढीयाने म्हणून । भेद जाहला कायी । १७-९७-९८ :
यालागी शिव तोचि नागेश्वरु । तोचि बसवराज श्रीगुरू
माण्रपट्टसिंहासनाधिकारू । असे जयासी । १७–१२२ ।

वीरशैवधर्म, नागेशसांप्रदाय आणि मन्मथस्वामी यांचे अन्योन्यसंबंधी

कोणते, हा एक महत्वाचा शोध-विषय आहे. मन्मथस्वामींच्या या व अन्य ग्रंथांच्या आधारे त्याचा शोध घ्यावयास हवा.

" परमरहस्य " हा एक टीका-ग्रंथ किंवा भाष्यग्रंथ आहे, अशी भूमिका मन्मथस्वामींनी ठिकठिकाणी व्यक्त केली आहे. यातील सतरा अध्यायांचा परस्परांशी एक अनुबंध आहे. त्या सर्वांत एक अंतःसूत्र आहे. तत्वविवरणाचा प्रवाह वाहत असल्याचा प्रत्यय प्रत्येक अध्याय वाचत असताना आपल्याला येतो. मूळ ग्रंथ व त्यातील टीका यांचा म्हणजे मूळ श्लोकांची संख्या व टीकेच्या ओव्यांची संख्या यांचा विचार केला असता भाष्यकार या नात्याने स्वामींच्या स्वतंत्र विवरणाची कल्पना येईल.

| अध्याय | मूळ श्लोक | ओव्या ( टीका ) |
| --- | --- | --- |
| १ | २२ | ९७ |
| २ | ६ | ७३ |
| ३ | ४ | ११५ |
| ४ | ४ | ८६ |
| ५ | २७ | १३५ |

यावरुन इतर अध्यायांची कल्पना येईल. म्हणून तो तपशील देत नाही. मन्मथस्वामींच्या या भाष्यलेखनासही अनेक ठिकाणी काव्यात्मता प्राप्त होते. ( अर्थात या लेखनामागील प्रमुख प्रेरणा तत्वविवरणाची आहे हें मात्र येथे नाकारता येणार नाही. )

गुरू आणि शिष्य यांच्यामधील अभेदाचे वर्णन स्वामींनी या शब्दांत केले आहे. –

कीटकभृङ्गीवैरध्याने । तात्काळ भृङगचि होणे
मा शिष्य तरी सद्‌भावध्याने । गुरूरुप केवि नव्हिजे ?

प्रकृतिकायेचे ज्ञानकायेत रुपांतर व्हावयास हवे. हे सांगताना वनाचे रुपांतर शेतात कसे होते, याचा मार्मिक दाखला ते देतात. हें वनपण गेले की

त्या वनाचा कायापालट होतो याचे सुन्दर शब्दचित्र स्वामींनी सहाव्या अध्यायातील १४ पासून १९ पर्यन्तच्या ओव्यांत रेखाटले आहे.

वस्तुचे यथार्थ स्वरुप आत्मज्ञानामुळे साधकाच्या प्रत्ययास येते. ही कल्पना स्पष्ट करताना स्वामी म्हणतात. –

जैसा कुंडामाजी असेअग्न । घृतधारा पडता तो हुताशन । दैदिप्यमान होय
जरि कुंडामाजी अग्नी नसे । तरी घृते रक्षा काय प्रकाशे
असे म्हणोनिचि प्रकाशतसे । घृतधारेसरिसा । ८ – ८-९ ।

ज्ञान्याला सर्वच 'वस्तू' चा प्रत्यय कसा येतो. "पिंडी ते ब्रम्हांडी" याचा अनुभव त्यास कसा येतो, हा अनुभव खरे तर 'अगोचर' च, पण त्या 'अरूप' अनुभवास स्वामींनी कसे रुप दिले आहें ते पाहा. –

म्हणोनी काष्टि जेवि अग्नी असे । की घृत क्षीरामाजी वसे
तेवि वस्तू सर्व देही दिसे । ज्ञानियासी
जेवि तिळामाजी तैल । की पुष्पी असे परिमळ
तेवि वस्तूकळा सकळ । व्याप्त असे साकारी । ७ – २०-२१ ।

या सर्वच लेखनातून मन्मथस्वामींनी एका आदर्श साधकाचे चित्र रेखाटले आहें. त्याच्या आचार – विचारांचा आलेख रेखाटला आहें. आदर्श "वीरशैवा" चे स्वरुपदर्शन घडविले आहें. साधनेत गुरूचे मार्गदर्शन त्यास कसे लाभते हेंही त्यांनी स्पष्ट कले आहे. साधकांची साधना पूर्ण झाल्यनंतर त्याला कोणते 'परमरहस्य' कळणार आहें. याचेही विवरण त्यांनी केले आहे. त्यांना जे वीरशैवमत अभिप्रेत आहे, त्याचा पुरस्कार करुन वीरशैव धर्माचा वेलविस्तार कसा झाला याचेही ग्रंथाच्या शेवटी विवरण केले आहें. वीरशैव मतासंबंधी व वीरशैव-धर्मासंबंधीचे महत्वाचे असे सारे विवेचन या ग्रंथात साररूपाने आले आहें, असे म्हटल्यास अतिशयोक्ती होणार नाही, असे वाटते.

हा ग्रंथ मुख्यत्वेकरुन तत्त्वविवरणात्मक असल्याने स्वामीची प्रधान भूमिका ही भाष्यकाराची आहे, कवीची नाही. असे असूनही त्यांच्या कवीत्वाचा प्रत्ययही या ग्रंथात जागोजाग आल्याविना राहात नाही.

अशा या महत्वाच्या ग्रंथाचे संपादन डॉ. शिवलिंग शिवाचार्य स्वामी यांनी केले आहें, याबद्दल मराठी वाङमयाचे अभ्यासक त्यांच्या या प्रयत्नाचे स्वागतच करतील. ग्रंथाच्या मुद्रणात कांही दोष आहेंत, ते पुढील अवृतीत काढून टाकता येतील. शब्द तोडताना – जोडतानाही कांही चुका झाल्या त्याही दुरुस्त कराव्या लागतील. पोथीचे संपादन करताना जुन्या हस्तलिखित प्रतींतील जुनी शब्दरुपे कायम ठेवल्यास तत्कालीन भाषेचे स्वरुपदर्शन घडण्यासही साहाय्य होते. याचाही विचार संपादन करताना व्हावयास हवा. या व अशा प्रकारच्या कांही सूचना देणे अगत्याचे आहे. मन्मथस्वामींचा हा महत्वपूर्ण ग्रथ सपादून प्रसिद्ध केल्याबद्दल मी डॉ. शिवलिंग शिवाचार्य स्वामी यांना हार्दिक धन्यवाद देतो व त्यांच्या हातून अशाच प्रकारचें वीरशैव साहित्य प्रकाशात येवो, अशी अपेक्षा व्यक्त करतो. असे साहित्य प्रकाशात आल्याने वीरशैव साहित्याचें संशोधन–अध्ययन होण्यास वाव मिळेल, व मराठी साहित्यातील एका महत्वाच्या दालनावर प्रकाश पडेल, असा मला विश्वास वाटतो.

मराठी विभाग
मराठवाडा विद्यापीठ,
औरंगाबाद.

यू. म. पठाण

दिनांक : १५ एप्रिल ११७४

सत्यं शिवं सुंदरम्



श्री ष. ब्र. १०८ डॉ. शिवलिंग शिवाचार्य महाराज

वीरमठ संस्थान, अहमदपूर, जि. उस्मानाबाद.

# प्रथम हे वाचा

| पृ. | ओळ | अशूद्ध | शूद्ध |
|---|---|---|---|
| २ | १० | शिवचारासी | शिवाचारासी |
| १५ | | प्राणिपात | प्रणिपात |
| ३४ | १७ | उक्षया | उभया |
| ३९ | ७ | तो | ते |
| ४१ | १३ | धुरधरं | धुरंधर |
| ४२ | ७ | उभय | उभया |
| ४७ | २ | दआवा | देआवा |
| ४७ | १७ | निर्धार | निर्धारी |
| ५३ | ७ | करोत | करीन |
| ६९ | ८ | एक | ऐक |
| ६९ | २१ | कष्टासी | काष्टासी |
| ९८ | १८ | भक्ता | भक्त |
| १०० | १ | अकाषत | अकर्षित |
| ११४ | ८ | वास ना | वासना |
| ११६ | ५ | कल्पानिक | काल्पनिक |
| १५५ | ९ | एक्ये | ऐक्य |
| १५७ | १३ | प्रमादि | प्रसादि |
| १५८ | १ | एकताचि | ऐकत चि |
| १५९ | ८ | जगम | जंगम |
| १६६ | १३ | हाय | होय |
| १७८ | ३ | भोक्तव्ययता | भोक्तव्यता |

| पृ. | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| १८९ | १९ | चाल | चाले |
| १९२ | २ | पाताळ | पातळ |
| १९६ | १३ | आठ्वी | आठवी |
| २०२ | १५ | अतौतता | अतौता |
| २०५ | ८ | विचा: | विचारे |
| २१९ | ३ | जंग | जंगम |
| २२५ | १० | हेओनि | होओनि |
| २४० | ४ | शरणा | शरण |
| १६१ | १३ | दाईजे | देईजे |
| १६४ | ९ | संस्मृतिचीत्री | संसृतिची |
| ९१ | १६ | प्रियचि | प्रियाची |
| १६१ | ११ | दाईजे दाविजे | देईजे |
| १६४ | ६ | सस्मतिची | संसृतीची |
| १६५ | ३ | बृद्धी ची | बुद्धिचि |
| १९९ | १ | प्रवेशितसे | प्रवेशतसे |

श्री संत शिरोमणी मन्मथ स्वामी महाराज श्री क्षेत्र कपीलाधार





माउलीचि प्रथम तपोभूर्म

शिवकडा

## हृद्‌गत

श्री परमरहस्याची पहिली आवृत्तीं लहान आकारामध्ये आम्ही १९६२ मधे प्रसिद्ध केली होती, त्यांत लिहीलेल्या प्रस्तावनेत नमूद केल्या प्रमाणें बऱ्याच उणीवा राहिल्या होत्या त्या आता मूळ हडोळती प्रतीच्या अधारे दुर करण्यांत आल्या आहेत. वरील प्रकाशनाच्यावेळी ज्या प्रती उपलब्ध होत्या त्या-शिवाय यावेळी एक आधिक प्रत उपलब्ध झाली असली तरी ती अपुर्णं आणि अत्यंत अशुद्ध असल्यामुळे तीचा कांहींही उपयोग होवु शकला नाही.

संत शिरोमणी श्री मन्मथ माऊलीची विपुल काव्य संपदा असल्याचे निद-र्शनांत येत आहे, आम्ही त्याविषयी प्रयत्नशील आहोत आमचा विचार त्यांचे तसेच त्यांच्या परंपरेतील संताचे साहित्य प्रकाशात आणावयाचे आहे. आम्ही तसे प्रयत्न पण करीत आहोत. तसेच माऊलीचे साद्यंत चरित्र ऐतिहासिक प्रमाणा-धारे प्रकाशित करित आहोत त्यापूर्वी प्रस्तुत परमरहस्य ग्रंथ प्रकाशित करित आहोंत.

ज्या माऊलीच्या कृपाशिर्वादानें हा ग्रथ प्रकाशित होत आहे, त्यांचे अल्पसे चरित्र व परमरहस्यातील तत्वज्ञानाचि तोंड ओळख करुन देण्याचा प्रयत्न येथं करित आहोत

### चरित्र

मन्मथ आलासे भूलोका। आतां कुणी भिऊ नका।

अतक्र्या, निधड्या छातीनें मागणारा संत विरळाच! परमतीयांच्या क्षणोक्षणी होणाऱ्या धार्मीक आर्थिक, बौद्धिक आणि व्यावहारिक आघातामुळं आहत झालेल्या आणि महाराष्ट्रांत अत्यल्प संख्येने रहाणाऱ्या नि म्हणूनच भेदरुन गेलेल्या समाजाला दिलासा देणारा, त्यांच्या उन्नतीपथाचा निश्चित मार्ग प्रदर्शीत करणारा निधड्या छातींचा तत्वनिष्ठ संत या मराठवाड्याच्या पवित्र भूमीत चारशे वर्षांपूर्वी अवतरला.

## पूर्वस्थिति–

त्या काळची परिस्थिति लक्षांत घेता मतांचा गलबला । तेथें हो मातला । अशी परिस्थिति होती. अिस्लामी राज्यसत्तेनें दक्षिणंत धुमाकुळ माजविला असल्यामुळे दक्षिणेंतल्या जनसाधारणांच्या मनाला धार्मिक प्रचाराच्या साधनेला जे स्वास्थ पाहिजे ते स्वास्थ्य मुळीच नव्हते त्याबरोबरच अितर बहुसख्यांक पंथ आपापल्या परिने प्रचार करित होते. शिवाय संत शिरोमणी ज्या समाजांत जन्माला आले होते तो समाज विशेषत: शेती व व्यापार यात आसक्त असल्यामुळे त्यांचे लक्ष विद्येपासून–शिक्षणापासुन अत्यंत दूर अशा अर्थं बिंदुवर केंद्रीत झालेले होते. आणि यांतुनच धार्मिक औदासिन्य निर्माण झालेले होते.

## बालपण–

अशाकाळी संतशिरोमणी श्री मन्मथ स्वामी महाराज यांचा जन्म बीड जिल्ह्यांतील निनगुर (अताचे द्राक्षासाठी प्रसिद्ध असलेले नेंकनुर) या गांवी शकें १४८२ माघ शुद्ध पचमी दुपारी झाला निनगुर हे मन्मथ स्वामांचे स्वता: चे गांव नसुन ते त्याचे आजोळ (आजोंबाचे गांव) होते संत माउलींचे वडील श्री शिवलिंग स्वामी हे कळब (जि. उस्मानाबाद) येथोल रहीवासी होते, आणि त्यांचा विवाह निनगुरच्या माहेश्वर कुलांतील पार्वती बाई यांच्याशी झालेला होंता. उभय पती–पत्नि अत्यंत श्रद्धावान शिवभक्त होते, बराच काळपर्यंत त्यांना अपत्य प्राप्ती झालीं नव्हती अपत्य प्राप्तीकारिता गूरुलिंग जंगमाची एक निष्ठपणें सेवा करणाऱ्या उभय पती–पत्निनी कुलगुरुच्या दर्शनाशीर्वादाने आपणास पुत्रप्राप्ती होईल या धारणेंने मागूरास प्रयाण केले गूरुमठांत राहून त्यांचा कृपाशोर्वाद प्राप्त करून घेउन त्यांच्याच अज्ञेप्रमाणें स्वगृही परतले. आणि गुरुलिंग जंगम दासोऽह सतत एक वर्ष पर्यंत चालविल्या नंतर त्यांना पुत्रप्राप्ती झाली. त्यांनी सदगुरू नागेश याच्या आज्ञप्रमाणें पुत्राचे नांव मन्मथ असे ठवले जन्मत: विलक्षण प्रतिभासंपन्न असल्यामूळे आणि स्वत:चे घर हेच धार्मिक शिक्षणाचे केंद्र असल्यामूळे त्यांना धार्मिक शिक्षण प्राप्त करून घेतांना कसल्याहि प्रकारचे कष्ट झाले नाहीत,

काव्यभिरुचि–

बालपणापासुन त्यांची ओढ मराठी काव्याकडे असल्यामूळे आपल्या युवावस्थेच्या आरंभापासुनच लोककाव्य निर्माण करण्याचा प्रयास आरंभीला. त्यांच्या समकालीन व उत्तरकालीन अनेक कवींनी,

बालपणी दांडु डफाचा धूंधकार । जिंकिले शाहिर नेणो किती ।।१

असा आदरपुर्वक त्यांच्या काव्य शैलिचा व बालपणातल्या काव्यभिरुचीचा उल्लेख केला आहे, या त्यांच्या वर्णनावरून मन्मथ माऊलिच्या पूर्वकाळांत शाहिरी साहित्य म्हणजे लावणी, पदे. कराव इ. काव्यपद्धति उदयाकडें झुकलेली होती असे स्पष्ट होते अशावेळी मन्मथ माऊलीचा ओघ सहजगत्या धार्मिक साहित्याकडे वळल्यास आश्चर्य तें काय ?

धार्मिक श्रद्धा–

कुलसंस्कार शिक्षण आणि अध्यात्म ग्रथाध्ययन यामुळे मन्मथ माऊलींच्या मनांत सद्‌गुरुंच्या संगतीविषयी औत्सुक्य निर्माण झाले आणि शकें १५०४ च्या सुमारास त्यानी तत्कालीन माणूर मठ सिहासनाधिपती चरपट्टाध्यक्ष श्री बसवराज स्वामी महाराजाच्या चरणाचा आश्रव घेतला. आई वडिलाच्यां आज्ञे प्रमाणें गूरूगृहि वास करून संस्कृत कन्नड आदी भाषेतील धर्म ग्रथाचे अध्ययन केले. आणी गुरू आज्ञेने स्वगृही कळवास आले.

तीर्थ यात्रा–

याच सुमारास वडील शिवैक्य झाल्यामुळे त्यांच्या संवेदनाक्षम मनावर अधिकच परिणाम झाला. कळत्रींवा भाग्रो संर्ग ढेतला । यात्रा नेत मार्गशोर्षे ।। २ ।। या वर्णना प्रमाणे त्यांनी आपल्या भजन सांप्रदायी भक्त मडळासह तीर्थ यात्राचा उपक्रम सुरु केला. यात्रेत ते मोठ मोठ्या प्रसिद्ध तीर्थाना भेटी देत व प्रत्येक गांवात कीर्तन व धर्मोपदेश करीत असत.।

पंढरपूर

शिखर शिगणापुरच्या यात्रेंस जाताना वाटेन वारकरी सांप्रदायाचें क्षेत्र असलेल्या पंढरी नगरीतील भीमातटी वाळवंटावर

शिव तोची देव येर ते सेवक ।
विष्णु ब्रम्हादिक सुरासुर ।।१।।
महादेव ऐसे जया असे नांव ।
येथें अभिप्राय तोची असे ।।२।।
वेद शस्त्रे आणि पुराणें बोलतीं ।
सर्वांसी पशुपति वंद्य जाण ।।३
ऐसा सनकादिकीं केलासे निश्चय ।
सर्वांसी तो ध्येय उमाकांत ।।४।।
मन्मथ म्हणे शिव सगुण निर्गुण ।
असे परीपूर्ण अविनाश ।। ५।।

वरील अभंगावर कीर्तन करून शिव सर्वोत्तमत्वाचें प्रतिपादन केले.ज्या वारकरी सांप्रदायाने आपल्य प्रचाराच्य। बळावर वीरशैव लोकांना आपल्या सांप्रदायात ओढुन घेंनलें होते. अशांची मुक्तता त्यांच्यांच क्षत्रात जावुन केलीं. अनेंक प्रकारच्या उलट सुलट प्रश्नाना समर्पक उत्तरे देत शेंवटी शिवावाचुनी आहे कोण ! विठ्ठल मस्तकी शिव जाण..! असे सांगुन प्रत्यक्ष विठ्ठल मूर्तीच्या मस्तकावर असलेल्या शिवलिंगाचे दर्शन अनेंक सदभक्तांना करवुन दिलें आणि शिवाविषयी असलेंली त्यांची गैर समजूत दुर केली. मात्र तसें करताना कोण।ही शिवभक्ताकडुन विष्णु आथवा विठ्ठल निंदा अथवा अवहेलना होवूनये याची त्यांनी दक्षता घेतल्याचे अढळुन येंते. आणि म्हणुनच पंढपूर क्षेत्री निवास करून राहिलेल्या महानीय संतांनी सब संतो– का राजा अर्थात् संत शिरोमणी ही पदवी बहाल केंली, आणि तेव्हा पासुन लोंक मन्मथ माऊलिंना संत शिरोमणी म्हणून संबोधु लागलें अशाप्रकारे प्रचार दिग्विजय करीत परत कळंबला येवुन पोहोचलें.

शिव कडा

त्यावेळी त्यांच्या मनांत एकांतवासांची तीव्र इच्छा झाली, अणि त्यानी कळंब पासून जवळच असलेंल्या हरंगडी येंथील कड्या मध्ये गुफा बाधून निवास

केला. तेथे असताना सतत भजन कीर्तन अणि शिवनाम घोषानें तो कडा नेंहमीच दुमदुमून जाई नि म्हणूनच या कढ्यास त्या काळापासून शिवकडा हे सार्थ नांव प्राप्त झालें.

आजहि ते ठिकाण 'भूम परंडा' तालूक्यात शिवकडा या नांवानें ओळखलें जाते. ज्या ठिकाणी संत शिरोमणी मन्मथ स्वाभी महाराज रहात असत तेथेच त्यांनी शिवलिंगाची प्रतिष्ठापना केली आहे. आणि त्या देवस्थानाचें नांवे अद्यापपर्यंत सुमारे पन्नास एकर जमीन लावलेंली आहें. त्याबद्दलची अख्यायीका अशी आहे की. ' मन्मथ माऊलिच्या नंतरच्या काळात ज्या वेळीं भुम परंड्याची जहागिर रावरंभांकडे होती. त्या वेळी रावरंभा स्वतः शिकारी करिता शिवक-ड्याच्या डोंगराकडे जात असत. त्यांना वाघाची शिकार करण्याची फार हौस वाटत असे. एकदा अचानकपणें वाघाचा शोध करित निघाले असताना त्या कड्यावर ज्या ठिकाणी मन्मथ माऊलि बसत असत ठिक त्याच ठिकाणी त्यांना एक भला मोठा वाघ दिसला त्याच्या शिकारि करिता रावरंभा पुढे सरसावुन गेले पुढे सरसावुन जातात तो त्या ठिकाणी भगवे वस्त्र धारण केलेला जटामुकूट मंडित तेजस्वी साधु दिसला. आश्चर्य चेकित होवुन रावरंभा पुढे निघाले नि जवळ जावून पहातात तो त्या ठिकाणी एक साधा ओंटा असुन त्यावर एक अत्यंत सुन्दर शिवलिंग असलेले दिसुन आले. उपरोक्त चमत्कारानें रावरंभाच्या अंतःकरणात असीम श्रद्धा उत्पन्न झाली. आणि त्यांनी तात्काळ हुकूम देवुन ते पवित्र स्थान निष्कंटक केले. आणि पहिल्याच सोमवारा पासून शिव पूजेंचा संकल्प केला, त्याप्रमाणें सहपरिवार येवून त्या संत शिरोमणि मन्मथ माउलीनें स्थापन केलेंल्या शिवलिंगास यथा सांग अभिषेंक केला, त्यावेंळी त्यांच्या बरोबर असलेल्या त्याच्या कन्येनें शिवलिंगासमोर नवस केला कीं 'माझे पति मजवर प्रसन्न होउन मला परत स्वगृही नेंतील तर मी तुमच्या सतत पूजनाची व्यवस्था करीन.' त्या मुलीची इच्छा त्या माऊलीच्या कृपेने पूर्ण झाली. भाविक मुलीनें तीला दुधाची वाटी म्हणून वडिलांनी आंदण दिलेली भूमि सुमारे ५० एकर मंदिराच्या पूजअर्चे करिता दिलीं, ती भूमि अध्यापहि मंदिराच्या हरंगुडी येंथील पुजाऱ्याच्या व्यवस्थेखाली असुन त्या भूमिच्या उत्पन्नातून पुजा अर्चा व प्रतिवर्षी फाल्गुन शुद्ध तृतियेस महापूजा, अन्नदान वगैरे होत असते.

**ग्रंथ रचना-**

याच काळांत माउलींची प्रवृत्ती आध्यात्मिक ग्रंथनिर्मिती कडे वळली. या पूर्वी बाळपणांतच त्यांनी आपल्या अलौकिक प्रतिभेंचा परिचय शाहिरी वाङ्मय निर्मिती करून जनसाधारणास दिला होता. त्यांचे लावण्या कटाव आदि स्फुट काव्य कर्नाटक, आंध्र, तमिलनाडुमध्ये देखील असल्याचे समजतें.

ग्रंथ निर्मितीमध्ये प्रथम त्यांचा कल अद्वैताकडे असल्याचा दिसून येतो या क्रमांत चारीदेहाचे निराकरण करणारा स्वयंप्रकाश हा ग्रंथ लिहीला असला पाहिजे कारण अद्वैतवाद हा जनसाधारणांत रूढ असा अध्यात्मवाद आहें. त्याचाच प्रभाव प्रथम सामान्य साधकांवर पडतो असा सामान्य अनुभव आहें. आणि त्यातुनच पुढे त्याचा विकास सुरू होतो. अशा रितीनें प्रथम मायावाद जगन्मिथ्यात्व प्रतिपादन करीत असतानाच ज्ञानबोधाचा अवतार झाला पाठोपाठ गुरूनागो हा नागेशस्तवा नात्मक ग्रथ लिहीला. ही ग्रंथ रचना शिवकडा येथील निवास काळांत झाली. गुरूगी तेंचा पण काल हाच. या कालीच माउलीनीं आगळचा-वेंगळचा प्रतिभेचा अनुभवा-नंद हा ग्रंथ लिहीला. सामान्य साधक सिद्ध साधक अथातो धर्म जिज्ञासा आणि ती पूर्ण झाली म्हणजे अथातो ब्रह्म जिज्ञासा वर येतो आणि शेंवटी परत अहं ब्रह्मास्मि मीच शिव आहे इथे येउन थांबतो ही वेदांताची रूढ चाकोरी आहें. निदान मराठी संतांनीं तरिही कोठेंहि बदललेंली दिसत नाही, माउली मात्र याला अपवाद आहेंत त्यानी अथातो ब्रह्म जिज्ञासेची रूढ चाकोरी सोडून अथातो आत्म जिज्ञासा असा क्रांतिकारक बदल वेदांत प्रतिपादनात केंला. माउलीचा प्रबूद्ध शिष्य म्हणतो महा राज! इतर शिष्य प्रश्न करितीं ब्रह्म कैसेम्हणोनि पुसती । तरि माझें पुसणें तैसे नव्हें स्वानन्दमूर्ती । मी कां तेसे पुसू । पुढ तो म्हणतो- माझे पुसणें ऐसे असे । माझे ब्रह्माहूनि कांय खोळंबलें असे । मी कोण सें जाणतुनसें । तें जाणवा आधी मज । मला मी कोण हें समजलें पाहिजे. याला दयामय सद्गुरुनाथाच्या शब्दांत माउली म्हणतात – श्रीगुरु म्हणति भला रें भला । त्वा बरवा प्रश्न केंला । ऐसा नांहि देखिला । प्रश्नकर्ता कोणि। अशा रितीनें शिष्याची पाठ थोपटून त्याचे समाधान केले, असा हा आहे अनुभवानन्द

स्वयंप्रकाश:– हा सामान्य वेदांतप्रतिपादन करणारा ग्रंथ आहे. यांत स्थूल सूक्ष्म, कारणादि देह, तत्वमस्यादि महावाक्य मुक्त व मुक्त यांचें स्वरुपाचे सूत्र–बद्धपणें विवेचन केलें आहे. उपोद्घातांत माउलींनी ग्रंथाचा आधार प्रस्थानत्रयीं असल्याचा स्पष्ट उल्लेख केला आहें. ते म्हणतात – हे सार उपनिषदाचे । हें बीजाक्षर वेदशास्त्राचे । हेंगुह्य गुजसिद्धांतीचे । मथुनि काढीलें.

आणि याची साक्ष म्हणोन त्यांच्याग्रंथातून गीतेचे श्लोक श्लोकार्ध ओवींतून गोविलें लें अढळून येईल त्या कालचा सामान्य साधक प्रथम प्रस्थानत्रयीं– गीता उपनिषदे, आणि ब्रह्म सूत्रें यांच्या कडेच वळतो. आचार्यशकर मध्व रामानुज निंबार्क श्रीकंठ आणि शक्तिविशिष्टाद्वैत प्रतिपादन करणारे प्रख्यात आचार्य ज्यानी, ब्रह्मसुत्रकार व्यासाचें खरें हृद्गत उघडे केंलें, व्यास मायावादी वा द्वैती नसुन तें परिणामवादी होतें हे त्यांच्या सूत्रावरूनच सिद्धकरून दाखविणारे श्रीपतिपंडिताराध्य यानी पण प्रस्थान त्रयींचाच आधार घेतला आहे इतकेच नव्हें तर ब्रह्मसूत्रांऐवजीं शिवसूत्रावरच भर देणाऱ्या काश्मिरींय क्षेमराज अभिनवगुप्त रामकंठ इत्यादि महापंडितांनीं देखींल गींता उपनिषदे यांच्यावर आपलीं लेखणीं चालविलीं आहे. पं. रामकंठानें तर शिवपर व्याख्या केंली आहे. गींता हा कर्म उपासना व ज्ञान सांगणारा ग्रंथ असल्या मुळें त्यातींल स्वमतास अनुकुल भाग तो प्रत्येकानें घेतला आहे. त्याला प्रथम अवस्थे त मारलीहि अपवाद नाहींत त्यांनीं गीतेतील कांहीं वाक्याचा जसाचा तसाच मराठीं अनुवाद न करता उल्लेख केंला आहे. (अनुभ.वानंद १५,) आणि असाच पुढेहि उल्लेंख केंलेंला दिसुन येतो ईतकेच नव्हे तर त्याकाळात रचलें गेलेंल्या अभंगातूनहिर्ग तेंमाजि हरि बोलिलें वचन कार्माचीही गहन गति असे । असा स्पष्ट उल्लेंख केंला आहे या अशा उदाहरणामुळे त्यांच्या साहित्यावर गीतेंचाच प्रभाव होता किंवा तें पूर्णपणें गीताश्रय यीं होते म्हणणें थोडें साहसाचें होईल.

सर्व सामान्यपणे वेदांताचे विषय पण एकच असल्यामुळे स्वयं प्रकाशग्रंथात चहु देहाचे विवरण देऊन त्यांचे निराकरण केले आहे. ( स्वयंप्रकाश प्र. १ ते ३) तसेच पुढे चारो वेदाच्या तत्वमस्यादि महावाक्याच्या अर्थाचे विवेचन चारी मुक्तीचे विवेचन केले आहे ( प्र. ४ ) निर्गुण सायुज्यता मुक्त चे विवेंचन पण केले

आहे. ( प्र. ५ ) ध्यान म्हणजे काय व ते कसे करावे याचे पण विवेचन भावमधुर भाषेत केले आहे. ( प्र. ६ ) आणि शेवटी मुक्त पुरुष संतजन यांचे स्वरुप कसे असते हे सांगितले आहें. ज्येष्ठ संशोधक या प्रकरण ग्रंथास कांही विषय वा कांही दृष्टांताच्या साम्यावरुन मुकुंदराजकृत विवेकसिंधुचा विस्तार म्हणतात. विवेक सिंधुची व्याप्ती पाहाता त्याचा बिस्तार अथवा टीका म्हणणे कोणत्याही परिस्थितीत योग्य होणार नाही. कारण प्रतिपाध्य विषय १ असल्यामुळे सहजिकच दृष्टांत उदाहरण याचे ठिक ठिकाणी साम्यत्व येणें स्वाभाविकच आहे, त्यामूळे कांही साम्य स्थळावरुन त्या ग्रथाचे मौलिकत्वच हिराउन घेण्याचा प्रयत्न हा पूर्वग्रह दूषित दृष्टीचा दोष म्हणल्यास वावगे ठरुनये. प्रकाशदीप बामणो मुताजो कृत. यांचे हस्त लिखित माझे संग्रही आहे.

तसे पहाता बिवेकसिंधु - स्वयंप्रकाश आणि दीपरश्नाकार हे जवळ जवळ सारखे विषयच प्रतिपादन करतात. त्यामुळे त्यांचे मौलिकत्व केंव्हाही खंडीत होऊ नये. विस्तार अथवा टीका करीत असताना टीकाकार अथवा विस्तारक आवश्य पूर्व ग्रंथकारांचा उल्लेख करतोच. उ. अमृतानुभवाच्या टीका-विस्तार करणाऱ्या शिवदिन केशरी सारख्यानी स्पष्ट उल्लेख केला आहे. तसे माऊलीने आवश्य केले असते. त्यांनी परमरहस्य गुरूगीता - शिवगीता इत्यादी ग्रंथातून योग्य असा उल्लेख केला आहेच. इतकेच नव्हें तर इतर ग्रंथकारासारखे ग्रंथाचे कर्तुत्व कधींही आपल्याकडे घेतले नाही. ते पराकोटीचे निराभिमामी असे संत होते. त्यांनी " या लागी ग्रंथकर्ता श्रीगुरुनाथ । तोचि वदला ग्रंथार्तें " ( परमरहस्य ) अशा प्रकारचे ग्रंथकर्तृत्व श्रीगुरुनाथकडे सोंपविले आहे. अशा संताचे मौलिकत्व हिराऊन दुसऱ्याकडे देण्यामध्ये महाराष्ट्र सारस्वतकरांची " जंगमाना स्वतःच्या पोतेडीत घातले " हीच संकुचित दृष्टी दिसुन येते, येवी तेवी संताच्या ब्रह्ममयातील अनुभूती विषयी एकात्मता असणें हे अनुकरण म्हणता येणार नाही. ती केवळ अनुभूतीच म्हणता यईल. विवेकसिंधुकारानीन सांगीतलेले विषय स्वयंप्रकाशमध्ये माऊलीनी दिले आहेत त्याचे काय ? त्याहो विषयाचा कुठल्यातरी ग्रंथाशी वादरायण सबंध लावण्याचां प्रयत्न ही मडळी करीलच. स्वयंप्रकाश हा स्वयंप्रकाशच आहे. तो केंव्हाही परप्रकाश नाही. हे विशुद दृष्टीने विचार करणाऱ्यास निश्चयाने दिसून येईल.

देव | ह्मणूनी श्रीगुरुसी भजिजे ।।६६।। ब्रम्हा विष्णू महेश। हेहि श्रीगुरुचेची अंश | तेही ध्याती श्रीगुरुस । या लागी गुरुसी नमो नमो ।।६७।।

अज्ञानतिमिरांधस्य ज्ञानांजनशलाकया ।।
चक्षुरुन्मीलितं येन तस्मै श्रीगुरवे नमः ।। १३ ।।

अज्ञान त्रिगुण अंधकार | ज्ञानांजन लाऊन केला दूर | ज्ञान चक्षु प्रकाशिला निरंतर | तया श्रीगुरुसी नमो नमो ||६८||

भवारण्यप्रविष्टस्य मोहदिग्भ्रान्तचेतसः ।।
येन मे दर्शितःपंथा तस्मै श्रीगुरवे नमः ।। १४ ।।

संसार रुपी अरण्यवनी | अहंभ्रांति भुलला दिशा भुलोनि | तेथे काम क्रोध सिंह व्याघ्र वेढुनी | ग्रासू आरंभिले ||६९|| तेथे भेटले अदृष्टे कृपा दानी | ज्यानी दुष्टश्वापदे टाकिली छेदुनी । सुपंथी लाविले शुद्ध बोधुनी | तया श्रीगुरुसी नमो नमो ||७०||

अनेक जन्मसंप्राप्तकर्मेन्धनविदाहिने ।।
ज्ञानानलप्रभावेन तस्मै श्रीगुरवेनमः ।। १५ ।।

अनंत जन्म प्राप्त का ह्मणसी | कर्म धर्महीन वर्तता जनासी | दुःख भोगणे प्राप्त तयासी | ह्मणोनी होती जन्म फेरे ||७१|| या लागी सद्गुरुसी शरण जाता । उपदेशी तो शिव बोध तत्वता | अष्टावरणाची महता । क्रिये सहित

सांगेतो ||७२|| गुर्वाज्ञेने स्वधर्मी वर्तता । ज्ञानानळे कर्म काष्टा समस्ता । उभेची दग्ध करी तत्वता | तया श्रीगुरुसी नमो नमो ||७३||

नमामि श्रीगुरुंशांतं प्रत्यक्षशिवरुपिणं ।।
शिरसा योग पीठस्थं परमोक्षप्रदायकं ।।१६।।

जो श्रीगुरु परम शांत । ब्रह्मरंध्री योग पिठी विराजित । जो का प्रत्यक्ष उमानाथ | मोक्षदायक भक्तासी ||७४|| हालऊनि नवचक्र मेळा | दाखवी महामायेच्या खेळा । दासा उध्दरी अवलीला | तया श्रीगुरूसी नमू ||७५||

दे. उ. केन मार्गेण भो स्वामिन् जीवो ब्रम्हमयो भवेत् ।।
कथमज्ञाननिवृतिः तत्सर्वं कथयस्त्र मे ।। १७ ।।

पार्वती ह्मणे जगदीश्वरा | जे प्राणी देहधारी अवधारा । ब्रह्म केवी होती चरेश्वरा । ते गुह्य सांगा मज ||७६|| जेणे प्राप्त होय शिवयोग । जेणे समरसे लिंगी अंग । ऐसे गुढ तत्व अव्यंग | निरोपा मज लागी ||७७||

शि. उ. यस्य देवे पराभक्तिर्यथा देवे तथा गुरौ ।।
तस्येते कथिताह्यर्था प्रकाशंते महात्मनः ।। १८ ।।

ईश्वर म्हणे वो पार्वती । गुरु तोची देव जाणती | सद्भावे सदा अर्चिती । ते जाणती निज तत्वा ||७८||

प्रातः शिरसी शुक्लाब्जे द्विनेंत्रम् द्विभूजम् गुरुम् ।।
वराभयकरम् शांतम् स्मरेतन्नाम पूर्वकम् ।। १९ ।।

प्रातःकाळी उठोन । आसनी बैसावे सावचित होऊन | मग भावे करावे ध्यान | श्रीगुरुचे ।।७९।। जे का शुभ्र सहस्त्र-दळ कमळ | त्याची जी कलिका शुद्ध निर्मळ | तया ठाई अविकळ | ध्यान करावे प्रेम भरे ||८०|| आणिक सांगतो तुज एक | जो द्विभुज द्विनेत्रदेख | वर द्यावया अवश्यक | एक मुख शोभतसे ||८१|| जरी वदने अनेक असती | तरी वर न पावे निश्चती | म्हणोनिया आत्ममूर्ति | जगा माजी प्रवर्तली ||८२|| गुरु पादोदके करुन । नित्यदेहाचे होय क्षालन| तरी जन्मांतरीची पापे जळून | दिव्य शरीर होय पै ||८३||

> प्रसन्नवदनाक्षं च सर्वदेवस्वरुपिणं ।।
> तत्पादोदकधाराश्च निपतंति स्वमुर्धनि ।।२०।।

श्रीगुरुमुर्ती शांत सगुण | अद्वितीय प्रसन्न वदन | सर्व देव स्वरुप म्हणोन| पूर्ण ब्रम्हरुप तो ||८४|| गुरुपादोदकाची धार | पडतसे स्वमस्तकी वारंवार | ऐशी भावना सत्वर | करावी शिष्य वर्ये ||८५|| तया अमृत धारे करुन | होय गुरु बीजाक्षराचे संजीवन । नित्य नवे बोधांकुर जाण । प्रगट होय अंतरी ||८६||

> तीर्थानि दक्षिणेपादे वेदास्तन्मुखमाश्रिताः ।।
> पुजयेदर्चिततनुं तद्भिधानपूर्वकम् ।। २१ ।।

तयाचे दक्षिण चरणी | वसती सर्व तीर्थे जावोनी । वेद

सुखाचा आश्रय करोनी | राहे तेथेचि आनंदे ||८७|| ऐसिया सद्‌गुरूनाथाचे | भावे पुजन करावे साचे | नाम स्मरता जन्माचे | सार्थक होय तत्वता ||८८||

काशींक्षेत्रनिवासोसौ जान्हवीचरणोदकम् ॥
गुरुर्विश्वेश्वर: साक्षात् तारकम् ब्रम्ह निश्चितम् ॥२२॥

भू कैलास वाराणसी | पुरी विराजीत काशी । सप्तपुरीयात अविनाशी | महातीर्थ वंद्यजे ||८९|| तेथे असे विश्वेश्वर । तैसाच मानिला गुरु साचार । उभय चरण स्पर्शी नीर । तेच तीर्थ मानिलेसे ॥९०॥ गुरु चरणीचे जे तीर्थ | जान्हवी सारिखेची निश्चित | त्या वेगळा भावार्थ | करु नये गुरु भक्ते ||९१|| ज्या ज्या तीर्थी आहे पाणी | ती ती शिवाची पाय धुणी | परि तेची उत्तम ह्मणोनी | अभिषेकिती देवाते ||९२|| तैसेची गुरुचरणीचे उदक । परम पवित्र पावन देख । त्याचा करीता अभिषेक | संतोषित गौरी मी ||९३|| आता सांगणे निश्चित एक | भावे जाणिल्या तीर्थ तारक । तैसे नोव्हे गुरुपादोदक | साक्षात ब्रह्मदायक असे ||९४|| येथे संपऊनी गुरु महिमा । पुढे रहस्या वदवी परमात्मा । तया श्रोतिया प्रत्यगात्मा | होओनिया तुष्टवी ॥९५॥ जो असेल साच वीर | तया हा ग्रंथ भवपार | करोनि देईल मुक्ति थोर | सायुज्य ती निर्वाण ||९६|| इतिश्री परमरहस्य सारामृत | उमामहेश्वर संवादी वर्तत।

त्याची टीका करोनी प्राकृत । कृत कृत्य मन्मथ ॥९७॥

इतिश्री परमरहस्ये हर गौरी संबादे । श्रीगुरु महात्म्यवर्णनम् नाम प्रथमाध्यायः समाप्तः ॥ श्लोक २२, ओव्या ९७



## अध्याय २ रा

श्रीगुरुभ्यो नमः प्रथम अध्यायी गुरुस्तव । करोनी श्रोत्या सावयव । प्राकृत भाषी अभिनव । गुरुरुप वर्णिले ॥१॥ जो साक्षात् शिवस्वरुप । जो तेजे प्रचंड प्रताप । जो वीरशैव धर्माधिप । मोक्षदायक जगताते ॥२॥ आता द्वितीय अध्यायी साच्चार । तीर्थमहिमा वर्णिला फार । परिसोत श्रोते चतुर । सावध होओनिया ॥३॥

दे. उ. श्रीगुरुपादतीर्थस्य सेवने किं फलं प्रभो ॥
तन्महिमा श्रोतुमिच्छामि कथयस्व महेश्वर ॥१॥

पार्वती पुसे जी महेशा । गुरुपाद तीर्थाचा महिमा कैसा । कोण फळ स्वयं प्रकाशा । निरोपा स्वामिया ॥४॥

शिः उ. मत्तः प्रवृताःवै सर्वे वेदा यज्ञास्तथा क्रियाः ॥
मद्रुपो हि जगन्मान्यो जंगमः परमोगुरुः ॥ २ ॥

शिव ह्मणे ओ गिरीजे । तुवा प्रश्न केला ओजे । तो आता निरोपु सहजे । तुझिये आवडी ॥५॥ क्रिया आणि वेद मंत्र । मज पासून सर्वत्र । उत्पन्न होती पवित्र । सप्तकोटी मुख्य

जे ॥६॥ त्याची जी जीवन क्रिया । ती असे जंगम प्रिया । ह्मणोनि गुरु आचार्या । श्रेष्ठ जाणे मी देवी ॥७॥ क्रिया चार सतेज असता । तेणे मंत्राची होय सिद्धता । लिंग निष्ठे मोक्ष येई हाता । क्षण न लागता साच पै ॥८॥

लिंगप्राणगुरुर्देवी गुरोः प्राणं तु जंगमः ॥
जंगमस्य प्रसादेन लिंगे प्राणं तु शांकरी ॥ ३ ॥

शिवसांगे अंबेप्रति । मम प्राण गुरु मुर्ती । गुरु प्राणाची स्फुर्ति । जंगम रुपे तिष्टतसे ॥९॥ तया जंगम प्राणाची व्याप्ती । प्रगट होय त्रिजगती । सकल व्यापार चालती । मदइच्छे करुनिया ॥१०॥ ती रहावी अखंड स्थिती । ह्मणूनि निष्ठा गुरुतीर्थी । षोडषोपचार पुजा करिती । अंति घेती शिवतीर्थ ॥११॥ एका गुरुचे पुजे करुन । त्रय मुर्तीचे घडे अर्चन । तया श्रीगुरु लिंगा व्यापून । माझे रुप असे ॥१२॥ गुरुपुजा करीता जाण । आदी किजे लिंग पूजन । सवेची स्पर्शी द्वय चरण । वरी मस्तक ठेवोनिया ॥१३॥ लिंग रुपी मी साक्षात । ब्रह्मतत्वी वास करीत । चरलिंग तोची वर्तत । पवित्र पावन सत्य पै ॥१४॥ वास्तव तीर्थ अविनाशी । श्रुतीने वर्णिले प्रेमेशी । चरणं पवित्रं विततं ऐसी । मंत्रे जाण तीर्थाचे ॥१५॥

शोषणम् पाप पंकस्य दीपनम् ज्ञान तेजसः ॥
गुरुपादोदकम् सुतम् संसारदमनाशनम् ॥ ४ ॥

ज्ञानबोध :– हाहि ग्रंथ गुरु शिष्य संवादरुप आहे. त्यांत ज्ञान म्हणजे काय ? अज्ञान म्हणजे काय ? असे प्रश्न उभा करुन त्यानांव ज्ञान, तसेच त्यानांव अज्ञान, त्यानांव अज्ञान असे दृढीकरण न्याथाने श्रोत्याच्या मनावर आपले विचार पूर्ण-पणें बिंबविण्याकरिता अनेंक आवर्तने त्यानांव यांची केली आहेत. ज्ञान अज्ञाना बरोबरच वैराग्य, भक्ती, त्वं पदाचे विवेचन, तत्पदाचे विवेचन, तसेच असिपदाचे विवेचन केले आहे. यानंतर संतमहिमा वर्णन करतांना माउली म्हणतात,

ऐसें संत जे निजानंद भरीत । ते कृपाळु अनाथाचे नाथ ।

संत असे असतात. अशा संताना

धरुनिया भाव भक्ती विश्वास । शरण जावे साधु संतास ।

ते करिती स्वयंप्रकाश । भव पाश छेदुनि ।

त्यांना शरण गेल्याने ते त्याला स्वयंप्रकाश करतात.

ज्याप्रमाने धर्माची दहा लक्षणें सांगितली आहेत. त्याचप्रमाणें माउलीनी संताची पण लक्षणें दहाच सांगीतली आहेत, ती -

निरभिमानी निर्द्वंद्व । दया शांती अक्रोध ।

भजन शम दम त्याग अभेद । इहि लक्षणी जे संत जाणावे ।

अशाप्रकारे सांगून प्रत्येकाचे विशदी करण केले आहे. उपसंहार करताना माउलींनी नागेश यांच्या नामाचा सुमारे ६ वेळा स्वत: मन्मथ शिवलिंग यानावाचा ३ वेळा उल्लेख करुन शेवटी

इति श्री ज्ञानबोध । गुरुज्ञानचि प्रसिद्ध ।

ऐकता होय स्वयंबोध । म्हणोनि पाहिजे संती ।

असा केला आहे.

गुरुगीता - संस्कृत श्लोक देउन त्याची टीका ओवीबद्ध रूपानें केली आहें यांत श्रीगुरूस्वरूप, ध्यान, भक्ती आदिविषयाबरोबरच श्रीगुरूचे लक्षण पण दिले आहें. यांतहि माउलीची वैशिष्टय पूर्ण प्रतिपादन शैली उठावदारपणें दिसून येते.

शिवगीता - हाहि टीका ग्रंथ असून रामाला शिवाने जो उपदेश केला त्याचे ललित भाषेतून वर्णन केले आहे. या शिवगीतेनंतर जो क्रम येतो तो श्री परमरहस्य ग्रंथाचा.

श्री परमरहस्य - हा ग्रंथ क्रियात्मक ज्ञान अथवा प्रायोगिक विज्ञानाचा भरपूर सागरच आहें. आणि हा आमच्या समोरच आहे. या विषयी श्री यू.म.पठाण

साहेबांनी प्रस्तावनेतून विवेंचन केले आहेंच. विस्तारभयास्तव त्या विषयी मी विशेष लिहीत नाही.

या पूर्वीहि हा ग्रंथ आम्ही प्रकाशित केला होता. त्याचे जनतेने अपूर्व उत्साहानें स्वागत केले. त्या प्रमाणें याहि ग्रंथाचें स्वागत करील अशी खात्री आहे. परमरहस्याची ही दुसरी आवृत्ती प्रकाशित करताना आम्हास आनंद होत आहे. शक्यतो आम्ही ग्रंथ शुद्ध स्वरूपात आपल्या पुढे ठेवण्याचा प्रयत्न केला आहे.

या वेळी या ग्रंथास मराठवाडा विद्यापीठातील मराठी विभाग प्रमुख माननीय डॉ. यू. म. पठाण यांनी वेळात वेळ काढून सुंदर प्रस्तावना लिहून दिली, त्याबद्दल प्रकाशन त्यांचे आभारी आहे.

या ग्रंथ प्रकाशनाच्या कामी ज्या ज्या व्यक्तीनी अंत:करण पूर्वक सहाय्य केले व ज्यानी अडथळा अणण्याचा प्रयत्न केला त्यांना हृत्पूर्वक धन्यवाद देउन लांबविलेला लेख येथेच संपवितो.

संपादक
शि. शि. स्वामी

ॐ

श्री संत शिरोमणी मन्मथ स्वामी कृत

# परमरहस्य

श्री गणेशाय नमः । श्री गुरुभ्यो नमः । जय जयाजी सदाशिवा । परब्रम्हा अद्वयानंद वैभवा । नमो तूज देवाधि देवा । परमेश्वरा जगद्गुरु ॥१॥ आता नमू चिच्छक्ति । जी जगन्माता पार्वती । अज्ञजना उत्तम गति । जयेचिया अनुग्रहे ॥२॥ वेदा परशिवा परब्रम्हा । नेणवे तुझा महिमा । साकार होवोनिया आह्मा । पुरविसी हेतू इच्छित ॥३॥ श्री सद्गुरु कृपे करुन । आधी नमू शिवगण । जे का अमर सर्वाहून । तयास प्रेमे शरण मी ॥४॥ रुद्रगणा तये परि । शरण रिघो ये अवसरी । शिवगणाची असे थोरी । ग्रंथांतरी न वर्णवे ॥५॥ असंख्यात शिवगण । आदिअनादि ते जाण । नित्यानंदी विराजमान । भक्ता पावन करीत असे ॥६॥ सातशे त्रेसष्ट गण । अवतीर्ण जे पुरातन । नुरोंदय्यादि शरण । महाविख्यात जे ॥७॥ सदाशिव

परशिव ।। सच्चिदानंद गुरुदेव । आचाराग्रणी स्वयमेव । सदा वैभव शिवाचे ।।८|| तीर्थ प्रसाद नेमेसी | जे सेविती अर्हानिशी | आलस्य त्येजोनी प्रेमेशी | भक्तिभावे त्या शरण ||९|| ऐसे नमुनी शिवगण | पंचाचार्य ते मुख्य जाण| जे वीरशैव कुलोत्पन्न | गण सृष्टी कर्ते जे ||१०|| परि याचे अवतार | चतुर्युगात साचार | कोणकोणते नामधार | ईश्वर मुखी उद्भयले ||११|| त्या आचार्या करु नमन | रेवणसिद्ध मरुळ सिद्ध जाण | तिसरा एकोराम ज्ञानिया पूर्ण | चौथा तो पंडिताराध्य ||१२|| हे चहुयुगी आचार्य चारी | मुख्य शिवचारासी पुढारी | पांचवा असे सहकारी | विश्वार्या प्रति वंदिले ||१३|| युग परत्वे आचार्य पांच | धर्म रक्षणार्थ अवतार साच | हे तो शिव आज्ञे करुनि च | प्रगट होती मृत्यू लोकी ||१४|| तो नमू श्रीगुरु कैवल्य-दानी | अगम्य अगोचर अद्वैत निर्वाणी | अविनाश अनिर्व-चनी | अनुपम्य स्वामी ||१५|| अनाम तू अपरंपारा | श्रीगुरुमुर्ती नागेश्वरा | नागेश हे अडनांव दातारा | एऱ्हवी अनाम तू ||१६|| तूज रुप ना रेखा नाम | आम्ही भक्ति धरोनी ठेविले नाम | एऱ्हवी वेदशास्त्रासी अगम्य | अगोचर तू ||१७|| परि भक्ति लागी अकारलासी | गुरुरुप होऊनी तारीसी भक्तासी | म्हणोनी अज्ञापी परम रहस्यासी | टीका करावया ||१८|| स्फूर्ति उन्मेश देओनी | स्वयें वाचेची वाचा होऊनी | प्रेम रसे अक्षर घोळुनि | वाचेने

वदवी स्वामीया ॥१९॥ मी तव नेणे विवेक प्रबोधु । बोलो नेणे साहित्य संगीत शब्दु । येथ कृपा दृष्टी पाहोनी प्रबंधु । चालवा स्वामी ॥२०॥ ऐसे विनवोनी भूमि विन्यासी माथा। तव कृपा आली श्रीगुरु नाथा। अशीरिणी वदे तत्वता। वर असे तुज पै ॥२१॥ तुवा जो भाव प्रकटविला आता। तोचि वर तुज दिधला तत्वता । प्रेमभावे करी आता। टीका परम रहस्याची ॥२२॥ श्रीगुरुवाक्य ऐकोनी कानी। कर कमल जोडिले दोन्ही । तुमचिया वरदाने ग्रंथ पूर्ण पणी । निर्मीन आता ॥२३॥ वक्ता येथे विश्वनाथ । श्रोते शिवगण समस्त । याते स्तवु जोडोनि हात । सावध व्हावे निरुपणी ॥२४॥ आता श्रोतिया श्रीगणा प्रमथा । विनऊ चरणावरी ठेऊनी माथा । सावध होवोनी निरोपनी आता। ऐका टीका परम रहस्याचीं ॥२५॥ शिवगणा सावध होईजे ऐसे। बोलिलो मीं अज्ञान पिसे । ते सर्व काळ सावध असे। बोलिलो ते अन्याये ॥२६॥ शिवगण कांही असती असावधान । म्या तयासी म्हणीतले व्हावे सावधान । ते सदा सावध ह्मणोन । जगत्रय वर्ततसे ॥२७॥ तरी अन्याय क्षमा किजे । पितया सारिखे साहूनि जाईजे ॥ मज अपत्याते कृपा दृष्टीने पाहिजे । शिवगणा तुम्ही ॥२८॥ तुम्ही शिवगण प्रमथू । गणंगळ सत्यवादी कृपावंतु । मी तुमचे अनाथु । म्हणोनि सलगीने बोलिलो ॥२९॥ तुम्हा अवधान द्या ह्मणीतले खोटे। तुमचे अवधान लाहून ईश

तुष्टे । ऐसे बोल निपजती ओठे । याचा अभिमान तुम्हा ॥३०॥ मी परिहार कासया देवू आता । तुमचे तुम्ही बोलवा ग्रंथा । टीका करवाल आपुलिया स्वार्था । मज कुंथा कुंथी कायसी ॥३१॥ ग्रंथ संवाद शिव गौरीचा। निज ठेवा तुम्हा शिवगणाचा । या लागी बोलवाल वाचा । आपुलिया सुखालागी ॥३२॥ तुम्ही सुखरुप सदा असा आनंदे । परि जडजीव तरती तुमचिया प्रसादे । या लागी टीका करवाल स्वानंदे । मज रंका कडोनि पै ॥३३॥ तव श्रोते शिवगण बोलती । आता परिहार देसी किती । शिव काय बोलिले पार्वती प्रति । ते निरोपी आता ॥३४॥ बरवे स्वामी ह्मणोनी । मस्तक ठेविला चरणी । पार्वतीस बोधी शूळ पाणि । तेचि निरोपु आता ॥३५॥ आधि पुसेल गुरु महात्म्य । मग पुसेल परम रहस्य उत्तम । गौरीने हृदयी धरोनी नेम । श्रवणी तत्पर झाली ॥३६॥ त्याच क्रमे हा परम ग्रंथ । आरंभी किंकर मन्मथ । श्रवणी श्रोते वीर शैव समस्त । ग्रीवानंदे डोलविती ॥३७॥

कैलास शिखरे रम्ये भक्तिसंधाननायकं
प्रणम्य पार्वती भक्त्या शंकरं परिप्रच्छति ॥१॥

कैलास शिखरी रम्य स्थळी । भक्ति साधन धरोनी हिम-नग बाळी । प्रणाम करोनी ते वेळी । पुसे शंकरासी ॥३८॥

दे. उ. भगवन् सर्वधर्मज्ञ ज्ञानविज्ञाननायक ॥
ब्रूहि मे कृपया देव गुरुमहात्म्यमुतमम् ॥ २ ॥

सर्व धर्मासी कोण जो धनी । ज्ञान विज्ञान वर्ते जया पासोनी । तो तू भगवंता कैवल्यदानी । वर्णी महिमा श्रीगुरुचा ॥३९॥

शि. उ. यो गुरुः स शिवः प्रोक्तो यः शिवः स गुरुः स्मृतः ॥
भुक्तिमुक्तिप्रदात्रे च तस्मै श्री गुरवे नमः ॥ ३ ॥

जो परमात्मा परमेश्वरु । तोची सदाशिव सर्वा गुरु । तोचि मुक्तिचा उदारु । निज भक्तासी ॥४०॥ तोची ज्ञान विज्ञान दायक । तोची कर्मधर्मासि साह्यक । तोचि तीर्थ व्रतासी नायक । सद्गुरु तोचि जाणिजे ॥४१॥

दे. उ. रुपं भुक्तेश्च मुक्तेश्च ज्ञानविज्ञानयोस्तथा ॥
कर्मधर्मस्य वा रुपं कथयस्व समासतः ॥ ४ ॥

आता भुक्ति मुक्ति कोण कैसी । ज्ञान विज्ञान ह्मणावे कोणासी । धर्म आणि कर्म निर्णयासी । निरोपा ह्मणे पार्वती ॥४२॥

शि. उ. लौकिकं सुखमात्यंतं भुक्तिरित्यभिधीयते ॥
निवृतिर्घोरसंसारसागरान्मुक्तिरुच्यते ॥ ५ ॥

शंकर ह्मणेओ गिरीजे । आता प्रश्न निर्णय ऐक ओजे । एक एकोनि ऱ्हदयी धरिजे । फल पाविजे विश्वासे ॥४३॥ ऐक

भुक्ति जे बोलिजे । अन्न धन संसार सुख जे जे । ते सगुन् भुक्ति जाणिजे । देता मी ईश्वरु ॥४४॥ मुक्ति द्विविधा असती । एक त्या सगुणा चाऱ्ही मुक्ति । काळाची कांबी होय गाजती । चहुंचिया माथा ॥४५॥ निर्गुण पांचवी सायुज्यता जाणिजे । तेणे स्वये परब्रम्ह होईजे । देह असता जाता अखंड असिजे । वस्तुचि आपण ॥४६॥ तरंग क्षीर सागरीचा । भंगता न भंगे सागरुचि साचा । तेवि देह भंगता न भंगे ब्रम्हीचा । ब्रह्म पुतळाचि तो ॥४७॥ स्वये स्वस्वरुप होणे आपण । नाही क्रिया कर्म बंधन । सोहं सिद्धि सदा सावधान । तेची मुक्तिपद पार्वती ॥४८॥ पिंड ब्रह्मांडीचा जाणोनि झाडा । सत्‌चिदानंदाचा निवाडा । करोनि जाणिजे निज तत्व पुडा । त्या नांव विज्ञान ॥४९॥ जाणोनी तेची होईजे । झाले पणाचा आठव आटिजे । जाणीव ज्ञानाची मग निमे सहजे । विज्ञान तेची जाण ॥५०॥ धर्म तो कुळीचा जाणिजे । आपुले धर्मी निष्ठत्वे वर्तिजे । अधर्माची शीग निमे सहजे । तोची धर्म ओ देवी ॥५१॥ कर्म ते क्रिया जाणिजे । आपुलि क्रिया निगुण आचरिजे । निष्काम बुद्धि कीजे । तेची कर्म शुद्ध पै ॥५२॥ ऐसा जो भुक्ति मुक्ति ज्ञान विज्ञान दाता । धर्म कर्म सर्व क्रिया भोक्ता । तो सदाशिव सद्‌गुरु कर्ता हर्ता । ऐसिया सद्‌गुरुसी नमो नमो ॥५३॥

चैतन्यं शाश्वतं शांतं व्योमातीतं निरंजनं ।।
नादबिंदुकलातीतं तस्मै श्रीगुरुवे नमः ।।६।।

पिंड ब्रह्मांड सृष्ट सर्वांगी । व्यापक चैतन्य अंगसंगी । जडाते चेतवी चैतन्य रुपांगी । ऐसा सद्‌गुरु तो जाणिजे ।।५४।। शाश्वत म्हणिजे सदा असत । अक्षयी अजर अमर सदोदित । म्हणोनि नामे शाश्वत । श्रीगुरुपद ते ।।५५।। शांत म्हणिजे कांही कर्तृत्व नाही । षड्‌विकार षडूर्मि नुठति कांही । मन बुद्धि निमे म्हणोनि शांत पाही । सदा सद्‌गुरु स्वरुप ।।५६।। व्योमातीत म्हणिजे आकाश रहित । निरंजन जनवन व्यापुनि अतीत । नादबिंदू कळा ज्योति रहित । ऐसिया सद्‌गुरुसी नमो नमो ।।५७।।

स्थावरं जंगमाधारं निर्मलं स्थिरमेवच ।।
जगद्वंदित पादाय तस्मै श्रीगुरवे नमः ।।७।।

पृथ्वी पर्वत वृक्ष स्थावर बोलिजे । चालते बोलते जंगम म्हणिजे । या समस्तासी अधार जे जे । ते गुरुपद बोलिले ।।५८।। जो निर्मल त्रिगुण मलासी । जो स्थिर गंभीर व्यापक सर्वासी । त्रिलोक वंदिती ज्या पदासी । तया सद्‌गुरुसी नमो नमो ।।५९।।

स्थावरं निर्मलं शांतं जंगमं स्थिरमेवच ।
व्याप्तं येन जगत् सर्वं तस्मै श्रीगुरवेनमः ।।८।।

स्थावर निर्मल आणि शांत । जंगम स्थिर समस्त । या

सर्व जगासी जो व्याप्त | तया श्रीगुरुसी नमो नमो ॥६०॥

ज्ञानशक्तिसमारुढस्तत्वमाला विभुषितः ॥
अज्ञानांधतमस्सूर्यस्तस्मै श्रीगुरवेनमः ॥९॥

जो ज्ञानशक्ति आरुढ होऊन | लेऊन तत्वमालाचे भूषण |जो अज्ञानांधकार छेदितभान। तया श्रीगुरुसी नमो नमो ||६१||

अखंडमंण्डळाकारं व्याप्तं येन चराचरम् ॥
तत्पदं दर्शितं येन तस्मै श्रीगुरवेनमः ॥१०॥

जी वस्तू अखंड मंडळाकार । ती व्यापुनी असे चराचर । ते पद दाखवी जो निरंतर | तया सद्गुरुसी नमो नमो ||६२||

ब्रम्हा विष्णूश्च रुद्रश्च ईश्वरश्च सदाशिवः ॥
एते गर्भगता यस्य तस्मै श्रीगुरवेनमः ॥११॥

ब्रह्मा विष्णू आणि ईश्वर । सदाशिवादि सर्व अवतार | सृष्टीकर्ते गण साचार | शिवा पासुनि उद्भवले ||६३|| हे सर्व गुरुचे सेवक । ह्मणूनि सर्वा ज्ञान दायक । तेही गुरु-कृपेस्तव देख | गर्भा येती श्रीगुरुच्या ||६४|| ऐसा श्रीगुरु समर्थ । ज्याचे गर्भी विश्वनाथ | सदा राहे आनंदात। तया गुरुसी नमो नमो ||६५||

गुरुदेवो महादेवो गुरुदेवः सदाशिवः ॥
गुरूतत्वात्परं नास्ति तस्मै श्रीगुरवेनमः ॥१३॥

गुरु तोची महादेव | गुरुतोची सदाशिव | गुरु परता नाही

देव | ह्मणूनी श्रीगुरुसी भजिजे ।।६६।। ब्रम्हा विष्णू महेश । हेहि श्रीगुरुचेची अंश | तेही ध्याती श्रीगुरुस । या लागी गुरुसी नमो नमो ।।६७।।

अज्ञानतिमिरांधस्य ज्ञानांजनशलाकया ।।
चक्षुरुन्मीलितं येन तस्मै श्रीगुरवे नमः ।। १३ ।।

अज्ञान त्रिगुण अंधकार | ज्ञानांजन लाऊन केला दूर | ज्ञान चक्षु प्रकाशिला निरंतर | तया श्रीगुरुसी नमो नमो ||६८||

भवारण्यप्रविष्टस्य मोहदिग्भ्रान्तचेतसः ।।
येन मे दर्शितःपंथा तस्मै श्रीगुरवे नमः ।। १४ ।।

संसार रुपी अरण्यवनी | अहंभ्रांति भुलता दिशा भुलोनि | तेथे काम क्रोध सिंह व्याघ्र वेढुनी | ग्रासू आरंभिले ||६९|| तेथे भेटले अदृष्टे कृपा दानी | ज्यानी दुष्टश्वापदे टाकिली छेदुनी । सुपंथी लाविले शुद्ध बोधुनी | तया श्रीगुरुसी नमो नमो ||७०||

अनेक जन्मसंप्राप्तकर्मेन्धनविदाहिने ।।
ज्ञानानलप्रभावेन तस्मै श्रीगुरवेनमः ।। १५ ।।

अनंत जन्म प्राप्त का ह्मणसी | कर्म धर्महीन वर्तता जनासी | दुःख भोगणे प्राप्त तयासी | ह्मणोनी होती जन्म फेरे ||७१|| या लागी सद्गुरुसी शरण जाता । उपदेशी तो शिव बोध तत्वता | अष्टावरणाची महता । क्रिये सहित

सांगेतो ॥७२॥ गुर्वाज्ञेने स्वधर्मी वर्तता । ज्ञानानळे कर्म काष्टा समस्ता । उभेची दग्ध करी तत्वता । तया श्रीगुरुसी नमो नमो ॥७३॥

नमामि श्रीगुरुंशांतं प्रत्यक्षशिवरुपिणं ॥
शिरसा योग पीठस्थं परमोक्षप्रदायकं ॥१६॥

जो श्रीगुरु परम शांत । ब्रह्मरंध्री योग पिठी विराजित । जो का प्रत्यक्ष उमानाथ । मोक्षदायक भक्तासी ॥७४॥ हालऊनि नवचक्र मेळा । दाखवी महामायेच्या खेळा । दासा उध्दरी अवलीला । तया श्रीगुरूसी नमू ॥७५॥

दे. उ. केन मार्गेण भो स्वामिन् जीवो ब्रम्हमयो भवेत् ॥
कथमज्ञाननिवृतिः तत्सर्वं कथयस्व मे ॥ १७ ॥

पार्वती ह्मणे जगदीश्वरा । जे प्राणी देहधारी अवधारा । ब्रह्म केवी होती चरेश्वरा । ते गुह्य सांगा मज ॥७६॥ जेणे प्राप्त होय शिवयोग । जेणे समरसे लिंगी अंग । ऐसे गुढ तत्व अव्यंग । निरोपा मज लागी ॥७७॥

शि. उ. यस्य देवे पराभक्तिर्यथा देवे तथा गुरौ ॥
तस्यैते कथिताह्यर्था प्रकाशंते महात्मनः ॥ १८ ॥

ईश्वर म्हणे वो पार्वती । गुरु तोची देव जाणती । सद्भावे सदा अर्चिती । ते जाणती निज तत्वा ॥७८॥

प्रातः शिरसी शुक्लाब्जे द्विनेत्रम् द्विभूजम् गुरुम् ॥
वराभयकरम् शांतम् स्मरेतन्नाम पूर्वकम् ॥ १९ ॥

प्रातःकाळी उठोन । आसनी बैसावे सावचित होऊन । मग भावे करावे ध्यान । श्रीगुरुचे ॥७९॥ जे का शुभ्र सहस्त्र-दळ कमळ । त्याची जी कलिका शुद्ध निर्मळ । तया ठाई अविकळ । ध्यान करावे प्रेम भरे ॥८०॥ आणिक सांगतो तुज एक । जो द्विभुज द्विनेत्रदेख । वर द्यावया अवश्यक । एक मुख शोभतसे ॥८१॥ जरी वदने अनेक असती । तरी वर न पावे निश्चती । म्हणोनिया आत्ममूर्ति । जगामाजी प्रवर्तली ॥८२॥ गुरु पादोदके करुन । नित्यदेहाचे होय क्षालन । तरी जन्मांतरीची पापे जळून । दिव्य शरीर होय पै ॥८३॥

प्रसन्नवदनाक्षं च सर्वदेवस्वरुपिणं ॥
तत्पादोदकधाराश्च निपतंति स्वमुर्धनि ॥२०॥

श्रीगुरुमुर्ती शांत सगुण । अद्वितीय प्रसन्न वदन । सर्व देव स्वरुप म्हणोन । पूर्ण ब्रम्हरुप तो ॥८४॥ गुरुपादोदकाची धार । पडतसे स्वमस्तकी वारंवार । ऐशी भावना सत्वर । करावी शिष्य वर्ये ॥८५॥ तया अमृत धारे करुन । होय गुरु बीजाक्षराचे संजीवन । नित्य नवे बोधांकुर जाण । प्रगट होय अंतरी ॥८६॥

तीर्थानि दक्षिणेपादे वेदास्तन्मुखमाश्रिताः ॥
पुजयेदर्चिततनुं तद्भिधानपूर्वकम् ॥ २१ ॥

तयाचे दक्षिण चरणी । वसती सर्व तीर्थे जावोनी । वेद

सुखाचा आश्रय करोनी । राहे तेथेचि आनंदे ॥८७॥ ऐसिया सद्गुरूनाथाचे । भावे पुजन करावे साचे । नाम स्मरता जन्माचे । सार्थक होय तत्वता ॥८८॥

काशींक्षेत्रनिवासोसौ जान्हवीचरणोदकम् ॥
गुर्विश्वेश्वरः साक्षात् तारकम् ब्रम्ह निश्चितम् ॥२२॥

भू कैलास वाराणसी । पुरी विराजीत काशी । सप्तपुरीयात अविनाशी । महातीर्थ वंद्यजे ॥८९॥ तेथे असे विश्वेश्वर । तैसाच मानिला गुरु साचार । उभय चरण स्पर्शी नीर । तेच तीर्थ मानिलेसे ॥९०॥ गुरु चरणीचे जे तीर्थ । जान्हवी सारिखेची निश्चित । त्या वेगळा भावार्थ । करु नये गुरु भक्ते ॥९१॥ ज्या ज्या तीर्थी आहे पाणी । ती ती शिवाची पाय धुणी । परि तेची उत्तम ह्मणोनी । अभिषेकिती देवाते ॥९२॥ तैसेची गुरुचरणीचे उदक । परम पवित्र पावन देख । त्याचा करीता अभिषेक । संतोषिल गौरी मी ॥९३॥ आला सांगणे निश्चित एक । भावे जाणिल्या तीर्थ तारक । तैसे नोव्हे गुरुपादोदक । साक्षात ब्रह्मदायक असे ॥९४॥ येथे संपऊनी गुरु महिमा । पुढे रहस्या वदवी परमात्मा । तया श्रोतिया प्रत्यगात्मा । होओनिया तुष्टवी ॥९५॥ जो असेल साच वीर । तया हा ग्रंथ भवपार । करोनि देईल मुक्ति थोर । सायुज्य ती निर्वाण ॥९६॥ इतिश्री परमरहस्य सारामृत । उमामहेश्वर संवादी वर्तत ।

त्याची टीका करोनी प्राकृत । कृत कृत्य मन्मथ ॥९७॥

इतिश्री परमरहस्ये हर गौरी संवादे । श्रीगुरु महात्म्यवर्णनम् नाम प्रथमाध्यायः समाप्तः ॥ श्लोक २२, ओव्या ९७



## अध्याय २ रा

श्रीगुरुभ्यो नमः प्रथम अध्यायी गुरुस्तव । करोनी श्रोत्या सावयव । प्राकृत भाषी अभिनव । गुरुरुप वर्णिले ॥१॥ जो साक्षात् शिवस्वरुप । जो तेजे प्रचंड प्रताप । जो वीरशैव धर्माधिप । मोक्षदायक जगताते ॥२॥ आता द्वितीय अध्यायी साच्चार । तीर्थमहिमा वर्णिला फार । परिसोत श्रोते चतुर । सावध होओनिया ॥३॥

दे. उ. श्रीगुरुपादतीर्थस्य सेवने किं फलं प्रभो ॥
तन्महिमा श्रोतुमिच्छामि कथयस्व महेश्वर ॥१॥

पार्वती पुसे जी महेशा । गुरुपाद तीर्थाचा महिमा कैसा । कोण फळ स्वयं प्रकाशा । निरोपा स्वामिया ॥४॥

शिः उ. मत्तः प्रवृताःवै सर्वे वेदा यज्ञास्तथा क्रियाः ॥
मद्रुपो हि जगन्मान्यो जंगमः परमोगुरुः ॥ २ ॥

शिव ह्मणे ओ गिरीजे । तुवा प्रश्न केला ओजे । तो आता निरोपु सहजे । तुझिये आवडी ॥५॥ क्रिया आणि वेद मंत्र । मज पासून सर्वत्र । उत्पन्न होती पवित्र । सप्तकोटी मुख्य

जे ||६|| त्याची जी जीवन क्रिया | ती असे जंगम प्रिया | ह्मणोनि गुरु आचार्या | श्रेष्ठ जाणे मी देवी ||७|| क्रिया चार सतेज असता | तेणे मंत्राची होय सिद्धता | लिंग निष्ठे मोक्ष येई हाता | क्षण न लागता साच पै ||८||

लिंगप्राणगुरुर्देवी गुरोः प्राणं तु जंगमः ।।
जंगमस्य प्रसादेन लिंगे प्राणं तु शांकरी ।। ३ ।।

शिवसांगे अंबेप्रति | मम प्राण गुरु मुर्ती । गुरु प्राणाची स्फुर्ति | जंगम रुपे तिष्टतसे ||९|| तया जंगम प्राणाची व्याप्ती | प्रगट होय त्रिजगती | सकल व्यापार चालती | मदइच्छे करुनिया ||१०|| ती रहावी अखंड स्थिती | ह्मणूनि निष्ठा गुरुतीर्थी | षोडषोपचार पुजा करिती | अंति घेती शिवतीर्थ ||११|| एका गुरुचे पुजे करुन | त्रय मुर्तीचे घडे अर्चन | तया श्रीगुरु लिंगा व्यापून | माझे रुप असे ||१२|| गुरुपुजा करीता जाण | आदी किजे लिंग पूजन | सवेची स्पर्शी द्वय चरण | वरी मस्तक ठेवोनिया ||१३|| लिंग रुपी मी साक्षात | ब्रह्मतत्वी वास करीत | चरलिंग तोची वर्तत | पवित्र पावन सत्य पै ||१४|| वास्तव तीर्थ अविनाशी | श्रुतीने वर्णिले प्रेमेशी | चरणं पवित्रं विततं ऐसी | मंत्रे जाण तीर्थाचे ||१५||

शोषणम् पाप पंकस्य दीपनम् ज्ञान तेजसः ।।
गुरुपादोदकम् शुद्धम् संसारार्णवतारकम् ।। ४ ।।

शंकर ह्मणे ओ गिरिजे । पापलक्षण चिखल जे । त्याते शोषावया समर्थ जे । ते गुरुतीर्थ ओ देवी ॥१६॥ ते गुरु तीर्थ विश्वासे सेविता । ऱ्हदयी ज्ञान दीप प्रकाशे तत्वता । संसार द्रुम उन्मळोनी सायुज्यता । ती लाहे ओ देवी ॥१७॥

दे. उ. पादोदकविधिः किदृग् कार्यं पादोदकम् कथम् ॥
तत्सर्वं कथ्यतां गुह्यम् परमेश दयानिधे ॥ ५ ॥

पार्वती म्हणे हे महेश । गुरुतीर्थ जे अविनाश । ते कैसे करावे बिधीस । सत्य सांगा मजलागी ॥१८॥

शि. उ. प्रणम्यदण्डवद्भूमौ निष्ठया परयामुदा ॥
गुरोः संपुजयत् पादौ गंध पुष्पाक्षतादिभिः ॥ ६ ॥

शिव म्हणे ओ गिरिजे । तुवा तीर्थ विधी पुसिला ओजे । तो सांगेन तूज सहजे । श्रवण करी आदरे ॥१९॥ गुरु शिव एका भावेन । सया उत्तम आसनी बैसऊन । साष्टांग प्राणि पात करुन । आज्ञा घेईजे तीर्थासी ॥२०॥ भूमि प्रणाम दण्डवत घालुनी । चरण गुरुचे निष्ठे अर्चोनी । गंधाक्षता धूप दीपे पुजोनी । तीर्थ सेविजे विश्वासे ॥२१॥ गुरूआज्ञा करी प्रेमे । लवलाही उठा नेमे । धूप दीप अनुपमे । पूजा कीजे त्रिविध ॥२२॥ सद्योजात मंत्रे करून । ते भस्म लावावे आपण । क्षणामाजी नम्र होऊन । इष्टलिंगा पूजिजे ॥२३॥ दंशागुले चरण कमळी । स्पर्शोनि शुद्धोदक मिळी । भस्म लावून तये वेळी । सव्यमार्गे ठेविजे ॥२४॥ मग किजे

लिंग पूजा । निर्जराच्या निज बीजा । पत्र पुष्प धूप राजा । अर्पिता पुण्य पै ॥२५॥ महापुजा ती सर्वांगी । अर्चुनिया शिवयोगी । अंती किर्ती होय जगी । पुष्पांजळी अर्पिल्या ॥२६॥ नैवद्य तांबुल दक्षिणा । देईजे मौने तत्क्षणा । पुजा सर्व उतरुनि जाणा । चरण धरिजे आवडी ॥२७॥ पात्री प्रणव लिहूनि । मूल मंत्र अंगुष्ट स्थानी । ईशान वस्तू ह्मणूनि । उर्ध्व करी दाविजे ॥२८॥ पूर्वी उदके उपपात्र । ठेविले लावून सर्वसूत्र । तेंचि घेऊनी पवित्र । तीर्थ किजे परवस्तू ॥२९॥ मागे जी सांगितली श्रुति । ती येथें आदरे उच्चारिती । जयजयकारे गर्जति । मग सेविती तीर्थाते ॥३०॥ गुरुतीर्थ पात्री असता । लिंगीलीन होय व्रतवता । मुखा माजी प्राशन करीता । जंगम तीर्थ साच ते ॥३१॥ हेची जाणिजे त्रिविधा । दुजे असे दशविध । परी ते दश त्रिविध । होत असे अनुक्रमे ॥३२॥ ही परसूत्राची मूर्त । याचे कैसे सेवावे तीर्थ । ह्मणे तो नोव्हे शिवभक्त । लिंग धारी वा जंगम ॥३३॥ तीर्थी भेद धरीता घडे दोष । प्रसादा उच्छिष्ट पाप विशेष । जो जाणे तीर्थ प्रसाद नेमास । तोची वीरशैव जाणावा ॥३४॥ जे तीर्थ परम पद दायक । जे होय भव भय मोचक । तया धिःकारीता महा पातक । भोगी जाण अभक्त तो ॥३५॥ तीर्थ झालिया जाय उठून । किंवा धरुन बैसे अभिमान । तो पंचमहा-पातकी जाण । जंगम अथवा भक्त ॥३६॥ जो ह्मणे आणा

बैसल्याठायी । आचार विधी नेणेची काही । तो वीरशैव मार्गीचा नाही । गणवंशज नोव्हे तो ॥३७॥ तीर्थासी घे ह्मणू नये । कोणाहि पाचारु नये । पाचारिता दोष होय । तो सांगता नये येथे ॥३८॥ दाटून ह्मणे घे घे तीर्थासी । अवलिले पाचारिता अन्यासी । न घेता घे ह्मणणारा दोषासी । पावे जाण तो देवी ॥३९॥ जो वीरशैव मार्गी पुरुष । घे ह्मणणे नलगे तयास । ज्याचा तीर्थ प्रसादी विश्वास । कदा काळी न सोडी तो ॥४०॥ तीर्थाच्या वस्त्रास पुसू नये हात । भूमि पाडू नये किंचित् । आदरे सेवी तो जंगम भक्त । येरे ते सोंग बहुरुपियाचे ॥४१॥ निगुरुया तीर्थ न दिजे । गुरुपुत्रासी न वर्जिजे । लिंग भक्ति सोडून अन्य देवता पूजिजे । तीर्थ न दिजे तयासी ॥४२॥ ऐशिया भ्रष्टास तीर्थ देता । तो जंगम नोव्हे सर्वथा । आशा अथवा भीड धरीता । तरी तो दोषी होय की ॥४३॥ आचार मार्गाचे ठायी । राव रंक सारिखाची पाही । मार्ग चुकता अग्रेसरहि येई नीच पदासी ॥४४॥ मार्गे चाले तो पंचाननबोलिजे । अमार्गे वर्ते तोची श्वान जाणिजे । वीरशैव मार्गे वर्ते तो सहजे । गुरु सर्वासी वो देवी ॥४५॥ सप्त सागरीचे जल । सृष्टीची तीर्थे सकल । परि गुरुतीर्थ थेंबाचे फल । सहस्रांशे अधिक ॥४६॥ मा गुरुतीर्थ बिंदुची सरी । काशी न पावे बरोबरी । इतराची काय थोरी । मरणतीर्थ पुढे वर्णावया ॥४७॥

काशी मेलिया मुक्ति देत | सद्भावे सेविता श्रीगुरुतीर्थ | तो सहज होय जीवन्मुक्त | तीर्थ महात्म्य ऐसे हे ||४८|| गंगातीर्थी एक अवगुण | खोली जाता जाय बुडोन | गुरु तीर्थ न बुडवी ह्मणून | तरुनी जाती कैलासी ||४९|| द्वादशलिंगा करिता परिक्रमा | परि गुरुतीर्थाचा नये महिमा | जेणे पाविजे स्वये परब्रह्मा | त्याची सरी कोण करी ||५०|| तीर्थाविण बांधिता लिंग | तरी तो पाषाणचि चांग | जया तीर्थाचे न लागे अंग | तरी तो लिंगचि नोव्हे ||५१|| तीर्था विणे लिंग तो पाषाण | तीर्थ असे लिंगाचे जीवन | त्या विना नसे लिंगासी चैतन्य | लिंग प्रेता समान ते ||५२|| तीर्थाविण लिंग अकारण | तीर्थाविण भक्ति निष्कारण | तीर्थाविण मिरवी जंगम जाण | कैकाडियाचे मर्कट ते ||५३|| स्वधर्मी निष्ठा नसे जाण | व्यर्थ मिरवी जंगमपण | तीर्था सांडून करि कारण | जैसे भाषण अर्भकाचे ||५४|| जयासी तीर्थी नाही आवडी | प्रसाद सेवावयाची काय ती गोडी | तयासी सुटका नसे संसार बांधवडी | कल्पकोटी गेलिया ||५५|| विश्वासे जे सेविती तीर्थ | ते सरते होती शिवगणात | तया पुढे भुक्ति मुक्ति राबत | कर जोडून सर्वदा ||५६|| जो तीर्थ प्रसादाचा भेद जाणे | वीरशैव तयासीच म्हणणे | येरते हिंडती पोटा कारणे | भाट नागर जैसे ते ||५७|| तीर्थ करावे जयाचे | शुद्ध सर्वांग असावे तयाचे | तीर्थ न करावे अंग हीनाचे | ऐसे शास्त्र वदतसे

||५८|| हातीचे अथवा पाईचे | बोट गेले असेल जयाचे | अंग असेल व्यापिले रोगे तयाचे | तीर्थ बोलिले नाही ||५९|| नाक डोळा कान | गेला असेल छेंदून | तयाचे तीर्थ सेवन | करु नये हो देवी ||६०|| जो क्रोधी द्वेशी तामसी | जो जंगमद्रोही करी हिंसेशी | सेवू नये तयाचे तीर्थासी | परि भोजन घालिजे ||६१|| अंगी कुष्ट असता | पादपूजा न कीजे सर्वथा | जो शिवगण सर्वांगी पुरता | पाद पूजा किजे तयाची ||६२|| पुज्य मूर्तिसी द्वेषे करुन | जरी लाविले अन्य दुषण | तरी तो अपुज्य होय जाण | दोष मुक्त पावे तो ||६३|| या लागी भूरुद्र देशिकांनी | सर्वदा अलगत्वे वर्तावे जनी | अधिकार गुरुत्व पूर्णपणी | संपादावे निर्दोष ||६४|| जो शिवयोगी पाहता | निर्दोष मूर्ति असे सत्वता | तोची पुजे योग्य धर्म वक्ता | लिंगी निष्ठा असे ज्याची ||६५|| सुशील शांत आणि भाविक | जंगम भक्ति नित्य साधक | धर्म अधर्मी करी विवेक | पादपूजा कीजे त्याची ||६६|| सत्वगुणी भक्त जन | तो आवडे प्राणाहून | उभय ऐक्य झाल्या विण | पुजा नोव्हे सर्वथा ||६७|| उभयता शुद्धासने | असावी दुकूल परिधाने | पुजा तीर्था ते सेवने | आसन स्वकरे काढी का ||६८|| ऐकोनि तीर्थ महिमा | परमसुख पावली उमा | म्हणे धन्य धन्य पर-मात्मा | सदाशिवा स्वामी ||६९|| तुम्ही जो निरोपिला तीर्थ महिमा | तो न कळे निगमागमा | वीरशैवा वाचोनि

पुरुषोतमा । न कळे कोणासी ॥७०॥ वीरशैव कोण ते निरोपु आला । देह सांडी तो क्रिया चुकला । मा वाचेल लिंग जाता । हे केवी घडे ॥७१॥ ऐसे एकनिष्ट वीरशैव। मज कळविले उमाधव । परि धर्मशास्त्राचा प्रभाव । पुढे अर्थ रस बहू ॥७२॥ इतिश्री परमरहस्य सारामृत । उमा महेश्वर संवादी वर्तत । त्याची टीका करूनि प्राकृत । कृत कृत्य मन्मथ ॥७३॥

इति श्रीपरमरहस्ये हरगौरीसंवादे श्रीगुरुमहात्म्यवर्णनम् नाम प्रथमोध्याय: समाप्तः ।। श्लोक ६, ओव्या ७३
द्वितीयो



## अध्याय २ रा

श्रीपरब्रह्मणे नमः द्वितीय अध्यायी परम पावन । निरोपिला तीर्थ महिमा जाण । वीरशैवाचे मुख्य लक्षण । गुरुभक्ति वर्णिली ॥१॥ वर्णिली तैसीच गुरुमूर्ती । ती कैसी पूजावी प्रेम प्रीति । आनंदूनि जगदंबा पार्वती । प्रश्न करी शंकरासी ॥२॥

दे. उ. को मार्गोवीरशैवानां का स्थिति का च धारणा ।।
का पुजा लिंग निष्ठा का ब्रूहि मे परमेश्वर ।। १ ।।

कोण मार्ग स्वामी वीरशैवाचा । स्थिती धारणा कोण नेम तयाचा । कैसा नियम लिंगार्चनाचा । तो निरोपा स्वामी ॥३॥

शि. उ. लिंगार्पितम् विना भुक्ते नामृतम् विषमप्यथ ।
गते लिंगे त्यजेत्प्राणम् वीरशैवः स एव हि ॥ २ ॥

शिव ह्मणे ओ गिरीजे । आता वीरशैव सांगू ओजे । जया मार्गासी म्या वंदिजे । गुरुभावनेने ॥४॥ लिंग हाची जयाचा प्राण । तो हरवताची सोडी प्राण । ऐसे हे वीरशैव लक्षण । जाण देवी साच पै ॥५॥ जो मार्ग पतित पावन । त्या मार्गे जो चाले तो विरक्त पूर्ण । त्यासी वंदिता तुटे बंधन । चौऱ्यांशीचे ॥६॥ जो वीरशैव मार्गी पुरता । तो क्रिया निष्ठे आचरे शुद्धता । अणुमात्र क्रियाभंगता । देहची टाकी ॥७॥ लिंगार्पित केलिया वाचून । कांही पदार्थ न करी सेवन । पात्री अर्पिल्या विष ह्मणोन । न सोडी कदापि ॥८॥ लिंग निष्ठा परिपूर्ण । तो लिंगी असे लिंग होओन । लिंग गेलिया प्राण । राहे केवि तयाचा ॥९॥ अधीच लिंगी प्राण भरला असे । तो लिंगची होओनि बसे । लिंग गेलिया तो उरे ऐसे । केवि घडे ॥१०॥ लिंग हृदयीचे जीवन । लिंग प्राणाचा प्राण । लिंगामाजी मिश्रित होऊन । असे जो का ॥११॥ ते लिंग गेलिया देह ठेवी । हे ऐसे न घडेची देवी । पति गेलिया वाचणे जीवी । तरी ते नोव्हे पतिव्रता ॥१२॥ तैसे लिंग गेलिया जो राहे । तो वीरशैवचि नोव्हे । प्राण गेलिया देह । प्रेतची बोलिजे ॥१३॥ जयाचा प्राण लिंगी भरला । तो कैसा असे देहि उरला । लिंग गेलिया देही संचारला । पिशाच्च वत जाणिजे ॥१४॥

लिंगाविण वाचणे । ते प्रेतासम जाणणे । कि भ्रतारविणे जिणे । विधवा जैसी ॥१५॥ विधवा झाली तरी काय होते। देवे काय उणे केले दुजियाते । या ते उत्तर देईजेल ते । परिस वो देवि ॥१६॥ जरी तीने दुजा भ्रतार केला। तरि पाटकरीण ह्मणती तीला । सवाशीण पणाचा महिमा गेला । देवी धर्मी नाही तीं ॥१७॥ तेवि लिंग गेलिया बांधी आणिक । तो पाटकरणी समान देख । वीरशैव नोहे पोट वाईक । वेषधारी बोलिजे ॥१८॥ ह्मणोनि एक निष्ठे वर्तिजे । गर्भकाली प्राप्त शिवलिंगजे । तयासीच प्रेमभावे पुजिजे । एक निष्ठे करुनिया ॥१९॥ तोची प्रेमे करावा जतन । वीरशैवाची जी मूळ खूण । ग्रंथांतरी अवलोकून। भ्रष्टाचारे न वर्तावे ॥२०॥ ह्मणोनि लिंगा माजी जयाचा प्राण । तोची वीरशैव महागण । क्रिया कर्म निष्ठा पूर्ण । तारक शिवाचारासी ॥२१॥ भवी देखता अणूमात्र । न आचरे स्वकर्म तंत्र । भवीने सेविले जे पात्र । ते हाती धरीना ॥२२॥ इंद्रियाचे द्वारी न बैसे । अंतरी आत्म ओवरी असे । तो बाहेर कदा येत नसे । स्वसुखी रतला सदा ॥२३॥ तयाचिये लागता चरणी । कृपा करी तेचि-क्षणी । अजात भक्त नयनी । अश्रुपात होतसें ॥२४॥ नेमे षट्काल करी पुजा। तितुकि चि स्नाने ही ओजा । न्यास ध्यान युक्त सहजा । करितसे अत्यादरे मंत्र पुष्पे ॥२५॥ सहा वेळा पुजा करी सहजा । त्या वेळा कोण कोण ओजा।

जेणे संतोषे मी शिवराजा । निरोपु तुज आता ॥२६॥ पहिली पुजा अरुणो दयी करी । प्रहरदिन आलिया दुसरी दोन प्रहरा ती तिसरी । चौथी तिसरे प्रहरी की ॥२७॥ पांचवी सायंकाळी करी । सहावी पुजा मध्य रात्री । करा-वया आळस न करी । लिंग पुजेसी ॥२८॥ सहा पुजा न घडती जरी । तरि त्रिकाळ लिंग निष्ठा धरीं । त्रिकाळहि न घडती तरीं । तो पशू जडजीव ॥२९॥ बहू धाव एकां-तावरीं । एकांती लिंग अर्चा करी । भवी देखता न करीं । लिंग पुजा तो ॥३०॥ लिंग पुजे वीरशैव । सदा पार्वती वैभव । जे का भुक्ति अभिनव । लिंग पुजा प्रभावे ॥३१॥ त्या योगे मी हि सुन्दरी । वसे वीरशैवा मंदिरीं । पुजांति प्रसादाची थोरीं असे जाण तेथेची ॥३२॥ शिवभक्ता घरींचे अन्न । करीं अज्ञान जना पावन । ते असे सत्य शिवार्पण । अंन्यार्पण नसेची ॥३३॥ जे जे असे शिवा-र्पित । ते ते जाण परम पुनित । ते सेविल्या मजसीच पावत । अनायासे तत्वता ॥३४॥ अलिंगी अथवा लिंग-धारीं । जो शिवधर्माची निंदाकरी । त्याचे मुख न पाहे कांतागीं । तो वीरशैव जाणावा ॥३५॥ जया वस्त्राचीं परवा नाही । पांघरें तरीं एक घोंगडो पाहो । अंगास जे वस्त्र तेही भलतैसें ॥३६॥ जोड वस्त्र लिंगाशी । जोड कौपिन लावी तैसा । मिळाले तरीं घाली पायत-नाशीं । नित्य नेमे ॥३७॥ पायी नसुनि पादुका । न चालावे

मार्गि देखा | वाहनी आरुढावे अनेका | देश संचारा कारणे ||३८|| कौपिन जोडी शुद्धि करिता | हस्त पाऊड हाती धरीता | सोहं सोहळा पवित्र युक्ता | शोभे भाळी त्रिपुंड्र ||३९|| रुद्राक्षमाळा शोभे गळा | स्नान पुजेचिया वेळा | न देखे भविजन मेळा | त्याते भाषण न करी ||४०|| सहजाचे घेणे देणे | ते ही शरणावाचून न घेणे | बहुत बोलणे विनोद हसणे | न करी कदा ||४१|| आम्ही ह्मणितले सहजी घेणे | परि सहजा लया जाणे | विधीयुक्त घेणे करणे | आचाराते मिळे तैसे ||४२|| चरण धरुनि तीन वेळा | कृपा करा ह्मणता वेळो वेळा | तरीच घेईजे ऐसिया कळा | असत तो विरक्त मार्ग ||४३|| बिन्हा विण कांही | घेणेची तया नाही | सोने रुपे आदि कांही | न शिवो हस्ती ||४४|| ज्ञान वैराग्य मिळे क्रियेशी | राखे तोची वीरशैव बोलिजे त्यासी | क्रिया टाकी तयासी | शिवगण न मानिती ||४५|| शिष्य आचार करी पूर्ण | देशिका दे योग्य भोजन | त्याते स्वयें देखोन | आनंद मानितसे ||४६|| ज्ञान वैराग्य क्रियेशी | राखी तो धन्य वीरशैव वंशी | क्रिया सोडोनि चाले त्यासी | शिक्षेनें मार्गी लाविजे ||४७|| जो झालासे क्रिया त्याज्य | तया कोण मानील पुज्य | अधर्मे वर्तता राज्य | नष्ट होय वैभव ||४८|| जरी ज्ञानी पूर्ण झाला | तरी स्वधर्माचारें मान त्याला | आचार भ्रष्ट होता व्यर्थ गेला | जन्मा येऊनिया ||४९|| त्याने अनेक परोपकार

केली तीर्थे लहान थोरु । तैसेचि दाने अपारु । गो वाजी रथ दिले ॥५०॥ तरी क्रियेविण जे पुण्य । ते सुकृतासी होय उणे । ह्मणोनी न टाकिजे सज्जने । क्रियाचाराशी ॥५१॥ वडिल अग्रगण क्रिया टाकिती । तरी नेणतेहि तैसेंच वर्तती । ह्मणून न टाकिजे अधिक स्थिति । वाढविजे सज्जनि ॥५२॥ एरव्ही क्रिया रहित ज्ञान जाणे । परि जना कारणे करणे । परोपकारार्थ वर्तणें । परि हे तो अक्रिय ॥५३॥ अंधा मार्गी लाविजे । आपणहि हळूहळू चालिजे । तेवि अज्ञान अंध ओजे । लाविजे मार्गा क्रियेचिया ॥५४॥ ऐसा परोपकारी परम पुरुष । पट्टाधिकारी बोलिजे तयास । तोची तारक शिवाचारास । धर्मगुरु ॥५५॥ आशा धरोनि बोधिना । पूजा मान इच्छिना । परस्त्रीस पाहिना । कामदृष्टी कदा ॥५६॥ जीव हिंसा करीना । शब्दे कोणासी दुखविना । भुवई उचलिना कोणावरी ॥५७॥ जयाचे नांव विरक्त । तो कामयासी नोव्हे लिप्त । श्वान वमन मानित । भोग विलास सर्व ते ॥५८॥ तयासी लोह कांचन । गारा आणि समरत्न । मान अपमान समान । आनंद भरित सर्वदा ॥५९॥ तया प्रिय अप्रिय कांही । सर्वथा उरलेची नाही । निंदा स्तुति ऐकोनी । हर्ष विषाद नोव्हे मनी ॥६०॥ कोणी केली जरी निंदा । हर्ष मानी तयाच्या शब्दा । मान अपमानाचे भेदा । न जाणे विरागी तो ॥६१॥ शांति दया क्षमा सुबुद्धि । अनर्थ कोणा न करी कधी । वासना तृष्णा

कुबुद्धि । कुचाळी न करी कदा ॥६२॥ नाही जाणिवेचा तोरा । नाही क्रियेचा उबारा । तो शिवयोगी खरा । वीरशैवा श्रेष्ठ की ॥६३॥ ज्ञानानळी इंद्रिय व्यापार । होमिले षड्विकार । तो आकाररुपी निराकार । शिवयोगी विदेही ॥६४॥ पातळ तेची गोठले । घृत कण्याकार झाले । तेवि अमूर्त मूर्तीस आले । वीरशैवरुपे ॥६५॥ काम क्रोध द्वेष मत्सर । लोभ मोह दंभ अहंकार । निंदा कुटाळी कुचेष्ठा क्रूर व्यापार । नाही शिवयोगिया ॥६६॥ सोडने बांधने न करी जंजाळ । चिंता उद्वेग नाही हळहळ । मन कल्पना रहित निर्मळ । धोतले मोतु जैसे ॥६७॥ सकळ तीर्थासी अधिपति । चरण स्पर्शे तीर्थे पावन होती । जग उध्दरावया विचरती । निष्काम बुद्धि ॥६८॥ कोठे गोडी धरोनि तोषेना । मान दिधल्या फुगेना । अपमानिलिया कुंथेना । तोची वीरशैव ह्मणावा ॥६९॥ मृत्यूसी कदा भिईना । मी मरेन हे ध्याईना । मी उपजलो हे आठवेना । स्वतःसिद्ध पणे ॥७०॥ मी बाळ तरुण वृद्ध । हे नाठवे तया अखंडत्व बोध । जाती कूळ गोत्र संबंध । नाठवे तया वीरशैवा ॥७१॥ जयाचा गर्भिच मंत्र पिंड । संस्कारे निपजला मार्तंड । अविद्या अनाचार हे बंड । राहेल केवि ॥७२॥ गुरुकृपेने मांस पिंड गेला । तो संस्कारे मंत्रपिंड झाला । अविद्या अंधार दूर केला । प्रकाशला स्वप्रकाश ॥७३॥ आत्मा तरी स्वतःसिद्ध असे । तया कांही पावन

नसे । पावनता जगी जो वसे । देहाचिया लागी ती ॥७४॥ पाहता देहतरी अपवित्र । तयाहि पावन करी गुरुमंत्र । आत्मा स्वतःसिद्ध सर्वत्र । वस्तूरुप झालासे ॥७५॥ बाह्य अभ्यंतरी अवघाची । कोंदाटला परब्रह्म तोची । तो बोले चाले तोची । निज स्वभावे ॥७६॥ बोल बोले प्रेम प्रिती । अमृतासी परे सर ह्मणती । ऐके तो आनंदे चित्ती । सद्-भाव उठे मनी तया ॥७७॥ जे बोले ते प्रतिबंधक । परिसे त्या होय सुखदायक । न बोले लौकिक भेदिक । परमार्था लागोनि ॥७८॥ काया वाचा मने । जगा लागी सुखदेणे । ऐसे असे जयाचे वर्तणे । तोची विरक्त जाणावा ॥७९॥ पुढे पाहोनि चालणें । जीव मात्रासी राखणे । सर्वा घटी जाणणें । सदाशिव स्वरुप ॥८०॥ सदा शमदमी वर्तत । अंतःकरणी शम इंद्रिय दमित । अखंड वैराग्य भरित । षट्स्थल ब्रम्हबोधी सदा ॥८१॥ ऐसा हा विरक्त पुरुष । तोचि तो परमात्मा अविनाश । तद्रूप स्वयं प्रकाश । शिवयोगी तो ॥८२॥ जी वस्तू अगम्य अगोचर । अव्यक्त अनंत अपरंपार । ब्रम्हरुपाचे हे बिजांकूर । घवघवीत विरुढले ॥८३॥ तोची शिवयोगीं साचार । उद्धरावया चराचर । वर्ततसे महिवर । ममाज्ञे करुनिया ॥८४॥ जे का अद्वैत अनुपम । अगोचर आणि अनाम । जे अचल अलक्ष परब्रम्ह । तेचि निस्सीम होवोनी असें ॥८५॥ जो निजरुप अगम्य निर्गुण । जो निर्मुक्त निरामय निरंजन।

तो परमपुरुष गुण निधान | ऐसाचि होवोनि ठेला ||८६||
तो निःसंग निर्लेप निष्प्रपंच | जो निजरुप अनिर्वाच्य |
तोचि सुनिश्चय साच | होवोनि ठेला ||८७|| तोचि चिद्रुप
चिन्मात्रैक | जो चिदानंद चित् प्रकाशक | तोचि समरस
होओनि एक | राहे स्वरुपी सदा ||८८|| ऐसे जे वीरशैव
मार्गिक | ते स्वयं स्वतंत्र सुखदायक | तया मज नाही वेग-
ळीक | पार्वती सत्य जाणपा ||८९|| ते मज क्षणभरी न
विसंबती | मीही तैसाच तया प्रति | ह्मणोनी तो पुज्य
सर्वा प्रति | जाण देवि निश्चये ||९०|| आम्ही तयासी
ध्याऊ | सदा तयाचे गुण गाऊ | तया गुरुत्वे भाऊ |
आम्ही देवी सर्वदा ||९१|| तो देव आम्ही भक्त | तया
ध्याऊ हृदयात | आम्हा देवपण निश्चित | तयाचेनि योगे
||९२|| तो प्राण सखा आम्हा बहु | त्याचे चरण ऱ्हदयी
ध्याऊ | तया वाचुनि न पाहू | परवस्तू आणिक ||९३||
परशिव म्हणीजे तयासी | तो अतित व्याप्य व्यापकासी |
आता बहू काय बोलणे आह्मासी | मुकुट मणि होय तो
||९४|| तो सर्वासी गुरुरुप होय | त्याचे भावे वंदी जो
पाय | तो तात्काळ होओनि ठाय | निजरुपचि ||९५||
स्थावर लिंगा जें ध्याती | तया स्थावर गुरु ह्मणती |
उपासनेची निज स्थिती | कार्या कारण असे ||९६|| कर्म
उपासने बांधूनी गाठी | जे सर्वकाळ वाहतीं कंठी | न करी
दुजी वाटा घाटी | चरलिंग त्या ह्मणिजे ||९७|| तोची

जाणावा परशिव | गुरुमुखे घ्यावा अनुभव | आमुचा त्या वरी पुर्णभाव | नसे परवस्तू आणिक ||९८|| तो सर्वा गुरु रुप होय | त्याचे भावे वंदी जे पाय | तो तैसाचि होवोनि जाय | निमग्न वस्तुरुपी ||९९|| ऐसा जो श्री गुरुनाथ | परम पावन पुनित | जंगमरुपे वर्तत | तारावया भक्ताते ||१००|| तया सर्वस्वे भजावे | तनु मन धन अर्पावे | अन्न वस्त्रादिकी सेवावे | गुरुरुप म्हणोनिया ||१०१||

अन्नवस्त्रादिकम् देयम् गुरवे तत्परायण
अभावे सर्वं वस्तूनां स्वशरीरम् निवेदयेत् ॥ ३ ॥

तया सर्वस्वे भजावे | तनु मन धन अर्पावे | अन्न वस्त्र प्रेमे ओपावे | निष्काम बुद्धि ||१०२|| ज्यासी वित्त विषय नाही | तेणे अंगे सेवा करावी काही | सेवे शरीर निवेदिले जे ही | तत्पर होओनि ||१०३|| ऐसी अंगे करीता सेवा | शिवपद प्राप्त होय जीवा | गुरु ते भाविता ब्रम्ह भावा | तरि स्वये ब्रह्मची होय ||१०४|| ऐसा वेदांतीचा भाव | गुरु न जाणावा मानव | जाणता दोष अभिनव | घडति सत्य जाणा ||१०५|| गुरु मनुष्य ऐसे भाविता | तरि दोष होय तत्वता | आपणिया ब्रम्हरुपता | घडे केवि ||१०६|| म्हणोनि गुरु परब्रह्म भाविजे | मग आपणहि ब्रह्म होईजे | श्रीगुरुनिज वस्तू जाणिजे | सेवा किजे सद्भावे ||१०७||

कर्मणा मनसा वाचा गुरवे भक्तिवत्सलः ॥
शरीरं प्राणमर्थंच सद्गुरुभ्यो निवेदयेत् ॥ ४ ॥

मन बुद्धि वाचे जे जें कर्म होती । ते भक्ति वत्सल गुरुसी अर्पिती । जे शरीर प्राण अर्थ निवेदिती । तेची अधिकारी मोक्षासी ॥१०८॥ गुरू वाचोनि सर्वथा । आणिक नेणती देवता । गुरुमंत्रेविण तत्वता । फल नसे जापकासी ॥१०९॥ गुरुआज्ञें वेगळे न वर्तती । गुरु संतोष जे करिती । गुरु कृपा तेचि निज मुक्ति । सर्वकाळ शिष्यासी ॥११०॥ ऐसे जें गुरुभक्त पार्वती । तयाची अत्यंत मज प्रिती । ऐकोन संतोषली मूळ शक्ति । चरणी माथा ठेविला ॥१११॥ म्हणे मी नेणे या वर्मा । बरवा निरुपिला गुरु महिमा । धन्य धन्य भक्त विश्रामा । कृपा केली मजवरी ॥११२॥ श्रीगुरू महिमा सादर । ऐकता श्रोते चतुर । पावन होती सत्वर । भवार्णवा पासुनिया ॥११३॥ पुढे प्रश्न करील पार्वती । ऐकून तोषेल पशुपति । अति रहस्य उमे प्रति । निवेदिल शिव तो ॥११४॥ इति श्रीपरमरहस्य सारामृत। शिवगौरी संवादी वर्तत। त्याची टीका करोनि प्राकृत। कृत कृत्य मन्मथ ॥११५॥

इति श्रीपरमरहस्ये शिवगौरीसंवादे वीरशैव विरक्त लक्षण निरुपणम् नाम तृतीयोध्यायः समाप्तः ॥ श्लोक ४, ओव्या ११५



## अध्याय ४ था

श्रीगुरवे नमः । तृतीय अध्यायाचे अंती । शिवें निरूपिली वीरशैव स्थिती । आता प्रश्न करील पार्वती । ते ऐका सादर ॥१॥

दे. उ. कोवा बंधश्च मोक्षः कः स्वरुपमुभयस्यच ।
कथयस्य तथा स्वामिन् अतीतं बंध मोक्षयोः ॥ १ ॥

पार्वती विनवी देवा प्रति । बंध मोक्षाची निरोपा स्थिती । बंध मोक्षाची कैसी रीती । निरोपावे स्वामी मज ॥२॥

शि. उ. विकल्प रहितः शांतो निरहंकार एवच ॥
तद्रूपो ब्रम्ह सम्बधी मुक्तात्मा भवति ध्रुवं ॥ २ ॥

सर्व संकल्प विकल्प जेथ निमती । निरहंकार सदाशांती । तद्रुप ब्रम्हचि होवोनि असति । तोचि मोक्ष पै देवी ॥३॥ मी परब्रह्म निश्चयेसी । नास्ति देखे भेदासी । आपणाविण न देखे कवणासी । तोचि मोक्ष जाणावा ॥४॥ इंद्रिय व्यापारा बोळवण । ध्यान धारणा निमाले साधन । निमाली बुद्धि मन होय उन्मन । तोचि मोक्ष जाणिजे ॥५॥ गंगा-सागराशी मिळाली । ती पुन्हा न परते सागरुचि झाली । तैसी चित्तवृति समरसली । पुर्णानंदी शाश्वत ॥६॥ त्वंपद आणि तत्पदाचा । शबल शुद्धांश निवडिजे दोहीचा । उत्तम शबलांश शुद्ध गुण साचा । ऐक्य बोधुजो ॥७॥ जो ऐक्य

बोधु तो अस्सिपद । जो जीवाचा समरस आनंद । तो आपण होईजे स्वतःसिद्ध । तोचि मोक्ष जाणावा ॥८॥ सत् चित् आनंद दोन्ही जाणोन । तिन्हीचा जो साक्षी चिदानंद घन । तो स्वये झाला जो आपण । तोचि मोक्ष वो देवि ॥९॥ आता विशेष मोक्ष ऐक । जेथ साक्षित्वहि निमाले देख । दुजे नाही जेथे साक्ष आणिक । तेथे उरे कोण स्वरूपे ॥१०॥ आता बद्धता जेथे नाही । तेथे मोक्ष कैचा काही । वर्म नेणती म्हणूनि पाही । बद्ध मोक्ष रुढविती ॥११॥ आता बद्धता ती ऐक । ते दुष्कृत्याचे लेख । तेही सांगू दोविक । बद्धता लक्षण ॥१२॥ जो अहंकारे गर्वित। कामाग्नित लोलांगत । काम्यकर्मि ज्याचे वित्त । तेचि बद्धता ॥१३॥ मी आचार्य महागण । आमुचे क्रिये पुढे आहे कोण । वाहे क्रियाकर्माचा अभिमान । तोचि बद्ध जाण देवि ॥१४॥ आम्ही वीरशैव जंगम । आम्हा पुढे कोणी नाही उत्तम । आम्हीच जाणो म्हणती लिंग वर्म । तेचि बद्धता ॥१५॥ जळी देखे आपुलिया छायेसी । मी बुडालो म्हणोनी शोक करी मानसी । तेवि नसतिया जन्म मरणासी । भाझलिसे तेचि बद्धता ॥१६॥ स्वप्नीचिया मरणा भिऊन । जागृति म्हणे मी कैसा वाचेन । तेवि संसारा लटिकिया दे मान । तेचि बद्धता ओ देवि ॥१७॥ वस्तूचे अत्यंत विस्मरण । विषयाचेचि सदाध्यान । संकल्प विकल्पे भरिले मन । तीच बद्धता जाण ॥१८॥ अहंता

मदे अखंडित | मी तू भेद वाहे मनात | काम कर्दमी जयाचे चित्त | सदा धुस धुसीत पै ||१९|| ऐसे बद्धतेचे लक्षण | या लागी व्हावे सावधान | श्रीसद्‌गुरुसी नमून | कृपा हस्त दान मागावे ||२०||

विकल्पी क्रोधनोऽशांतो अहंकार समन्वितः ।।
दुर्धर्षो लोलूपो जीवो बद्धो भवति निश्चितम् ।। ३ ।।

संकल्प विकल्प वाहे ज्याचे मन | मी कर्ता धरोनि अभिमान | अशांत क्रोध लोभाकडोन | सदा बांधिला तो ||२१|| नाशिवंत संसारी सुख | अत्यानंदे मानी मुर्ख | क्रोधे करी रख रख | सर्वथा बद्ध तो ||२२|| मी जीव असे ही देह बुद्धि | ब्रह्मभावना नाठवे कधी | कुकर्माचा सांगाती कुबुद्धि निधी | तोचि बद्ध वो पार्वती ||२३|| कुबुद्धि कुकर्माचा नाद | विषयी काक जैसा सावध | न घे शिवपुजेचा स्वाद | बंधा कारण येणेचि ||२४|| ऐसे बद्ध मुक्ताचे लक्षण | निरोपिले तुज निवडोन | आता बद्ध मुक्तातीत कोण | ऐक ओ देवी ||२५|| ते गोष्टी असे अगम्य | कोणासीहि नोव्हे गम्य | तू माझा आत्मा ह्मणोन | उत्तम गुह्य तुज सांगतसे ||२६|| परि तो न कळे सहज | अगम्य अगोचर तुज | मी सांगेन परमगुज | लक्ष देई आदरे ||२७|| जे गुह्य शास्त्र पुराणा न कळेचि | जप तप ध्याना नाघवेचि | जे का व्याकरणा ज्ञाना नयेचि | ते गुह्य निरोपु ओ देवी ||२८||

जे बद्ध मोक्षातीत । ते क्षराक्षरा साक्षभूत । तोचि तूज सांगू गुह्यार्थ । सावध परिस आता ॥२९॥ ज्याचे होता मानवा दर्शन । त्याचे तुटे बन्धन । तो भज पावला जाण । स्तनपान न करी कदा ॥३०॥

बंध मोक्षद्वयं नास्ति तद्वयातीत एव सः ॥
साक्षिरुपो महातेजा स्वयं ब्रम्हस्वरुपभाक् ॥ ४ ॥

शंकर ह्मणे पार्वती प्रति । अलक्ष लक्षी ब्रम्ह ज्योति । तेथे लोभ भय वसती । नसे कदा काळी ॥३१॥ ऐक पार्वती तिसरी याचे लक्ष । अलक्षरूपे उभयासी साक्ष । बद्धता नाहीं तेथ कैचा मोक्ष । तया परब्रह्मासी ॥३२॥ जो लोभे नाही बांधीला । तो भव भया चुकला । ह्मणोनि तो मुक्तचि बोलिला । लोभे केला बद्ध एके ॥३३॥ जो बद्ध मोक्ष उभय पक्ष । जाणोनि असे सर्व साक्ष । त्या केंवि बाधे बंधमोक्ष । सदा सावध स्वरुपी ॥३४॥ अजन्म नित्य पर ब्रम्ह मानसी । तया बध्दता मुक्तता कायसी । बध्द तो बांधला मुक्त सुटला त्यासी । म्हणणे केंवि ॥३५॥ जरि मुळी बांधिलाचि नाही । तया सुटला म्हणणे कांही । बद्धमुक्त आठऊ जया नाही । तो सहज मुक्त तिसरा ॥३६॥ जो बंध मोक्ष उक्षया साक्ष । तो कोंवि बोलिजे बंधमोक्ष । तो साक्षीचाहि साक्ष । देहि न राहे परि असे ॥३७॥ जेथ एक पण न सरे । तया साक्षित्व साहे केंवि

दुसरे। परि जाणावया लागी खूण मात्रे। बोलावे लागतसे ॥३८॥ एरव्ही ठाव कैंचा बोला। जेथ पन्नास अक्षराचा ठावो पुसिला। चहू वाचेचा गजर निमाला। तो कोण्या वाचे बोलिजे ॥३९॥ परि एक नवल असें। ते बोला संगेचि भासे। बोल निमालिया वाचुनि येत नसे। हाला कोणाचिया ॥४०॥ परि ते असो ऐक सावध होऊनि। जैसा काष्ट जाळोनि अग्नि। मग आपणहि जाय सरोनि। उरे भस्म लेशू ॥४१॥ तैसे इंद्रिय विकार अज्ञान। जाळोनि जे समर्थ ज्ञान। ते ज्ञानहि जाय ज्ञेयीं बुडोन। मग जे उरे ते गे ते ॥४२॥ बंधरुप मृगजळ। मोक्षरुप किरणे केवळ। उभयासाक्षी सूर्य मंडळ। तेवि ते प्रकाश स्वरुप ॥४३॥ तिसरा प्रकाशलिया पुरुष। प्रकृति पुरुषाचा करी नाश। जेवि उभय काष्टी प्रकाशला अग्नीलेश। तो जाळी दोही काष्टा ॥४४॥ दृष्य दृष्टा लोपुन। महादृष्टा असे होऊन। तो न दिसे तरी नास्तिपण। मानू नको ॥४५॥ कापुर अग्नीने जाळिला। सरिसा अग्निहि विझाला। परि परिमळ रूपे उरला। असेचि की ॥४६॥ तेवि दृश्य दृष्टा निमाले। परि उभया साक्षित्व उरले। उरले पणे विण संचले। आईतेचि असे ॥४७॥ साखर साखरेचा रवा जैसा। उदकी रवे पणा मुकला सहसा। परि गोडी पणे उरला ऐसा। मानावाचि की ॥४८॥ दृश्यत्वे दिसेना। ज्ञानासी भासेंना। ह्मणोनि नाही पणा। मानिसी ह्मणी ॥४९॥

कांही नसोनि असे । परि ते असोनहि नसे । जाणत्याहि जाणतु असें । तरि जाणपण नाही ॥५०॥ जरी दुसरे पण असते । तरि जाणतेपण साजते । जेथ प्रलयांबुचे भरते । तेथ प्रवाहो कैचा ॥५१॥ जैसे जागृति ना स्वप्न । सुषुप्ति हि जाय विरोन । कि प्रलयतेजे ग्रासिले रात्रंदिन । मग अवघाचि प्रकाशू ॥५२॥ तेवि प्रकृति पुरुष गिळोन । अहं सोहं जाय मिळोन । मागे जे उरे ते घनानंद पूर्ण । निजरुप आमुचे ॥५३॥ तिन्ही देवाचे विश्रामधाम । तेचि आमुचे गुह्यरुप परम । तयाचे सत्ते सृष्टि कर्म । करिती देव आनंदे ॥५४॥ तया रुप नाम ना रेखा । ते एक ना दुजे आहे ना नाही लेखा । नुरेचि जेथे मी तू पण आशंका । प्रकाश मय ते ॥५५॥ ध्येय ध्याता ध्यान । नसे ज्ञेय ज्ञाता ज्ञान । कर्ता कार्य कारण । या त्रिपुटीसी साक्ष तो ॥५६॥ जो भोग्य भोक्ता भोगातीत । दृश्य दृष्टा दर्शन विरहित । साध्य साधक साधना जाणत । स्वये देव ॥५७॥ जेथ विवेक शब्दसी बुडाला । अनुभव अनुभवासी निर्बुजला । वक्ता श्रोता निमाला । तेथे देखे कवण कवणा ॥५८॥ देखणारा देखणेसी । बुडाला भाविता भावनेशी । गुरुशिष्य नामासी । उच्चार नुरेचि काही ॥५९॥ जो गुरु शिष्याचा संवाद । जो निजानंदाचा आनंद । जो निज बोधाचाहि बोध । स्वतः सिद्ध आईला जो ॥६०॥ जो आला ना गेला । तो झाला ना मेला । धाला ना विरुढला । रचिला ना आईता कि

॥६१॥ तो कांही नसोनि असें । तो न दिसोनि वसे । दिसण्या असण्या जाण तसे । जाणपणे विण ॥६२॥ जाणणे नेणने त्या नाही जाणे । जाणणे अवघेचि नेणे । सर्वस्व आपण होणे । अवघेचि ॥६३॥ ते म्हणता हे येते । एक म्हणता दुजे होते । परि भेदाविण अभेदाते । केवि जाणिजे ॥६४॥ म्हणोनि भेदची अभेद जाणिजे । गुणेचि निर्गुण ओळखिजे । मग भेद गुण निमे सहजे । तद्रुपता आलिया ॥६५॥ म्हणसी ब्रह्म कैसे असे । ते चर्म चक्षु ते न दिसे । ज्ञानांजने पूर्ण प्रकाशे । हृदाकाशी ओ देवी ॥६६॥ सुगंध पुष्पा माझारी । परिमळ न दिसे जरि । तरी नाही म्हणता नयें गौरी । घ्राणेंद्रिया सुख होय ॥६७॥ पाना पुष्पा माझारी । प्रभा दिसेना जरी । नास्ति म्हणोनये सुंदरी । अस्तित्व भरले असे मगमगित ॥६८॥ चंद्र बिंबा भीतरि । प्रकाश न दिसे जरि । परि भूमंडळावरी । प्रकाश भरला असे ॥६९॥ तेथ दृष्य दृष्टा हरपे । मग आहे नाही कोण म्हणिपे । हेंचि अनुभवि निर्विकल्पे । तेचि वस्तुरुप ॥७०॥ एक माझी स्फूर्ति जाण । जागृत असे अनुदिन । तीचे शब्दे हे गगन । उत्पन्न झाली तत्वे पै ॥७१॥ तया कारणे मी सगुण । रुपा आलो देवि जाण । मागुती शक्ति आणि गण । उत्पादिले ब्रह्मा विष्णू ॥७२॥ त्या माझिया मूळ स्वरुपा । विसरोनिया जन्म खेपा । अज्ञाने जीव त्रिविध तापा । पावती जाण ओ देवि ॥७३॥ ती पर वस्तू जाण । असे चराचर

व्यापून | त्याची जाणावया खूण | गुरुसी शरण रिघावे ||७४|| आता बहूत करिता कथन | ग्रंथासी होईल विस्तारपण | जी निरोपिली त्याची खूण | ती विसरु नको ||७५|| जे माझ्या जीवीचे जीवन | जे माझे हृदयीचे ध्यान | ते तुज केले निरुपण | बीजाचे निज बीज ||७६|| जे दुर्लभ ब्रह्मादिकासी | जे अनिर्वाच्य नये लक्षासी | जे न भासे वेदशास्त्रासी | ते तुज निरोपिले ||७७|| ऐसी वस्तू जी पार्वती | तेचि वीरशैव अवतरती | तया शिवयोगी बोलती | माझेंची अंश जाण ते ||७८|| ते सदा उदास वृत्ति | भोग विलास थुंकोनि टाकिती | विष्टेसमान विषयसुख मानिती | सदा संतुष्ट ते ||७९|| ते मजला सदा पुज्य | उदासवृत्ति महाराज | ज्याच्या क्रियाचाराचे तेज | दूर करी भवाते ||८०|| त्यासी लोह सुवर्ण जाण | समानचि मान अपमान | अरि मित्र प्रिय अप्रिय समान | सहजमुक्त जंगम तो ||८१|| ऐसा तो सहजमुक्त जंगम | गुरुपद पावला उत्तम | तो सद्‌गुरु वाचोनि परब्रम्ह | आणिक नेणे दुजे ||८२|| आपुले सहित श्रीगुरुच | अवघाचि अवघा तोच | ऐसे निश्चया आले साच | गुरुविण आनु नेणे तो ||८३|| येथे संपवून ब्रह्म निरुपण | पार्वती प्रति सांगे आपण | जगन्माता आनंदून | प्रश्न करी शिवासी ||८४|| त्या श्रवणा वीरशैव जन | बैसले लाऊनिया ध्यान | वक्ता मनीं सद्‌गदून | श्रवण करवी श्रोतयासी ||८५|| इति श्रीपरमरहस्य सारा-

मृत शिवगौरी संवादी वर्तत । त्याची टीका करुनिया प्राकृत । कृत कृत्तार्थ मन्मथ ॥८६॥

इति श्रीपरमरहस्ये हरगौरीसंवादे मुक्ततत्वविवेक वर्णनंनाम चतुर्थोऽध्यायः श्लोक ४ ओव्या ८६

## अध्याय ५ था

श्रीजंगमलिंगाय नमः । तुम्ही सांगितले मुक्तस्वरूप । मागिले अध्यायी अमूप । आता वर्णावे जी स्वरूप । सद्गुरु-नाथाचे ॥१॥

दे. उ. रुपं सद्गुरुनाथस्य ज्ञातुमिच्छामि सांप्रतम् ।
ब्रूहि मे कृपया देव वल्लभोऽसि मम प्रियः ।१।

पार्वती म्हणे जी सदाशिवा । गुरु तोचि देव म्हणावा । ऐसे निरोपिले एक भावा । तो मज आता स्पष्ट करा ॥२॥ सद्-गुरु रुप कैसे । सांगावे जी मज सौरसे । कोण भाव मूर्तत्वे असे । स्वरूपी त्या ॥३॥

शि. उ, गुरुर्माता गुरुः पिता हितकृत् श्रीगुरुःस्वयं
गुरुर्देवात्परम् नास्ति तस्मै श्रीगुरवे नमः । २ ।

शिव म्हणे हो वरानने । जो गुरुवाचोनि कांही नेणे । सर्वस्व माझे गुरु म्हणे । अनन्य भावे शरण तो ॥४॥ गुरु माता गुरु पिता । स्वहित कर्ता गुरुचि दाता । ज्या परते दैवत नाही तत्वता । तया श्रीगुरुसी नमू आता ॥५॥ सखा तो जीव-

लग जीवीचा । गुरुचि बन्धु मित्र पूर्वज कुळीचा । जयाने परशिव केला जीवाचा । तया श्रीगुरुसी नमो ॥६॥ आप्त सोयीरा लिंगांगीचा । जो उन्मेष षट्स्थल ब्रह्माचा । बोधक ऐक्य तत्वाचा । तया श्रीगुरुसी नमावे ॥७॥

न गुरोरधिकः शम्भुर्न गुरोरधिको हरिः ॥
शिव कोपे गुरुस्त्राता गुरुकोपे न कश्चन ॥३॥

गुरुहुनि अधिक नाही त्रिपुरारी । गुरुविण अधिक नाही हरि । कोपे शिव हरिच्या गुरुतारी । गुरुकोपी कोणी तारीना ॥८॥ हरिहर गुरुचे अंकित । अखंड स्तुति ध्यान करीत । कळिकाळ पाया लागत । गुरु भक्ताचिया ॥९॥

मन्नाथस्त्रिजगन्नाथो मद्गुरूस्त्रिजगद्गुरूः ॥
स्वात्मापि सर्व भूतात्मा तस्मै श्रीगुरवेनमः ॥४॥

म्हणोनि माझा नाथ जगन्नाथ । माझा गुरु तोच जगाचा गुरु होत । माझा आत्मा सर्वभूतात्मा निभ्रांत । तया श्री-गुरुसी नमो नमो ॥१०॥

दे. उ. ध्यानं किमात्मकं ध्येयं पूजामूलम् च किं भवेत् ।
को वा मंत्रः सदाजप्यः मोक्षमुलं च किं वद ॥५॥

पार्वती वदे जी शंकरा । दयानिधे करुणाकरा । मज सांगाजी उदारा । प्रश्न निर्णय करोनि ॥११॥ कोण मुल ध्यानासी । कोण मूल पूजेसी । कोण मूलमंत्रासी । मूळ मुक्तिसी

कोण पै ॥१२॥

शि. उ. ध्यानमूलम् गुरोर्मुर्तिः पुजामुलं गुरोः पदं ॥
मंत्रमूलं गुरोर्वाक्यं मोक्षमूलं गुरोःकृपा ॥ ६ ॥

शंकर म्हणें पार्वती प्रति । ध्यानास योग्य गुरु मुर्ति । तयाचे चरण सद्‌भावे पूजिती । अन्य पूजा कासया ॥१३॥ ध्यान श्रीगुरुचेचि करावे । ध्याना मूळ गुरुरुप जाणावे । पूजा मूळगुरु चरण भावे । आन पूजा निरर्थक ॥१४॥ मंत्रासी मूळ गुरुवाक्य जाण । आन मंत्र निष्कारण । जयासी कृपा करी पूर्ण । तोचि मुक्त जाणावा ॥१५॥ श्रीगुरुविण मुक्ति नाही । वेद गर्जे उर्ध्वबाही । मुक्ति दाता श्रीगुरुपाही । मम-रुप जाणिजे ॥१६॥ देवामाजी मीच ईश्वर । मर्त्यलोकी वीर माहेश्वर । क्रियाचारासी आधार । सत्यजाण ओ देवि ॥१७॥

अंगुष्टाग्रे अष्टषष्ठी तीर्थान्यपि वसंति ते ॥
सप्तसागर पादोर्ध्वे तदाधःकुलपर्वताः ॥ ७ ॥

अंगुष्टी अडुसटतीर्थे असती । अष्ट तीर्थे स्नानी वसती । सप्तपदी नांदती । जया श्रीगुरुचिया ॥१८॥ महातीर्थे सप्त सागर । तेहि चरणी वसती स्थिर । कुल पर्वत धुरधरं । गुरुपदी नांदती ते ॥१९॥

नक्षत्रग्रहरुद्राद्या तस्य गुल्फे वरानने ॥
जंघायां वसते नित्यं षट्‌त्रिंशतत्वमालिका ॥ ८ ॥

ईशानादि रुद्र जे असती । गुल्फद्वयी नवग्रह वसति । जांघे

छत्तिस तत्वे नांदती । तया श्रीगुरुच्या ॥२०॥

सप्तसागर पर्यंततीर्थस्नानेषु यत्फलं ॥
सहस्रगुणितं तस्मात् गुरुपादांबुधारणं ॥ ९ ॥

सप्तसागर सृष्टीची तीर्थे । ते जे देती दान फळाते । ते सहस्रांशे गुरु अंगुष्ट थेंबाते । सरीं न पावती की ॥२१॥ फल जे गुरु तीर्थ सेवनाचे । शेष वर्णू शकेना महिमान त्याचे । मा म्या काय वदावें वाचे । पामराने ॥२२॥

निराकारो गुरुः प्रोक्तः साकारो लिंगरुपभाक् ॥
ज्ञात्वैक्यमुभयोर्नित्यं भजेत्सायुंज्यसिद्धये ॥ १० ॥

श्रीगुरुमूर्ति असे निराकार । लिंग मूर्ति असे साकार । परि जाणोनि उभय निराकार । एकत्वे भजिजे ॥२३॥ पातळ घृत तेचि गोठले । तरि काय घृत पणा उणे आले । तेवि निराकार गुरुत्व आकारले । लिंग रुपे ॥२४॥ कापूर आकार दिसे रवा । परि तो परिमळचि आघवा । तैसा लिंगरुप जाणावा । गुरुचि आकारला ॥२५॥ म्हणोनि लिंग तो गुरुचि जाणिजे । अभेदत्वे उभया पुजिजे । तयाच्या अंग संग होवोनि असिजे । निरंतर वो पार्वती ॥२६॥

गुरुरुपं तु यो विद्वान् शिवरुपमिति स्मरन् ॥
अशरीरात्मसंबंधो गुरूशिष्यमनुग्रहेत् ॥११॥

ज्ञानिया गुरु आणि शिव एक असे । उभयवर्ग निर्गुण

निराकार भासे । गुरु निराकार भाविजे विश्वासे । सदा-शिष्याने ॥२७॥ लिंगरुपी जो परमपुरुष । जो न कळेचि वेद श्रुतिस । तया न म्हणावे आकारास । निर्गुण निरा-कारचि जाणावे ॥२८॥ गुरुहि आहे तये परि । तयाचि देवाहून अधिक थोरी । वर्णिता शिणले वेदचारी । अगम्य रुपा अगोचर ॥२९॥ शिवतो निराभास भासेना कोण्हासी । पाहता वेदशास्त्र पुराणासी । तो भासवी सत्‌शिष्यासी । म्हणोनि शिवासी गुरु अधिक ॥३०॥ जो ध्याना जपा नामावरी । गवसेना कोण्हासी कोण्हे परि । तो शिव स्वये शिष्यासि करी । म्हणोनि अधिक गुरु ॥३१॥ शिवपरब्रम्ह होय सही । परि भेटी बोलणे न घडे कांही । हा भेटे बोले समाधान करी सर्वहि । या लागी गुरु अधिक ॥३२॥ पूजा पत्री भाव भक्ति । कैसी करावी निराकारा प्रति । सेवेसी पूजेसी गुरुमूर्ती । म्हणोनि बिशेष हा ॥३३॥ गुरु परशिव एकचि पाही । परि परशिवा बोधणे बोलणे नाही । हा बोधी बोले स्वये स्वरुपाचे ठायी । समरस करी ॥३४॥ निराकारचि आकारला । जडजीव तारावया गुरु रुप झाला । म्हणोनि मनुष्य म्हणूनये तयाला । परब्रह्म चि तो ॥३५॥

यो गुरुं कायरूपेण गुरूर्भावं च भावयेत् ।
शिष्यज्ञानप्रदीपेन अप्रमाणमगोचरं ॥ १२ ॥

शिष्याने देह भावना गुरुसी न भाविजे । अप्रमाण अगोचर गुरुते जाणिजे । ऐसे जाणोनि भजे तरि ज्ञान सहजे । अप्रमाण अगोचर होय ॥३६॥ गुरूसी देहधारी मानिता माणूस । ब्रह्मत्वे न बैसे विश्वास । तरि तो केवि पावे परब्रह्मास । गुरू माणूस मानिता ॥३७॥ गुरू मानव न भाविजे विश्वासे । तयासी स्वये ज्ञान प्रकाशे । मग आपणहि होय गुरू रूप सरिसे । गुरू ध्याने ॥३८॥ कीटभृंगी वैरध्याने । तात्काळ भृंगचि होणे । मा शिष्य तरी सद्भाव ध्याने । गुरूरूप केवि नव्हिजे ॥३९॥ म्हणोनि गुरूचे ध्यान करावे । तरि गुरूरूपचि व्हावे । झालिया कळिकाळ स्वभावे । शरण येती ओ देवी ॥४०॥ हे गुरू देह धारी न म्हणावे । ब्रह्म अगोचर तया जाणावे । तरीच परब्रह्मा पावावे । येणे भावे करूनिया ॥४१॥ सद्गुरु अव्यक्त असति । व्यक्त शिष्या उपदेशिती । प्रदिप्त ऐसी ज्ञान ज्योति । दाखविती पूर्ण ब्रम्ह ॥४२॥ तेंव्हा तेहि होति गुरूरूप । घेति ब्रम्हानंदी झेप । शिष्य गुरूत्वाचा विक्षेप । न उरे कदा तेथे ॥४३॥ गुरू शिष्या न दिसे भेद । ध्यान योगे असे अभेद । गुरूकृपे होय सद्गद । तो सत्शिष्य जाणावा ॥४४॥

एकमूर्तिस्त्रयोभागाः गुरुर्लिंगं तु जंगमः ॥
जंगमं च गुरुर्लिंगं त्रिविधं लिंगमुच्यते ॥ १३ ॥

एक निर्गुण मुर्ति त्रिभागा आली । गुरुर्लिंग जंगम ऐसी

भासली । तिन्ही मिळोनि एकरुप जई झाली । तोचि जंगम अथवा लिंग ॥४५॥ जो गुरु तोचि जंगम । जंगम तोचि लिंग उत्तम । त्रिविध लिंग ऐसा नेम । असिजो ओ पार्वती ॥४६॥ यास्तव तीन रुपा माझारी । माझा वास असे सुंदरी । तदन्य स्थाना भितरी । अजाग्रत असे मी ॥४७॥ लिंगरुपी जो सद्‌गुरु । वाहे स्वधर्माचा अहंकारु । तोचि वीरशैवाचारु । उद्धारु जगामाजी ॥४८॥ जो भाव गुरुसी पाही । तोचि असावा लिंगाचे ठायी । तोचि भाव जंगमाचे पाई । विश्वासे असावा ॥४९॥

गुरुदेवं महादेवमेकीभावेन भावयेत ।
भावद्वय विभागेन नरके कालमक्षयं ॥ १४ ॥

श्रीगुरुसी सदाशिवासी ऐक्य भावे । भजिजे तरी गुरुरुपचि व्हावें । द्वैतभावे निरयासी जावे । कल्पांतवरी ॥५०॥ गुरु देव आणि महादेव । उभयी नसे भेद भाव । म्हणोनि असे श्रेष्ठ प्रभाव । गुरु पूजनी ठेविला ॥५१॥

गुरुरूपोदवं लिंगं लिगरूपोद्‌भवो गुरुः ॥
भक्तो भेदवादी यो चांडालो गुरुपातकीं ॥ १५ ॥

गुरु पासोनि लिंग प्राप्ती । लिंगा पासोनि गुरुतृप्ती । उभया ठाई शिवाची व्याप्ती । असे जाण पार्वती ॥५२॥ गुरु माजी लिंग लिंगा माजी गुरु । ऐसा भक्ताचा असावा निर्धारु । लौकिक भावे धरी भेदाकारु । तो चांडाळ गुरु

पातकी ॥५३॥ लिंगासी गुरु भावने पुजिजे । ते पुजन गुरुसी अर्पे सहजे । म्हणोनि अष्टविधार्चने पुजिजे । त्रिकाळ लिंगासी ॥५४॥ स्थावर आणि दुजे चर। हे दोन लिंगाचे प्रकार। दोन्ही रुपी मीच ईश्वर। परि गुरु चर लिंग जाणावे ॥५५॥ म्हणोनि गुरुसी ध्याता अर्चिता जाण। कोटी लिंगाचे घडे पूजन। अर्बुद पात्री भोजनदान। घडतसें अनायासे ॥५६॥ कोण्ही म्हणती लिंग तरि साकार तेथे भजता केवि संतोषे निराकार । यासी दृष्टान्त ऐक साचार। जेणे संदेह फिटे ॥५७॥ नट सोंग रुप अवगला। सोंग देखोन सभे संतोष झाला। सोंगा त्याग दिधला ॥ नानाविध ॥५८॥ त्याग सोंगाने भोगिला । की सोंगातील नटासीच पातला। सोंग लटिके म्हणोनि पावला। त्याग नटासीच की ॥५९॥ म्हणोनि लिंग जंगमी भजन जे जे॥ किजे ते ते अर्पे गुरुसी सहजे। ऐसिया अभेदे जो भजे। तोचि गुरु भक्त ओ देवि ॥६०॥

यो गुरुं मृतभावेन तद्दिने यश्च शोचति
गुरुलिंगप्रसादं च नास्ति तस्य वरानने ॥ १६ ॥

गुरु मृत्यू पावला हे भावना। भाऊन अंतकाळी करीरु-दना। तो गुरु पुत्र नव्हे अज्ञाना। मारिज लेखिजे ॥६१॥ कां म्हणसी तरी तो निराकार। त्यासी मुळीच नाही शरीर। तो अविनाश अजर अमर। मृत्युरहित तो ॥६२॥

ऐसिया सद्गुरुसी नेणोनि । जो मृत मानी तो चांडाळ अज्ञानी । त्यासी गुरु लिंगाचा प्रसाद कोण्ही । न द्यावा ओ देवि ॥६३॥ गुरुब्रह्म ऐसे नेणोनि । भक्ति करी भावे जनी । मृत्यू पावला हे मनी आणि । तो चांडाळ जाणावा ॥६४॥ गुरुरुप सबरा भरीत । त्याचा नं लागे मानवा अंत । अदृश्य अगोचर अतीत । असे जाण सर्वांठायी ॥६५॥ चर गुरु चिरंजीव । न मानी जो मानव । तया प्रसाद वैभव । नाही नाही सर्वथा ॥६६॥ प्राण लिंगी ऐक्य करुनि । लिंगा प्राणाहुनि प्रिय मानी । ऐसे अभ्यासोनि वर्ते जनी । तोचि वीरशैव जाणावा ॥६७॥ त्याने केला देह त्याग । तो जाणावा महायाग । प्राण राहे लिंगी सांग । म्हणोनि दग्ध करु नये ॥६८॥

> प्राणेन लिंगसंयुक्तं लिंगेन प्राणसंयुतं
> प्राणेन त्यक्तकायस्य दहनं वर्जयेत् सुधी ॥ १७ ॥

लिंग आणि प्राण एक होऊनि । प्राण लिंगी लिंग प्राणी मिळोनि । जे असति त्याचिया देहा लागुनि । दग्ध नकिजे ओ ॥६९॥ का म्हणसी तरी ऐक्य पुढती । तुज निरोपितो दृष्टांती । जेणे देहाची बुंथी । तात्काळ जाय ॥७०॥

> दग्धस्य दहनं नास्ति पाकस्य पचनं न हि ॥
> ज्ञानाग्निदग्धदेहस्य न च दाहो न च क्रिया ॥१८॥

जैसे सिद्ध अन्नाते उपरी । पुनः पचविता निर्धार । विष-

तुल्य होय सत्वरी । प्राणहरण करावया ॥७१॥ तयाचे परि लिंगधारी । दहन करिता दोष भारी । प्राणहानी होय एकसरी । म्हणोनि दाहो वर्जावा ॥७२॥ जे दग्ध झाले ते काय जाळावे। जे पाक झाले ते काय शिजवावे। तैसे ज्ञानाने दग्ध स्वभावे । त्यासी दग्ध करु नये ॥७३॥ लिंग आणि प्राण एक होऊनि । येरयेरासी वस्तुपणी। तयाचा देह घालू नये अग्नि । मा देह क्रिया कैची ॥७४॥ जे शिवाग्निने दग्ध झाले । त्याचे दहन कदाकाळे । करु नये हिमनग बाळे । उदक क्रिया वर्जावी ॥७५॥

वराननें गुरुस्तस्मात् पशूनां पतिरिष्यते ॥
पशुपाश विनिर्मुक्त्यै गुरुर्भावं निरीक्षयेत् ॥ १९ ॥

आवो वरानने ऐक स्वभाव पण । गुरु तो सर्व पशुसी पती म्हणोन । पशुचे पाश छेदुनि निर्मुक्त पण । करी नाम मात्रे ॥७६॥ ऐक्य भावे गुरु वस्तू निरीक्षिता । पशू प्राणी पावती मुक्तता । गुरु तोचि परब्रह्म भाविता । आपणहि तेचि होय ॥७७॥ मोक्ष असे पशू पति । सगुण रुपे श्री गुरुमुर्ति । जन्मा खुंटवोनि मुक्ति । पाश छेदुनि देतसे ॥७८॥ जन्मा येण्याची कारणे अनेक । परि पाप पुण्य समानचि देख । त्या वाचोनि नरदेहा सुख । मिळणेच नाही जाणपा ॥७९॥ जरी नरदेह पावला उत्तम । तरि पुढे चौऱ्यांशिचा नेम । ठेविला वारोनि प्रचंड यम । शिक्षा

द्यावया प्राणियासी ॥८०॥ त्याचे हेर चित्रगुप्त । भूमंडळी असती अलिप्त । ज्या ज्या कर्मी प्राणी होती लिप्त । ते ते वरिष्ट लिहिताती ॥८१॥ अंति तया तेचि नेति । पाप पुण्याचा झाडा घेती । निर्दय शिक्षा अधोगति । प्राणी भोगिती यातना ॥८२॥ परि जे माझे पूर्ण भक्त । तया पुढे यम राबत । तयासी प्रार्थुनिया शिवदूत । अंति नेति शिव-पदा ॥८३॥ माझिया दूताची सरी । दुजे देव कांही न करी । ममाज्ञा मोडिता एकसरी । प्राप्त होती कष्टातें ॥८४॥ भस्मरुद्राक्षांकित देह । जरी यमदूत स्पर्शो लवलाहे । त्याचे शिर छेदू पाहे । वीरभद्र साक्ष पै ॥८५॥ जो प्राणी माझा अंकिला । त्या न पाहे यम डोळा । आज्ञा असे कळि काळा । शिवभक्ता वंदावे ॥८६॥ शिवाचाराचेनि योगे । जे चालती अनुरागे । तया मोक्षाचिया जागे । कीजे सत्य कैलासी ॥८७॥

पतिरेव गुरुःस्त्रीणां परानुग्रहनैव च ॥
सुरतार्चितसंतुष्टः सुभगोलिंगसंयुतः ॥ २० ॥

स्त्रीसी पतीच गुरु बोलिजे । तियेसी पराची दिक्षा न दिजे । जेणे तन मन धन अर्पण किजे । तियेसी तेचि भक्ति ॥८८॥ जेणे जेणे अंगे पति संतुष्ट होय । तेणे तेणे अंगे होतु जाय । पतिव्रता म्हणावया कारण काय । जे पतिच व्रत तियेसी ॥८९॥ ऐसियाचे अष्ट भोगी संतुष्ट । जो लिंग संयोगे भोगी लिंग निष्ट । अभेद भावने भोगी वरिष्ट । लिंग संयोगे भोगीतो ॥९०॥ लिंगांगीची स्वपत्नी श्रेष्ठ । अभेद भाव-

भोगे वरिष्ठ | लिंग पुजा करी एक निष्ठ | सदा संतुष्ट मानसी ||९१|| पति पत्नि असति एक | सव्यापसव्य अंग भौवतिक | पूर्वाजित असे नैष्ठिक | तरिच घडे सत्य हे ||९२|| गुरुलिंग आणि आपण एक | या लागी स्त्रीसी पतीचा अनुग्रह देख | म्हणोनि जरि दोहासी गुरु एक | घडे तरी भेद नाही ||९३||

दीक्षाच पतिपत्न्योरेच गुरुरेको भवेत् खलु ।।
तन्मतं प्राणिवैध्यमति सौख्यं वरानने ।। २१ ।।

स्त्री पुरुषासी एकचि गुरु | एकचि दीक्षा दिजे हा निर्धारु | दोहीची भावभक्ति घडे एकाकारु | भेद न घडे दोहीसी ||९४|| त्या दोहीचे घडे जे भक्ति सुख | तो सर्व भोक्ता होय गुरुचि एक | संतोषोनि होय मोक्षदायक | उभय वर्गासी ||९५||

गुरुदीक्षा पतिपत्न्योरन्यान्या भेद भावतः ।।
यदि स्याच्चे तदा तत्तभक्ति हीनं सुरेश्वरी ।।२२।।

पतिसी पत्निसी दोन्ही गुरु बोलिले नाही | घडले तरि भेद झाला पाही | दोघे भजती दो ठाई | तव दोन भाव जाहले ||९६|| दोन गुरु तव दोन्ही भाव | दोन भाव तव दोन देव | तव मोक्षपद हि सर्वथैव | दो प्रकारी असे की ||९७|| पति पत्नि म्हणति एक | तो त्याची अर्धांगी अर्ध भौतिक | हे तव वाक्य झाले मिथ्यैक | जव झाले दोन

भाव ॥९८॥ हे जाणिये तरी न मानिती । उभयाचा एक भाव असावा म्हणति । म्हणोनि दोहीसी दीक्षा प्राप्ती । एक गुरुने दीजे ॥९९॥ मुळिच दोन्ही भिन्न असावी । तरी दो गुरुचि दीक्षा घ्यावी । ते अधिच ऐक्य स्वभावी । जैसे देह आणि आत्मा ॥१००॥ या लागी उभयासी गुरु एक । एक भावना होता होय निज सुख । भेद खंडता मोक्ष दायक । होय श्रीगुरुनाथ ॥१०१॥

पतिपत्निभ्रातृपुत्रदासीग्रहपदातिनः ।
एकदीक्षा भवेद्देवी विशेषं शुद्ध भक्तिमान् ॥२३॥

या लागी पति पत्नि बंधु पुत्र । एकचि गुरु दीक्षा सर्वत्र । गृहीचे दासी सेवक पुत्र । एकचि गुरु पाहिजे ॥१०२॥ का म्हणसी तरी ऐक । सर्व घरचिया गुरु झालिया एक । तरि एक भाव होय सर्वांचा देख । एका गुरुचे पाई ॥१०३॥ सर्वांचा एक भाव एक विश्वास झालिया । मग सहज जाति मोक्षाचिया ठाया । ते भिन्न भिन्न दिसती परि काया । एकचि सर्व असे ॥१०४॥ एक भावे विशेष शुद्ध भक्ति । जया घडे एक चित्ति । तयासी मोक्ष पदाची प्राप्ती । घडे ऐक्य ओ देवी ॥१०५॥

गुरुरेको तथा लिंगं एकदीक्षा विशेषतः ।
प्रसादं त्वेकमेवं स्यात्सत्यमेव मयोदितम् ॥२४॥

घरच्या सर्वांसी गुरु एक । सर्वांसी लिंग देता एक गुरु

देख। एक दिक्षा प्रसाद आणिक। दुसरा नाही ॥१०६॥ एक गुरु एक लिंग एक प्रसाद। एकत्वी तेथे खंडला भेद। दुसरे नास्ति म्हणोनि मोक्ष पद। अभंग दो वरानने ॥१०७॥ सति पति दोघे मांदता। दोहीचा भाव एक नसता। तरी मुक्तिची केवि होय प्राप्तता। म्हणोनि उभया एक गुरु ॥१०८॥ भिन्न गुरु असता जाण। भिन्ना चारे वर्ते मन। तेथे स्त्री पुरुषा सौजन्य। कदाकाळी असेना ॥१०९॥ दोन भाव दोन भक्ति। भिन्नाचारे उत्पन्न होती। परधर्मि तया निवित्ती। एकी नसे म्हणोनिया ॥११०॥

न भवेत्पतिपत्न्योश्च गुरुद्वय वरानने ॥
गुरुद्वयश्च लिंगं च द्वयमेवभवेत्तदा ॥ २५ ॥

पति आणि पत्निस। एकचि गुरु असे उभयास। दोहीस दोन गुरु होता विश्वास। दो ठाई झाला ॥१११॥ दोनी गुरु तव लिंग-। दोन लिंग तव भाव हि द्वि अंग। द्विभाव तव मोक्ष न घडे चांग। म्हणोनि एकचि गुरु किजे ॥११२॥ पुरुष हा स्वस्त्रियेचा गुरु। हाचि शास्त्राचा होय विचारु। परि पति गुरु तो स्त्री गुरु। निर्धारे जाणावा ॥११३॥ पति गुरुच्या वचने। सतीने वर्तावे अनुदिने। नाही नाही तरि द्विभावे वरानने। मोक्ष नये हातासी ॥११४॥ जरी स्त्री पुरुषा दोन विचार। तरी तो जाणावा अना-चार। एक विचारे वर्तता साचार। यशकिर्ति वाढतसे

||११५|| म्हणोनि भेद भावा त्यागावे । एका गुरु लिंगासी भजावे | तेणे गुरु कृपाहि स्वभावे । प्राप्त होय अना-यासे ||११६|| गुरु कृपा होता निःशंक | तो गुरुरुप अव-श्यक | गुरु पदाचा गर्व देख । आणीता नरक कल्पवरी ||११७|| देह कावलास कैवल्य केले | जेणे स्वस्वरुप शिष्यास दिले | जीवा शिवपदी बैसविले | गुरुमातेने वात्सल्ये ||११८|| ऐसे सगुण निर्गुणातीत करोन | चारी मुक्तिचिया पैल तिरी नेऊन | पांचवीच्या सिंहासनी पूर्ण | बैसविले कृपाळुत्वे ||११९|| म्हणोनि परब्रम्ही जो पावला | त्याने न विसरावे गुरु स्वामीला | विसरे तो जाय अधोग-तीला । सत्य सत्य पार्वती ||१२०|| यास्तव गुरु परते दैवत | नाही नाही त्रिभुवनांत । मी तुज सांगितले निभ्रांत | भजा निश्चये श्रीगुरुसी ||१२१||

यदा दीक्षा द्विधाचैव प्रमादो द्विविधो भवेत् ॥
एवद्वैविधं देवी विशेषं पातकं भवेत् ॥ २६ ॥

जेथे दीक्षा दोन तरि प्रसाद दोन | तरि दोन भावे केवि होय पावन | भिन्न भेद तेथे पातक दारुण | घडे ओ देवि ||१२२||

पतिपत्निगुरुर्लिंगं एकभावं न पश्यति ॥
अष्टविशंति कोटिस्तु नरके कालमक्षयं ॥ २७ ॥

पति पत्नि गुरुलिंग मूर्ति | जे एक भावे न पाहती | अठ्ठाविस

कोटि वरुषे जातीं | निरय भोगासी ||१२३|| म्हणोनि भेद भावा त्यागावे | एकत्वे गुरुलिंग जंगमी भजावे | मग गुरुत्वचि स्वभावे | अंगासी ये ||१२४|| जरी गुरुत्व ये अंगासी | तऱ्ही फुगारा नये त्यासी | ऐसा गुरु भजने पाऊन गुरुत्वासी | गुरु भजनिच असिजे ||१२५|| शास्त्री जे पंचमा मुक्ति म्हणती | चहु मुक्तिचिया माथा तीचि वसती | जी सायुज्यावर ती गुरु भक्ति | ते पांचवी बोलिजे ||१२६|| येऱ्हवी सायुज्यपर जो जाला | तो तेंव्हाचि क्रिया कर्मासी मुकला | परि गुरु भक्तिसी उरला | सप्रेम भावे ||१२७|| जेणे कावळाचे कैवल्य केले। रंकासी राज्य पद दिधले | जीवासी शिवपदी बैसविले जया गुरुनाथे ||१२८|| शेखी सेवकत्व हि नेले | निर्गुणत्व जेणे दिल्हे | गुण नास्ति म्हणोनि निर्गुणत्व दिल्हे | अनुपम्य केले गुरु राये ||१२९|| ऐसे सगुण निर्गुणातीत करोन | स्वतः सिद्ध केले चिदानंद घन | तया गुरुसी न भजें ऐसा कोण | चांडाळ पातकी असे ||१३०|| म्हणोनि परब्रह्म जरी झाला | तरी भजीजे श्रीगुरु स्वामीला | न भजता जाय निरयाला | सत्य सत्य ओ पार्वती ||१३१|| म्हणोनि गुरु परते दैवत | नाही नाही ओ निभ्रांत | या लागी पूजन भजन एकांत | त्यासीच किजे ||१३२|| ऐसे गुरु महात्म्य निरोपिले | तेणे पार्वतीचे चित्त संतोषले | संतोषोनि पुसू आरंभिले | परमरहस्याते ||१३३|| इति गुरु महात्म्य

उत्तम | हे गुरु पुत्रासी गुह्य परम | तुं माझा भक्त म्हणोनि परम | निरोपिले वो देवि ||१३४|| इतिश्री परमरहस्य सारामृत | त्याची टीका करोनि प्राकृत | कृत कृतार्थ किंकर मन्मथ || पंचम अध्याय संपविला ||१३५||

इति श्रीपरमरहस्ये हर गौरी संवादे गुरुमहात्म्यनिरुपणं नाम
पंचमोध्यायः समाप्तः इलोक २७ ओव्या १३५



## अध्याय ६ वा

जयजय सद्‌गुरु परशिवा | सत् चित् सुखात्मका भवोद्‌भवा | परब्रम्हीचा तू निज ठेवा | तुज नमू ||१|| पंचम अध्यायाचे अंती | तुवा निरोपिले मुक्ति प्रति | पुढील ग्रंथ श्रवणी प्रिती | विरुढली हृदयी मम ||२|| ऐसे विनऊनी उठाउठी | गिरिजा अंकी बैसोनि गोमटी | आदरे प्रार्थुनिया धुर्जटी | प्रश्न करी ||३||

दे. उ. कोवा प्रकृतिकायश्च ज्ञानकायो यथा भवेत् ।
भेदं च किं द्वयोर्दैव किं बीजं कथयस्व मे ॥१॥

गिरीजा प्रश्न करी शंभुसी | प्रकृति काया ती कैसी | ज्ञान काया म्हणिजे कोण्हासी | हा बीजभेद निरोपा स्वामी ॥४॥ दोन्ही कायेचे सविस्तर | मज सांगावे भेदाकार | बीजा क्षराचाहि विचार | प्रकट कीजे मजलागी ||५||

शि. उ. विकल्पहीनशिष्यस्य श्रोत्रे बीजंच सद्गुरुः ।।
अव्यक्तं प्रोक्तवान् शुद्धं ज्ञानांगं तत् समीरितं ।।२।।

ईश्वर म्हणे अंबे प्रति । तुझे प्रश्न गहन असती । परि अज्ञान जनाचे चित्ती । प्रेमभाव प्रगटेल ।।६।। जो शिष्य शुद्ध प्राज्ञिक । सुज्ञ सुबुद्धि सुचित्त चोख । निरभिमानी सात्विक । भजन शीळ पैं ।।७।। ऐश्या सानुराग शिष्यास। श्रीगुरु निरोपिती श्रोत्री बीजास । मग अविद्या कल्पनेचा होय नाश । ते ज्ञान लक्षण युक्त काया ।।८।। तरीच गुरु मंत्र बीज । तयाचे कर्णीं राहे सहज । धर्म नीतीचे उदके काज । होती अंकूर बीजाते ।।९।। बीज विरुढला कर्णीं । पातकाची होय हानी । अव्यक्त ज्ञान मुरुनी । ज्ञानांगे दृढ होय ।।१०।।

शिवमंत्राक्षरं बीजं प्राप्तं येन गुरोर्मुखात् ।
स प्राणी ज्ञानकायश्च प्रकृतिप्रतिबिंबवत् ।।३।।

शिव मंत्र बीजाक्षर बरवे । ते उपदेशिले श्रीगुरु देवें । शुद्ध काया म्हणोनि सद्भावे । बिंबले तेथे ।।११।। ते सद्गुरुचे बीजाक्षर । जेथे बिंबले तेथे झाले ब्रह्माकार । प्रपंचाचा झाला संहार । म्हणोनि ज्ञानकाया बोलिजे ।।१२।। श्री गुरु उपदेशे करुन । अंतर्बाह्य गुरुचि झाला आपण । मग प्रकृति काया विरोन । ज्ञान काया जाहली ।।१३।। जैसे प्रथम होते सघन वन । नाना वृक्ष वेष्टित पेचन । ते शुद्ध

किजे सर्व छेदून । क्षेत्रा लागी कृषके ॥१४॥ पिकाचि लागी असे कृषि । नांगरोनि मोगडोनि धरी कुळवाडीसी । मग वनपण जाय क्षेत्र म्हणीजे त्यासी । बीजा योग्य म्हणूनिया ॥१५॥ तैसे अरण्य म्हणिजे । प्रकृति काया ती बोलिजे । षड्विकार वृक्ष सहजे । वन केले तेणे हे ॥१६॥ ते अनुताप कुऱ्हाडी धरुन । षड्विकारादि वृक्ष संहरण । करोनि शेतीचें आरंभण । पालव्या छेदून आशा मनिशें-चिया ॥१७॥ बुद्धि कुदळी खणोन । काम क्रोधादि खुंटे टाकिली छेदून । मग ज्ञान नांगर धरोन । वनाचे क्षेत्र केले ॥१८॥ गुरुने बीज देऊनी पिकविलें । वनासी शेत हे नांव पावले । तैसे प्रकृति शरीर ज्ञान काया झाले । श्रीगुरु कृपे करोनिया ॥१९॥ ते जाणिजे शुद्ध काया । न करी कर्मे-द्रियाची दया । सदा शुद्ध भावे गुरुराया । शरण असे वरिष्ट ॥२०॥ जया शुद्धकायेभीतरी । गुरु कृपेने बीजा-क्षरी । मंत्र संपादण्याची थोरी । देवा दिका दुर्लभ ॥२१॥ मंत्र साध्य झालिया विण । ज्ञान काया नोव्हे जाण । मंत्रा माजी पंचानन । शिव मंत्र असे पै ॥२२॥

प्रकृतिज्ञानकायश्च तथा भेदसमन्वितः ।
तत्तत् गुणेन भावेन ज्ञान कायस्तथा भवेत् ॥४॥

प्रकृति काया ज्ञान कायेसी भिन्न । जैसे पात्री वाढिले अ-पक्वान्न । क्षुधाक्रांत भक्षिता होय खिन्न । तैसी जाण प्रकृति

काय ||२३|| तेचि पक्वान्न पात्री वाढिला | जेवि तृप्ति होय तत्वता | तेवि ज्ञान कायेची वार्ता | समाधान पावतसे ||२४|| जरि प्रकृति ज्ञान काया दिसे भिन्न | ती प्रकृति काया लाभे ज्ञान | तरी तेचि बोलिली पूर्ण | ज्ञान काया ओ देवि ||२५|| ऐसी अज्ञान ते ज्ञान काया जाहली | तत्वमात्र सर्व बोलो ठेली | सकळ ब्रह्मत्वे स्थिती झाली | ती ज्ञान काया बोलिजे ||२६||

न जाग्रद्वा सुषुप्तोथ स्वप्नमज्ञान वृत्ति वा ।
दिवारात्रस्य न ज्ञानं न कालस्यापि कल्पनं ।। ५ ।।

ऐसी जे ज्ञान काया पाही | तया दिन रात्री काल कल्पना नाही | जरा मृत्यू जन्मांतर कांही | नुठेचि ते ज्ञान काया ||२७|| षडूर्मिषड्विकार | नाही तेथे द्वेष मत्सर | निर्लोभ निरहंकार | ती ज्ञान काया म्हणिजे ||२८|| आशा मनिशा तृष्णा | नाही भिन्न भाव भावना | अभेद भावे नातळे त्रिगुणा | ती ज्ञान काया बोलिजे ||२९|| काम क्रोधादि षड्विकार संग | नातळे जयाचे अनुमात्र अंग | नाही मी तू पणा कडसणी सांग | ती ज्ञान काया बोलिजे ||३०|| समाधानी सदाशांत | सदा संतुष्ट सदोदित | नाही हळ हळ पूर्ण भरित | ती ज्ञान काया बोलिजे ||३१||

यद्दिवा यच्च रात्रं च तथा कालस्य कल्पना ।।
प्रपंचमयभावश्च प्रतिबिंबेदृढं तथा ।। ६ ।।

अज्ञान काया म्हणिजे ऐक | जेथ स्वरुपाची विस्मृति | विशेख | अहंकृति जेथे निष्टंक | ती अज्ञान काया ||३२|| जे देही काळ कल्पना असे | दिन रात्र काळ कल्पना भासे | सदा प्रपंचाकार वर्ततसे | ती अज्ञान काया ||३३|| जैसे प्रति बिंब साच मानणे | तैसी प्रकृति काया म्हणे | येणे निश्चलार्थे वर्तणे | ते अज्ञान काया बोलिजे ||३४|| आता बहु काय बोलु ऐका | जे ज्ञान कायेचे लक्षण निरोपिले देखा | ते ज्या नसति आवश्यका | ती अज्ञान काया ||३५|| ऐसी ही कर्म ब्रह्म संपदा | तुज निरोपिली सुबुद्धा | तुवा हि असावे गौरी सदा | ज्ञान काया जाणोनि ||३६|| मज हि असे ज्ञान कायेचे कोड | अत्यंत त्या कायेची आवड | म्हणोनि तुवा हि असावे अखंड | ज्ञान काया होओनि ||३७||

फाले त्रिपुंड्रकं यस्य गले रुद्राक्षमालिका ॥
वक्त्रे षडाक्षरो मंत्रः स रुद्रो नात्र संशयः ॥७॥

तैसी जी ज्ञान काया सुचित | त्या कायेसी भाळी त्रिपुंड्र विभूत | चंद्रकोर विशेष शोभत | सद्रुप देवि ||३८|| भाळी त्रिपुंड्र मुखी बीजाक्षर मंत्र | कंठी रुद्राक्ष माळा शोभती पवित्र | ते साक्षात् जाणिजे महारुद्र | यासी संशय नाही ||३९|| मंत्रा वाचुनि मुख निर्फळ | मुग्ध पणे नसावी तळमळ | अमंत्रे क्षोभे जाइवनिळ | म्हणोनि समंत्रे पुजीका

||४०|| षडाक्षर मंत्रे विण | शिवार्चन निष्फळ होय जाण | षडाक्षराची उत्पती गुणभेद जाणोन | भजिजे शिव शिवभक्ति ||४१||

दे. उ. केन मंत्रेण वा पुजा कर्तव्या साधकोतमैः ।।
केन मंत्रेण सिद्धिस्यात् जपपुजादिकस्य च ।। ८ ।।

कोणत्या मंत्रे करावी पुजा | ऐसे विचारितसे गिरिजा | कोण मंत्र जप सिद्धि बीजा | नंदी ध्वजा सर्व सांगा ||४२|| महा मंत्र सप्तकोटी | असती जाण धुर्जटी | तुम्ही कथीले परमेष्टी | तें श्रवण मज झाले ||४३||

शि. उ. स्नात्वां सामान्य अर्घ्यादि संस्थाप्याप्यूपचारकैः ।।
पंचाक्षरेण मंत्रेण अर्चितव्यो महात्मभिः ।। ९ ।।

शिव म्हणे ओ देवी | तुझी पृच्छा असे बरवी | जेथे अज्ञानाची गोवी | जाय गळोनी ||४४|| शुद्ध स्नान करुनि जाण| महा मंत्रे करावे ध्यान | अर्घ्य पाद्य पात्रे करुन | आरंभावे संकल्पा ||४५|| नित्य संकल्प होता पूर्ण | मग करावे माझे ध्यान | ध्याना सरिसे प्रार्थुन | शुभ्रासनी बैसवावे ||४६|| मग अर्घ्य पाद्य होता मान्य | घालावे शुद्धोदके स्नान | वस्त्रालंकारे गौरवून | परिमळ धूपा अर्पावे ||४७|| पात्री नैवद्य षड्सान्न | समर्पावे भावे करुन | एकारती दीपा ओवाळून | ध्यान स्वरुपी लावावे ||४८|| ही पुजा करकमळी | करीतसे वीर मंडळी | पुजा होता पुष्पांजळी | वेद मंत्रे करीतसे ||४९|| महामंत्र षडाक्षरी | जपालागी झडकरी | एकाग्रतेचि यापरी | वैखरीने

उच्चारीका ||५०|| हा मंत्र ऐकता कर्णी | मी सदा होतसे ऋणी | जी इच्छा जापकाचे मनी | आनंदे पुरवीतसे ||५१||
पंचाक्षरी महा मंत्राची थोरी | वर्णिता न वर्णवे निर्धारी | सप्तकोटी मंत्राच्या पुढारी | उद्धारक जगताचा ||५२||

दे. उ. पंचाक्षरस्य चोत्पतिः पंचाक्षरगुणस्तथा ॥
पंचाक्षरस्य वा भेदा ब्रूहि मे परमेश्वर ॥ १० ॥

गिरिजा म्हणेजी शंकरा | कैसी षडाक्षराची उत्पत्ति दातारा | गुणभेद कोण परमेश्वरा | निरोपा स्वामी ||५३||

शि. उ. यथाक्षेत्रस्य बीजस्य संबधः फलदस्तथा ॥
तथा शिष्यस्य कर्णे तु मंत्रः पंचाक्षरो मतः ॥११॥

शंभू म्हणे ओ गिरीजे | तुवा गुह्य पुसिले जे | त्यास दृष्टांत निरोपिन जे जे | ते तूं बरवें परीस देवी ||५४||
जैसी क्षेत्र बीजा पडे गाठी | ते पिक असंभाव्य उठी | तेवि षडाक्षर श्रोत्र क्षेत्रा भेटी | होता पिके अपार ||५५||

तच्छिष्यज्ञानक्षेत्रें तु कर्णद्वारे तु सद्गुरुः ॥
तन्मंत्रबीजमव्यक्तं तच्च क्षेत्रसमन्वितं ॥१२॥

शिष्याचे क्षेत्रज्ञान देह जाणिजे | त्याचे श्रोत्र ते द्वार म्हणिजे | तेथे शिवमंत्र बीजाक्षर ओजे | पडता पीके अपार ||५६||

बीजं तद्द्विविधं ज्ञेयं मंत्रन्यासविभेदतः ॥
एको दीर्घस्तु यः कुर्यात् पंचमाशक्तिमाश्रयेत् ॥१३॥

मंत्र बिज दोन रुपी | न्यास बीज विघ्ने थोपी | ऱ्हस्वदीर्घ उच्चार अर्पी | पंचमशक्ति कारणे ||५७|| तया बीजाचे रुप द्विविध | पंचाक्षरी षडक्षरी प्रसिद्ध | उभया एका प्रणवाचा भेद | उत्पतीस कारण तोचि पै ||५८|| न्यास भेदाकुन | बीजभेद झाला जाण | पंचाक्षर षडाक्षर म्हणोन | प्रसिद्धिसी पावले ||५९|| त्या बीजाचे रुप द्विविध भासे | षडाक्षरी बोलिला असे | पाहता पंचाक्षरी मिश्रित वसे | ॐकाराचे पोटी ||६०|| ॐकारा पासुनि अक्षराच्या हारी | त्या माजी निवडून काहडीला पंचाक्षरी | तोचि निर्णय निरोपु अवधारी | ऐक चित्त देओनिया ||६१|| ओंकारा पासुनि सर्व वर्ण | उत्पन्न झाले ते बावन | तया मध्ये मुख्य जाण | तयाचे दशद्वय भेद ||६२||

अक्षरादि तवर्गांतं पवर्गांतं शुभानने ।।
शिकारोथ यवर्गांतं मवर्गांतं बभूव तत् ।।१४।।

ऐक अक्षराचा भेद | पंचाक्षरी असे संबंध | पन्नास अक्षरातून बीज बोध | काढिला तो ||६३|| त काराचा अंत नकार | प वर्णाचा अंत मकार | य वर्गाचा अंत शकार | ऐवं तिन्हीहि ॐकारा पासाव ||६४|| थांतस्थ न कार | तो संयोजिला सहअकार | मवर्गादिस्थ यकार | पंचाक्षरी विनटला ||६५||

दांतं वांतं च यांतं तु तृतीयस्वरभूषितं ।।
लांतं यातसमायुक्तो मंत्रः पंचाक्षरो भवेत् ।।१५।।

द काराचां अंत न कार | य काराचा शेवट तो मकार |
य वर्गांतस्थ शकार | इ स्वराने अंकिला ||६६|| तेवि य
वर्गाचा जो अंत्य | अकारादेशे वर्ते सत्य | जेणे घेतलेसे
य वर्गाधिपत्य | तोहि येथे घेतला ||६७|| एवं पंचाक्षरी
विस्तार | एका प्रणवा पासोनि साचार | जे का सप्तकोटी
मंत्राचे सार | वर्णिले शास्त्री ||६८|| ऐसी ही पंचाक्षरे
गोमटी | असती प्रणवाचिया संपुटी | ती प्रगटली भक्ति
सुखासाठी | वीरशैवा कारणे ||६९||

हृयेष पंचग्रक्षरी मंत्रःसर्वश्रुतिशिरोगतः ।।
प्रणवेन समायुक्तो षडक्षर इहोच्यते ।। १६ ।।

आता निरोपीला जो पंचाक्षरी | तोचि ओंकारा सहित
षडाक्षरी | जैसा द्विविध झाला निर्धारी | ते तुज निरोपु
आता ||७०||

त्वदीयप्रणवं चैव मदीयप्रणवं तथा ।।
एतद्धि देवि मंत्राणां शक्ति भूतं न संशयः ।। १७ ।।

षडाक्षरासी तुझी माझी शक्ति | म्हणोनि मंत्रासी बळ
असे निगुति | तो षडाक्षर मंत्र बोलिला स्थिती | ॐकारा
सहित ||७१|| त्याॐकारा उभयाची शक्ति | अर्ध भाग
तू अर्ध मी निश्चिती | म्हणोनि मंत्रासी सामर्थ्य स्थिती |
प्राप्त असे ओ देवि ||७२||

उकारश्च मकारश्च अकारः प्रणवो मम ।।
अर्धमात्रा स्वरुपात्वं शक्तिभूतासनातनी ।। १८ ।।

अकार उकार मकार । हे माझे अंश साचार । परि तुझे संबंधे उच्चार । होत असे मम सत्ते ॥७३॥ ही तीन बीजे स्वतंत्र । या वासाव कर्मे चालती सर्वत्र । तेथे तुझाहि संबंध असे पवित्र । अर्ध मात्रेच्या रुपाने ॥७४॥ या लागी प्रणव द्वितीय बोलिजें । माझा अंश संबंधे तुझ्या उच्चारिजे । म्हणोनिचि मंत्र म्हणवी ओजे । ॐकारु हा ॥७५॥ याचा भेद न कळे कवणासी । हे दुर्लभ मुमुक्षु जनासी ॥ हे जाणे जो जंगम बोलिजे त्यासी । पवित्र सत्य शरण ॥७६॥ तया जंगमी तुझे माझें दिसे-। अंश संबंधत्वे तेंथ वसे । उभय संयोगे जंगम असे । सत्य जाण पार्वती ॥७७॥

षडाक्षरसमाख्यातं षडाननमुदीरितं ॥
षड्भेदं यो न जानाति पूजा तस्य तु निष्फला ॥१९॥

षडाक्षराची उत्पती षण्मुखी । ती षण्मुखीची ऐकता निकी । जाणोनि जप करी जो सुखी । जंगम अथवा भक्त ॥७८॥ षडाक्षरी मंत्रा सारिखा मंत्र नाही । कार्तिक स्वामी सदा जपत राही । षड्भेद जाणोनि लवलाही । पुजा कीजे एकाग्र ॥७९॥ याचा भेद न कळे कोणा । दुर्लभ असे अज्ञ जना । गुह्य जाणे शिष्यराणा । जंगम मुखे करोनिया ॥८०॥ एंव लिंग पुजका वाचोन । न होय षडाक्षर साधन । श्रीगुरु मुखे करोनि ग्रहण । करिता जप सिद्धी होय ।

॥८१॥ याचा भेद नेणोनि पुजाकरी । त्याची पुजा निर्फळ होय अवधारी । तोहि अज्ञानियाचा पुढारी । गुरु पुत्र नव्हे तो ॥८२॥ षड्चक्रा चे स्वरुप सरोभरी । तुवा पुसिले गौरी । निरोपिन पुढारी । चक्राक्षर भेद ऐक आता ॥८३॥

षडाक्षराणि क्रमशः चक्रबीजानि वै यथा ।
चक्रबीजाक्षरज्ञाता दुर्लभो भूवि पार्वती ॥२०॥

ही सहा अक्षरे षड्चक्रासी । अधार असती त्या कर्मासी । तयाविण गति चक्रासी । कदाकाळी असेना ॥८४॥ कोण चक्री कोण अक्षर । हा असे शिवयोग विचार । जो वर्ते पूर्ण जाणोनि साचार । दुर्लभ ऐसा सत्य, शरण ॥८५॥ ज्याने देही षड्चक्रे भेदिली । तेणे ब्रह्मांडे सर्व जिंकली । वर्णाक्षरोत्पत्ति वहिली । ऐक गिरीजे सावध ॥८६॥

एकेकाक्षरतो जाताः पंचपन्चाक्षराः पुनः ॥
गुह्यं हि परमं ह्येतत् ज्ञायते श्रीगुरोर्मुखात् ॥२१॥

एका एका अक्षराचे ठाई । पांच पांच उद्भवली अव्ययी । संहार काळी पावती लई । पंचाक्षरी सर्व वर्ण ॥८७॥ ऐसी ही अक्षरे पंच प्रकारी । वर्तता आपु आपुलिया परि । हा भेद जाणावा चतुरी । श्रीगुरु मुखा पासोनि ॥८८॥ ती पंचाक्षरे परस्पर । पावन करीती चराचर । अंती समावती सत्वर । निज स्वरुपी सदा ॥८९॥

दे. उ. ज्ञानदेहः समाख्यातः षडाधारेणसंयुतः ।।
तद्बीजाक्षरभेदश्च क्रमेण कथयस्व मे ।। २२ ।।

शिवा प्रति पार्वती पुसे । ज्ञान काया जी षड्चक्र युक्त असे । तरी कोण्या चक्री कोण अक्षर वसे । ते निरोपावे स्वामिया ॥९०॥ षड्चक्राचे मुख्य बीज । निवडोनि सांगावेजी मज । तरिच होय महत्काज । अपराधी जीवाचे ॥९१॥

शि. उ. अधाराख्ये न कारं स्यात् स्वाधिष्टानें मकारकम् ।।
शिकारम् मणिपुरे च वाकारम् तु अनाहतें ।। २३ ।।

आधारस्थाना माझारी । चतुर्दळ कमळा भीतरी । नकार बीज वस्ती करी । अपान शक्ति बोलिजे ॥९२॥ स्वाधिष्टान असे उत्तम । षड्दल कमल असे अनुपम । मकार बीज सर्वोत्तम । तेथ राहे प्रितीने ॥९३॥ मणिपुरीची एक मौज । दशदलावरी पेरिले बीज । शिकाररुपी वर्ते सहज । समान वायु तेथीचा ॥९४॥ अनुहत ते हृदय जाण । जेथे वकाराचे अधिष्ठान । द्वादशदळी अंगुष्ट प्रमाण । प्राण वायू वसतसे ॥९५॥

विशुद्धौ तु यकारम् स्यादाज्ञायां प्रणव एव हि ।।
एवम् बीजाक्षरम् स्थानं ज्ञानकाया प्रकीर्तिता ।। २४ ।।

विशुद्धि हेचि तालु मूल । जेथे कमळ असे षोडशदल । यकार बीज हे अमल । उदाने ते रक्षिले ॥९६॥ अग्नि स्थान तेचि ललाट । त्रिदले [illegible] [illegible] औगोल्हाट । ॐकार

मूळ औटपीठ । चंद्र प्रभा तया वरी ॥९७॥ तेथे कोटी सुर्याची प्रभा । परम हंस शिव उभा । स्वानंदाचा पूर्ण गाभा । दमदमीत ॥९८॥ देव गंधर्व यक्ष गण । किन्नर नारद तुंबरु जाण । स्तिमित होती तया देखून । स्थिर मौन निचेष्ट पै ॥९९॥ ऐसी ही साही अक्षरे । तुज निरोपिली नाना प्रकारे । सर्वहि एक वटली एका कारे । सातवे अक्षरी ॥१००॥ सातवे ते निराक्षरिक । ज्या शरीरी याचा असे विवेक । ती ज्ञान काया बोलिजे सम्यक । ऐक आता शैलात्मजे ॥१०१॥ जेव्हा सहस्रदळ कमळ । महालिंग वसे निर्मळ । तेथे समरसे सकळ । ज्ञान कळा ॥१०२॥ ऐसी ज्ञान काया ज्या पुरुषाची । तो कळा जाणे वस्तुलिंगाची । तया कळे माजी रमे सदाशुचि । उत्तम जंगम तो ॥१०३॥ ऐसे ऐकता पाहता डोळा । परम कळवळे हिमनग बाळा । हंक्षं तत्वाचा सोहळा । गर्जे घोष अहं सोहं ॥१०४॥ श्री परमरहस्ये ग्रंथानुवादे । उमा महेश्वराच्या संवादे । षडाक्षर पंचाक्षर दोन भेदे । वर्णिले ज्ञान भाविका ॥१०५॥ इति श्रीपरमरहस्य सारामृत । त्याची टीका करोनि प्राकृत । कृत कृतार्थ किंकर मन्मथ ॥ सहावा अध्याय संपविला ॥१०६॥

इति श्रीपरमरहस्ये हर गौरी संवादे पंचाक्षर षडाक्षर भेद निरुपणं नाम षष्ठमोध्यायः समाप्तः श्लोक २४ ओव्या १०६

## अध्याय ७ वा

श्रीगुरवे नमः । सहावे अध्यायी संपूर्ण । कथिले षड्चक्र ज्ञान । पंचाक्षर षडाक्षर महिमान । अत्युत्तम वर्णिले ॥१॥ षड्लिंगाचे भेद सहा । दाखविले कृपे पहा । त्या माजी चित्हृद् गुहा । प्रवेशले स्वभावे ॥२॥ तेणें वस्तुची लागली गोडी । न उठे दृष्टी झाली वेडी । परात्परा पहाता थोकडी । बुद्धि वैखरी निमग्न ॥३॥

दे. उ. किं वा वस्तु कथं जातं ग्राहचं वा केन तत्पुनः ॥
कला स्थानं तथा रुपं ब्रूहि मे परमेश्वर ॥ १ ॥

वस्तु म्हणजे कोण कैसी । कवणे परि जाणावे तियेसी । कैसी कळा स्थान सकळासी । ते निरोपावे स्वामी ॥४॥ जी कळा अगम्य सकळा । ती मज निरोपावी दयाळा । म्हणोनि ती हिमनग बाळा । चरणी लागली सांबाच्या ॥५॥

शि. उ. वस्तुत्वगम्यमव्यक्तं निर्गुणं निश्चलं तथा ॥
अगम्यं वेदशास्त्रैश्च तत् कलापि च पार्वती ॥ २॥

शंकर म्हणे ओ गिरीजे ऐक । तुवा प्रश्न केला सुखदायक । माझे उल्हासले निजसुख । तुझ्या प्रश्ने करोनिया ॥६॥ कोण्ही म्हणती प्रश्नें सुख उल्हासले । पहिले काय होते ते मुराले । यया बोला अखंडत्व खंडले । तया चित् सुखाचे ॥७॥ तरी यास दृष्टांत देईन । जैसा कुंडा माजी

असे अग्न | घृतधारा पडता तो हुताशन | दैदिप्यमान होय पै ||८|| जरि कुंडा माजी अग्नि नसे | तरी घृते रक्षा काय प्रकाशे | असे म्हणोनिचि प्रकाशतसे | घृत धारे सरिसा ||९|| तैसे पार्वती प्रश्नाचेनि मिषे | उल्हासले वस्तु ज्ञान प्रकाशे | तथा वस्तु कळेस उल्हासे | निरोपिता झाला ||१०|| शंकर म्हणे पार्वतीस | तुवा वस्तु पुसिली व्यापक सर्वास | परि ते सद्गुरु वाचोनि कोणास | न कळेचि सर्वथा ||११|| अग्नि चक्राचे पैल तिरी | मसूर प्राय छिद्रा भितरी | विलोकिता अमर पुरी | दृष्टी गोचर होतसे ||१२|| तेचि पाहता पाहता जाण | अचल भासे वस्तु निर्गुण | सांगता नये गुढ मौन | गुरु कृपे ओळखावे ||१३|| ती वस्तु कळा अगम्य अगोचर | ती व्यक्तातीत अव्यक्त अपार | ती निरवयव निराकार | वस्तु पुसिली त्वा ||१४|| ती वस्तु निरामय निर्गुण | अढळ ढळेना निश्चळ जाण | अनंत कोटी निमाले भान | जया वस्तु प्रकाशी ||१५|| जेथ वेदशास्त्रासी पडे मौन | जें ज्ञानातीत विज्ञान | ते अनिर्वाच्य न वदवे वाचेकडून | नये जप तप धारणेसी ||१६|| वस्तु देहामाजी अमरत्वें असत | परि देहि असोनि देहासी अतीत | गुरु कृपे प्रगटलिया निर्भ्रांत | देहबुद्धि नाशित ||१७|| जैसा अग्नि काष्टी असता | परि तो कष्टासी न दाही

तत्वता | अरणी मिषे प्रगटलिया नासिता | होय सगळीया काष्टाते ||१८|| तेवि गुरु कृपा अरणी संबंधे | वस्तु कळा प्रगटे स्वानंदे | मग देह बुद्धि नासे स्वच्छंदे | क्षणा माजि तत्वता ||१९||

यथाग्नौदाहकत्वं च यथा क्षीरे घृतं स्थितं ॥
यथा तिले स्थितं तैलं सर्वस्थाने तथा कला ॥ ३ ॥

म्हणोनि काष्टि जेवि अग्नि असे | की घृत क्षीरा माजी वसे | तेवि वस्तु सर्व देही दिसे | ज्ञानियासी ||२०|| जेवि तिळा माजी तैल | की पुष्पी असे परिमळ | तेवि वस्तु कळा सकळ | व्याप्त असे साकारी ||२१|| आकार तो भ्रम भासत | पाहता निराकारची असत | जरि थिजोनि घृत आकारत | तरि घृतपणा मुकेल काय ||२२|| तैसी वस्तु वस्तु पणेची असे | आकार तो भ्रम बुद्धि भासे | जैसे निद्रेचेनि सौरसे | काय एक न देखिजे ||२३|| परि ते जागृति सरिसे | स्वप्नीचा सर्वंहि अभास नासे | तेवि आकार जो जो दिसे | तो नासे वस्तु प्रकटलिया ||२४|| ती वस्तु कळा प्रकटे कैसी | म्हणसी तरी ऐक त्या विवेकासी | एका ज्ञानिया वाचोन कोणासी | न कळेचि वस्तु ती ||२५|| तू म्हणसी बाळिया भोळीयासी | ज्ञान कैसे होय त्या अबलासी | तोहि उपाय निरोपिन तुजसी | अभ्यास योगे ||२६|| अष्ट प्रहरामाजी एक निमिष | एक

निष्ठे भजिजे धरुनि विश्वास । मग निमिषो निमिषी प्रकाश । लाहिजें अभ्यासे ॥२७॥ जे निमिषे निमिषे भजन सुख घडे । तितुकेंचि भव दुःख विघडे । इकडे भजन जितुके चढे । तितुके झडे पापहि ॥२८॥ भानु निमिषे निमिषे पै चढे । तैसा तैसा प्रकाश मांडे । मांडता मांडता माध्यान्हीया कडे । पाहोशके कोण तो ॥२९॥ तेवि भजन नित्य नित्य चढता । शिवत्वाच्या माध्यान्ही येत तत्वता । मग त्या कडे सर्वथा । कळिकाळ पाहु न शके ॥३०॥ निमिषो निमिषी भजता । तो सुख चढतसे चित्ता । मग चित्त चैतन्य तत्वता । होओनि ठाके ॥३१॥ नदी चढता तरी दिसत नाही । परि चढता भेदि दरडिया पाही । आच्छादुनि कांहीना बाही । पाणी चाले अमाप ॥३२॥ तेवि निमिषे भजन दिसे थोडे । परि संतोषे चढता होय गाढे । तेणे भजने परमात्मा आतुडे । मा ज्ञान बापुडे नये केवि ॥३३॥ तरी एक निमिष लक्ष लाओन । एक चित्ते केलिया स्मरण । तितुकियानेच होय पावन । ऐसे न घडेचिका ॥३४॥ जैसे कीजे नामस्मरण । तैसी येई अंगी शांती पूर्ण । शांती योगे अक्षय ज्ञान । येई हाता क्रमाने ॥३५॥ भाव ठेवोनिया पूर्ण । जे जे किजे नामस्मरण । ते ते किजे गुरुसी अर्पण । निष्काम बुद्धि ॥३६॥ येणे परि भजन भक्ति करिता । सहज वस्तु कळा ये हाता । मग स्वये होय वस्तुता । परि भजन

न सोडिजे ॥३७॥ भजन करोनिया काय । जरी जीवा दुःख देणे होय । तरि ते भजनचि न होय । विषम पडे म्हणोनि ॥३८॥ इकडे माझी पुजा करोनि बरवे परी । तिकडे जीवाची हिंसा करी । तरी त्याची पुजा कैसी घेऊ अवधारी । मुखी घास माथी डांग ॥३९॥ म्हणोनि सर्व जीवी निर्वैर व्हावें । सर्व जीवी वस्तुसी देखावे । काया वाचा सुख द्यावें । सर्व जीवासी ॥४०॥ सर्वत्र व्यापक वस्तुची कळा । सर्व जीवा वस्तुचा जिव्हाळा । काष्टी अग्निची ज्वाला । गुप्त जैसी ॥४१॥ तैसी वस्तुची कळा जाण । सर्व देही असे व्यापून । क्षिरी घृत की तिळी तैल भरोन । सर्वांगी असे ॥४२॥ तैसी वस्तु सर्वत्र असे । ऐसे जाणोनि भजे विश्वासे । मग वस्तुच होईजे अपैसे । भक्ति मार्गे वो देवि ॥४३॥ म्हणोनि भक्ति मार्गी वर्तता । वस्तु सहजची ये हाता । मग स्वयेचि होय वस्तुता । श्रीगुरु कृपेने ॥४४॥ ती वस्तु सर्वत्र व्यापक असे । सर्व देही तीची कळा वसे । तुज सुक्ष्मत्वे सांगतसे । व्यापक वस्तुती ॥४५॥

ज्वालाकालानलाभासा तडित्कांचनसुप्रभा ॥
तत्कोटिभास्वरा दिव्या चिद्रुपा परमा कला ॥ ४ ॥

जैसी अग्नि ज्वाला सुक्ष्म असे । प्रकाश रुपे लखलखीत दिसे । तैसी वस्तु कळा सर्वत्र वसे । चिद्रुपाकार ॥४६॥

ती वस्तु कळा सर्व ज्ञान रुप । होओनि असे सूक्ष्मत्वे अमूप । परि श्रीगुरु विण निज स्वरुप । न भासे कोणासी ॥४७॥ न भासे म्हणो तरि काय एकांग दिसे । एकांग न भासे तरि काय नसे । ऐसे विषमत्व कायी असे । वस्तुसी त्या ॥४८॥ वस्तु तरी सबरा भरीत । आपाद शिखा पर्यन्त । भरिली असे सदोदित । भरिले पणे विणे ॥४९॥ भरिले म्हणो तरी रिते होते काये । तरि भरले पण म्हणो लाहे । पाहता रिते भरिले आहे । वस्तुसी काय ॥५०॥ म्हणोनि ते भरिवचि आहे सर्वांगे । परि भरिला ऐसे जे बोलिलो मागे । ते बोलावेचि लागे निरुपणांगे । बोधावया नि:संशय ॥५१॥

वाचातीतं मनोतीतं वर्णातीतं च तत्पदं ॥
ज्ञानातीतं निरंजन्यं कलासौक्ष्म्यं तु भावयेत् ॥५॥

जी सर्वत्र जाणती कळा । तीची ही साजे अत्यंत सुक्ष्म कळा । ती माजी निमग्न सकळा । वाचादिका सर्व हि ॥५२॥ परा पश्यंति मध्यमा वैखरी । वाचा निमाल्या जेथ चाऱ्ही । आता विचारावे कवणे अक्षरी । विचारी पा ॥५३॥ जेथ पन्नास अक्षरा पुसिली लीप । मा कैचा तेथ वेद स्वरुप । श्रुति स्मृतिहि माप । करु सरली ॥५४॥ मा शास्त्रा आणि पुराणाते । कोण पुसे हो तेथे । वाचावे सांगावे ज्या मनादिकाचे हाते । ते मनचि निमाले ॥५५॥ आता वर्ण व्यक्तिचा [illegible] । केवि साजे हा भेद विकारु ।

ते तत्पद निर्विकारु | ज्ञानासी अतीत ||५६|| अज्ञान छेद करी | म्हणोनि की ज्ञानाची थोरी | जेथ अज्ञानची नाही मा ज्ञान कोणे परी | मिरऊ शके ते ||५७|| सूर्यासी अंधार मुळीचि नाही | मा सायास करावे काही | अंधकार दूर करावा ठाई | ठाया वरुनी ||५८|| तेंवि वस्तुचे ठाई काय अज्ञान आहे | मा तेथे ज्ञान मिरऊ लाहे | म्हणोनि निरंजन कळा पाहे | ज्ञानासी अतीत ते ||५९|| जी अत्यंत सुक्ष्म कळा जाण | ती माजी गेले सर्व निमोन | ऐसी वस्तु कळा लिगांची विवेचुन | निरोपिली तुज देवी ||६०||

एषा वस्तुकला देवी सद्गुरुः शिष्यमस्तके ।।
हस्ताभिमर्षनं कृत्वा बोधयेत् तत्वरूपतः ।। ६ ।।

ऐसी सुक्ष्म वस्तुची कळा जाण | गुरु उपदेशिती मस्तकी हस्त ठेवोन | जैसा हस्त तैसी कळा उत्पन्न | होय शिष्या चैतन्य ||६१|| जैसी अंधकारी लागली ज्योति | तैसिच होय देह स्थिति | अज्ञान जाउनी मागुति | ज्ञान बुद्धि उप्जत असे ||६२|| ज्या गुरुची जैसी उपदेश कळा | शिष्या तैसीच ये भाव लिला | जैसे बीज तैसे येतसे फळा | वृक्ष जेंवि ||६३|| घरोघरी गुरु म्हणविती | शिष्या स्वार्थे उपदेशिती | परि वस्तु कळा जे बोधिती | ते सद्गुरु जाणावे ||६४||

यथा कला तथा भावो यथा भाव स्तथा मनः ।।
यथा मनस्तथा दृष्टिर्यथा दृष्टिस्तथा लयः ।। ७ ।।

म्हणोनि जैसा उपदेशी गुरु भेटे। तैसीच ती कळा प्रगटे। जैसी कळा तैसा भाव उमटे। शिष्य चैतन्यी ॥६५॥ जैसा भाव तैसेचि होय मन। जैसे मन तैसी दृष्टी होय जाण। तैसीच लयगत राहे होऊन। स्मरणी भजनी ॥६६॥ एंव भाव मन दृष्टी तिन्ही। एकमते वर्तती म्हणोनि। लय लागे निश्चये करुनि। शुद्ध कर्मी जीवासी ॥६७॥ जैसे भजन तैसे फळ घेईजे। जैसे फळ तैसे भोग भोगिजे। जैसा भोग तैसे पाविजे। सुख अथवा दुःख ॥६८॥ या सर्वासी मूळ कारण। श्रीगुरुचि असे जाण। आपला कुल धर्म जाणोन। सद्गुरु कीजे स्वधर्मीचा ॥६९॥ गुरु अनेक कळेचे असती। तरि त्यासी गुरुचि म्हणति। परी जे ज्ञानकळा जाणती। तेचि सद्गुरु जाणावे ॥७०॥

कर्णे वाक्यं करे लिंगं दत्वा संबोधयेद्गुरुः ।
इष्ट प्राणस्तथा भावलिंगानामैक्यतत्वतः ॥ ८ ॥

सत् शिष्याचिया कर्णद्वारी उपदेशिती। महावाक्य बीज निश्चिती। मग हस्तकी लिंग देती। कृपाळुत्वे श्रीगुरु ॥७१॥ श्रीगुरु इष्ट लिंग देऊनि पाहे। काय बोलती शिष्या स्वहित लाहे। हा इष्ट आणि प्राणलिंग पाहे। या तिही लिंगा ऐक्य भावलिंग तिसरा तो ॥७२॥ याच्या ठाई गुरुत्वेचि भजावे। भेद सांडोनि भावे। राहवे। गुरु वचनी निष्ठा धरोनि ॥७३॥

दे. उ. लिंगभक्तिरितिख्याता गुरुहस्त समुद्भवा ॥
कथं प्राणेन संमिश्रा कथयस्व ममानघ ॥ ९ ॥

गुरुच्या हस्तकी लिंग भक्ति । उत्पन्नली तीची निरोपा ख्याती । तेथे कैसे मिश्रित असती । देह प्राण आणि लिंग ॥७४॥

शि. उ. वपुर्यदा समुत्पन्ना तदा प्राणेषु मिश्रिता ॥
गुरुकरजातलिंगं तु शिष्यप्राणेषु मिश्रितं ॥ १० ॥

प्राण देह संयोगे उत्पन्नाला । तो प्राण देह संयोगे मिश्रित झाला । त्या देही संयोग घडला । इष्ट लिंगाचा ॥७५॥ जो गुरु हस्तकी लिंग जन्मला । त्यासी देह संयोगे प्राण मिश्रित केला । तोचि भक्ति संयोग झाला । जाणिजे ओ पार्वती ॥७६॥

तत्प्राणो लिंग देहश्च जातो गुरुकरेऽप्यथ ॥
ज्ञात्वैक्यमेतयोः सम्यक् भजते ज्ञानवान् पुमान् ॥ ११ ॥

प्राणलिंग गुरु हस्तकी जो जन्मला । त्यासी ऐक्य जो लिंगदेहि बोलिजे त्याला । या परि लिंगभक्ति लाधला । तोचि ज्ञानी पुरुष ॥७७॥ त्या पुरुषानें षड्लिंगी भावे । ऐक्यत्वे पुजन करावे । मिश्रित होओनि भजे स्वभावे । तो गुरुकर जात बोलिजे ॥७८॥

आचारं गुरुलिंगं च जंगमं च प्रसादकम् ।
महालिंगं तु विज्ञेयं षड्विधं [illegible] ॥ १२ ॥

ते षड्लिंग म्हणसी कोण कोण । आचार लिंग गुरुलिंग जाण । शिवलिंग जंगम लिंग ओळखण । चतुर्थची बोलिजे ॥७९॥ प्रसाद लिंग प्राण लिंग नेमुन । ही महालिंगें बरवी जाणून । जो मिश्र भावे करी पुजन । तोचि भक्त जंगम तोचि ॥८०॥

मिश्रभाव समायुक्तं पुजा गुह्यं तु तत्वतः ॥
अज्ञात्वा कुरुते यस्तु पुजा तस्यच निष्फला ॥ १३ ॥

जो हा मिश्र पुजनाचा प्रकार । अति रहस्यमय साचार । जाणोनि करिजे पूर्ण आचार । गुरु मुखे करोनि ॥८१॥ जो न जाणताचि पुजा करी । त्याची व्यर्थ जाय पुजा पत्री । त्याचा प्रसाद तोहि अवधारी । निष्फळ होय ॥८२॥ जो आचार संपन्न शिवगण । तो वीरशैव शिवयोगी पूर्ण । तोचि जाणतो या मार्गाची खूण । येरा न कळे ओ देवि ॥८३॥ जो करी प्राण लिंगी मिश्रित । तिन्ही मिश्रित करोनि वर्तत । तोचि जाणिजे शिवभक्त । सत्य सत्य पार्वती ॥८४॥

दे. उ. भगवान् तापस श्रेष्ठ तपो मार्गं निरुपय ॥
येन पाशनिवृतिस्या द्वीरशैवाध्ववर्तिनां ॥ १४ ॥

देवी म्हणे देवाधिदेवा । तपश्चर्येचा मार्ग दाखवा । ज्या नियमे उद्धार व्हावा । पशू जीवांचा ॥८५॥

शि. उ. त्रिदिक्षा संयुतो मर्त्यः शांति दांति समन्वितः ॥
गृहं त्यक्त्वा वनं गच्छेत्तपस्तप्तुमथारंभेत् ॥ १५ ॥

श्रीशंकर हास्य वदने करुन । सांगु लागले तपो विज्ञान । पार्वती ते सावधान श्रवण । चित देऊनि करितसे ॥८६॥ तपश्चर्या योग कठीण । न साधे संसारी राहुन । त्या कारणे सेवावे वन । योग सिद्धी होय मग ॥८७॥ तपश्चर्ये कारणे प्राणी । असावे सावधान अंतःकरणी । ध्यावया लिंग पुजेची आवरणी । दिक्षे प्रति साधिती ॥८८॥ त्या दिक्षा त्रिविधा असती । क्रिया मांत्री वेधा निगुती । गुरु कृपे सहज स्थिती । प्राप्त होती कुल क्रमें ॥८९॥ शिव दिक्षा झाल्या विण । जो मुढ करी शिवपुजन । तो पामर जीव म्हणून । देव पूजन न घेती त्याचे ॥९०॥ दिक्षावंत भक्त पवित्र । सदा मुखी जपे शिवमंत्र । तो असे स्वतंत्र । शिवानुष्ठाना कारणे ॥९१॥ तेणे आसन ध्यान भस्म धारण । गळा शोभे रुद्राक्षाभरण । सदा शुचि वस्त्र परिधान । करावा जप महामंत्रे ॥९२॥ मंत्र जपा लागी जाण । तपनी घाली आसन । नित्य नेम झालिया विण । स्थान चालन न करावे ॥९३॥ उत्तम आसनी बैसून । करावे मन ते उन्मन । चित्त चैतन्या व्यापून । ज्ञान मुद्रा साधावी ॥९४॥ तेणे होय ज्ञान दृष्टी । सम पाहावी सर्व सृष्टी । तेणे कर्म सुटे उठा उठी । जन्मलिया वेळीचे ॥९५॥ निष्कर्म जीव होता जाण । न करी कोणासी संभाषण । शत्रु मित्र जया समान । उदार शीळ तापसी ॥९६॥ जयाचे वैखरी शिव मित्र । हृदयी मुराला

अहंभाव। सर्वेचि विज्ञान संभव। आकळून राहतसे ॥९७॥ कर्तुमाकर्तुमन्यथा कर्तुमाची शक्ति । प्राप्त होय सहज गती। तया सत्य देव मानिती। पूर्ण वस्तु म्हणोनिया ॥९८॥ हा माझा राजयोग उत्तम। मानवा शिव प्राप्तीचा क्रम। सांगितला तुज पूर्ण नेम। अचरावा सत्य पै ॥९९॥ दुसरा मार्ग असे भजन। निर्भय पणे आनंदून। करीत असावे रात्रंदिन। दुजी चिंता नसावी ॥१००॥ अबला जना हे सुलभ। गर्वरहित होओनि गर्जवी नभ। तनु मन धने करिता दुर्लभ। सिद्धि प्राप्त होती त्या ॥१०१॥ स्वधर्मी ठेविता विश्वास। पुण्य घडे तया विशेष। मोक्ष प्राप्ती अविनाश। होईल पा वरानने ॥१०२॥ येणे परि संचलें संचित। ते वाचे उच्चारु नये निभ्रांत। अर्पण करावे हे उचित। शिवा लागी सत्वर ॥१०३॥ हा महिमा परम अद्भूत। लिंगधारी आचरती व्रत। तप-योग त्यासीच घडत। जंगम भक्ति कारणे ॥१०४॥ स्त्रिया लिंग पुजा करीती। त्यासी नसे हो अधोगती। दिक्षा वंत सती पवित्र असती। लिंगाईत धर्मनिष्ठ ॥१०५॥ ऐसे हे रहस्य सुंदर। अपर्णेसी बोधी श्रीशंकर। पुढे करील प्रश्नोतर। श्रोते सावधान परिसावे ॥१०६॥ इति श्रीपरमरहस्य सारामृत। त्याची टीका करोनि प्राकृत। संपूर्णहा ॥१०७॥ कृत कृतार्थ मन्मथ। सप्तमोध्याय

इति श्रीपरमरहस्ये हर गौरी संवादे वस्तु कळा निरुपणं नाम सप्तमोध्याय: समाप्त: श्लोक १५ ओव्या १०७

## अध्याय ८ वा

श्रीगणाधिपतये नमः। सप्तमी निरुपिली वस्तुकळा। जी अतर्क्य ब्रह्मादि सुरा सकळा। तीचे परमगुह्यच दयाळा। श्रवण केले सादर ॥१॥

दे. उ. बाह्यांगे दृश्यते लिंगं प्राणो देहस्य मध्यतः ।
कथं प्राणस्य लिंगेन संबधो भवति तद्वद ।। १ ।।

पार्वती विनवी जी त्रिपुरारी। लिंगासी देह मिश्रित कवणे परी। प्राण असे देहा भितरी। तो देहासी मिश्रित कैसा ॥२॥ लिंग देह प्राण तिन्ही। येर येरासी मिश्रित होओनी। कैसे असती जी शुल पाणी। ते निरोपा मज ॥३॥

शिः उ. यथा प्राणस्य संबंधो विद्यते इंद्रियैः सह ।।
व्याप्य व्यापक भावेन सलिले पावकं यथा ।। २ ।।

जैसा प्राण लिंग सिद्ध झाला। तो सर्वेंद्रिय व्यापुनि राहिला। व्याप्य व्यापकत्वे देही भरला। जळी अग्नि सम पै ॥४॥ जैसे जळ उष्ण होय अग्नि संगे। तैसे देह मिश्रित लिंगार्चन योगे। प्राण तरी सहज अंगे। एकचि असे ॥५॥ तरि लिंगासी देह मिश्रित कोणे परि। पूर्वील देह बुद्धि अव्हेरी जरी। दाही इंद्रिये लिंगार्चन कारी। अखंड लाविजे ॥६॥ ऐसी ज्याची सर्व संबंधे तुटली। त्याची लिंग कळेसी बुद्धि बांधिली। तया प्राण लिंग पदवी

आली । तो अंश होय माझाची ॥७॥

घटमध्येस्थितं तोयं वन्हिर्ज्वलति बाह्यतः ॥
वन्हिज्वाला सुसंयोगात् उष्णं भवति वार्यपि ॥ ३ ॥

जळ तरि घटा माजि असे । आग्नि तो बाहेरीच दिसे । परि घटाग्नि संयोगे होत असें । जळ तप्त ॥८॥ घट तप्त होता जळ तप्त । मग तिन्ही हि अग्निरुप होत । एकमेकाचे संयोगे मिश्रित । होती तात्काळ पै ॥९॥ तेवि सत्क्रिया आणि लिंगार्चन -। करिती गुरुत्वे पूजन । लिंग संगे देह झाला लिंगरुप जाण । मग भेद कैचा ॥१०॥ लिंग संगे देह एक होता । देह संगे सहज प्राण ऐक्यता । एंव देह प्राण लिंग एकरुपता । गुरुकळा बिंबे ॥११॥ ऐसे तिन्ही भावे करी एकार्चन । तोचि भक्त शिवाचार संपन्न । अथवा जंगम झाला तरी भजन । येणेचि भावे करावे ॥१२॥ इष्ट प्राण भाव जाण । लिंगरुपाची मुख्य खूण । गुरुमंत्राते आठवून । पूजिता पुण्य विशेष ॥१३॥ जो ऐक्य भावे न करी पूजन । जरि भाव धरी भिन्न भिन्न । तरि तो भक्त असे परि जाण । पुजा त्याची निर्फळ ॥१४॥ सांडोनिया लिंगार्चना जो करी । आन देवता पूजना । तो शिवभक्त नोव्हे त्याचिया वदना । अवलोकू नये ॥१५॥ आणखी सांगतो सोय एक । शिवलिंग पुजा न सोडावी देख । प्राणहानी झाली तरि नेमिक ।

व्रत न सोडावे पुजेचे ||१६|| लिंग पुजा सोडुनि मानव| जरि भोगी राज्य वैभव | तोहि पावे नरकार्णव | प्रायश्चिता कारणे ||१७|| जो सर्व देवासी असे श्रेष्ठ | सर्व ऋषी मुनीसी वरिष्ठ | तो लिंग हृदयी असोनि नष्ट| आन देवतासी पुजितो ||१८|| ज्यासी हरी विरंची ध्याती| हरीने नयन वाहिले जया प्रति | तो इष्टलिंग हृदयी असोनि पुजिती | देवतांतरा मूढ ||१९|| गण गंधर्व इंद्रादिकासी | वरिष्ठ शेष कुर्भ वराहसी | तो शिव सांडोनि देवतांतरासी | भजे तो मुर्ख जाणावा ||२०|| शिव भक्त म्हणविणे | परि शिवासी न पुजणे | तरि निरयासी जाणे| क्रिया भ्रष्ट म्हणोनिया ||२१|| थोरवी मिरवी शिवाचाराची | क्रिया राहटे आणिकाची | व्यभिचारिणी सेवा करी पतीची | पर पुरुषी जावया ||२२|| आपुला आचार सांडून | पर आचारी वर्ते रात्रंदिन | श्वान सूकर योनि जाण | भोगिल कल्पवरी ||२३|| आणखी सांगणे तुज एक | कुलवधूची रीति देख | प्राण गेलिया न पाहे मुख| पर पुरुषाचे ||२४|| सति पति सदाचारे वर्तती | तैसीच वीरशैव धर्म स्थिती | एक निष्टे भजावी लिंग मूर्ती | दुजी भक्ति दोषिक ||२५||

अज्ञानं क्रिया बाह्यं एकीभावं भवत्यगि ।।
यथा कुंभोदकं तप्तं भवत्याग्नि प्रभावतः ।। ८ ।।

या लागी आपुली क्रिया न सांडिजे | गुरु कृपे ज्ञान साधिजे | ज्ञान आत बाह्य क्रिया कीजे | बरवी निपूण ||२६|| अंतरी ज्ञान बाहेर क्रिया | दोन्ही एकचि झालिया | मग कैचा प्रपंच कैची माया | तया सत्य शांत शरणाते ||२७||

यथा कुंभजलं देवि दह्यते अग्निवेदतः ॥
तथा ज्ञान क्रियावेधा देह लिंगमयो भवेत् ॥ ५ ॥

बाह्य क्रिया अंतरी ज्ञान | दोहीचे कैसे होय एक पण | तयासी दृष्टांत देईन | तो परिस देवी ||२८|| अग्नितरी असे बाहेरी | जळ असे घटा भितरी | घट तप्त होय अग्निकरी | तव जळ तप्त होय ||२९|| तेवि क्रिया करिता निपुण | इष्टलिंगा करिता अष्ट विधार्चन | एवं क्रिया योगे देह प्राण | लिंग कळा पावती की ||३०|| या लागी स्वक्रिया न सांडावी | गुरुकृपे अंतर्ज्ञान कळा धुंडावी | ऐसी एकविध भक्ति होवावी | वीरशैवी निश्चळ ||३१||

शिवप्रसादसंपत्या जातनिर्मळदेहीनां ॥
पंचेंद्रिय प्रवृतिः स्यात् पंचानन प्रतर्पणम् ॥ ६ ॥

प्राणाची मलिनता गेलिया विण | प्राण लिंगी लिंग कळा नये जाण | म्हणोनि दश इंद्रिय दमून | स्वाधीन ठेविजे ||३२|| प्राणाचे भोक्तव्य असे जे जे | ते आधि लिंगासी अर्पिजे | मग आपण आरोगीजे | ऐसा नेम असावा ||३३|| या परि क्रिया आचरण | हे प्राण लिंगीचे लक्षण | क्रिया

आणि ज्ञानाविण । न पावे मोक्ष मार्ग ॥३४॥ ऐसे पूर्व अवगुण जाता सहज । प्राणी लिंग कळेचे प्रकाशेल तेज । मग देह होय प्राण लिंगी सहज । लिंग लक्षण अंगाचे ॥३५॥ ते कैसे म्हणसी तरि ऐक । ईश्वराची जो पंच-मुखे नेमक । पंचेंद्रिय अर्पिजे सुख । जे जे होईल ते ते ॥३६॥ येणे परि क्रिया आचरण । होता सहजचि प्राण-लिंगा अर्पण । म्हणोनि क्रिया ज्ञान उभयाविण । न साधे वस्तु ॥३७॥ क्रिया हीन ज्ञाने कुण । वस्तु साधु म्हणती अज्ञान । अथवा क्रियेनेचि साधु ज्ञाने विण । भाविती तेहि मूर्ख ॥३८॥

> न क्रिया रहितं ज्ञानं न ज्ञान रहितो क्रिया ॥
> उभयोर्योग एवास्य जन्तोर्बन्धन मोचकः ॥ ७ ॥

क्रियेविण न शोभे ज्ञान । ज्ञानेविण न शोभे क्रिया जाण। म्हणोनि दोहीसी अनुलक्षून । वर्तिजे भावे संसारी ॥३९॥ जैसे प्रकृति पुरुष दोन्ही । एकाचि मते होऊनि । सृष्टी कर्म अनुदिनी । चालविती तैसे हे ॥४०॥ क्रिये विण ज्ञान दुर्बल । ज्ञानाविण क्रिया निर्फळ । उभय योग होता प्रबळ । वस्तु येत निज हाता ॥४१॥ यासी दृष्टांत सांग-तसे एक । जेणे संदेह फिटे देख । आपले मनिचा संकल्प। सुटोनि जाय तत्क्षणी ॥४२॥

> प्रदिप्तपावके देशे अन्धपंगुसुसंगतौ ॥
> परस्परसहाय्येन दुःखान्मुक्तौ बभूवतुः ॥ ८ ॥

एक अंध एक पंगू तत्वता । उभय एका स्थळी असता ।
तेथ अनल लागला तत्वता । तो देखिला पंगूने ॥४३॥
पंगू ते ज्ञान जाणे डोळस । अंधतो क्रियाकरी दृष्टी नाही
त्यास । परि पंगूने देखिले अग्निस । गृह जळता ॥४४॥
परि क्रिया पायाविण अडला । तेथुन न निघवे स्थूळाला ।
मग अंधासी विचार मांडिला । पंगूनें कैसा ॥४५॥ पंगू
म्हणें अंधा लागुनी । काय निश्चित असशी गृही लागला
अग्नि । आता मी तूं एक होओनि । जाऊ निघोनि वेगेसी
॥४६॥ पंगू म्हणे अंधा लागुन । मी तुझे खांदी बैसोन ।
जिकडे जिकडे मार्ग दावीन । तिकडे तिकडे चालावे
॥४७॥ हा विचारु जरि न किजे । तरी दोघे हि जळोन
जाईजे । एके विण एक न पाविजे । सुखस्थळाते ॥४८॥
तव ते दोघे एक होऊनि । पावले गुरु कृपे सुखस्थानी ।
ते विज्ञान क्रिया एक पणी । वस्तु पाविजे ओ देवि ॥४९॥
या लागी येरयेरा विण । स्वहित साधू म्हणति ते अज्ञान ।
न प्रकाशे चैतन्य घन । कल्पांति हि पार्वती ॥५०॥ तेल
वातीविण कैसे प्रकाशे जोती । वाद्ये वाजविल्या विण नाद
काय उमठति । मेघ भूमि विण निपजती । धान्य बीज
काई ॥५१॥ या लागी क्रिये ज्ञानाविण । न प्रकाशे चैतन्य
घन । म्हणोनि न विसंबती सज्ञान । उभयासी जाण पा
॥५२॥ दोही पंखाविण पक्षासी । न उडवे जेवि आकाशी ।
तेवि क्रिया ज्ञानेविण वस्तुसी । न पाविजे कदा ॥५३॥

शत योजन एक पक्ष असे । तरी पक्षी उडो लाहे काय कैसे । तेवि ज्ञान अथवा क्रिया एकचि असे । तरी तो तरे कायी ॥५४॥ म्हणोन ज्ञान क्रिया दोही विण । न तरे पार्वती सत्य जाण । दो पक्षा विण उड्डान । न घडे पक्षासी ॥५५॥ क्रिया कर्म बरवे करीती । परी वस्तु ज्ञान नेणती । तरी ते सरते न होती । शिव स्वरुपी ॥५६॥ अथवा ज्ञान वस्तुचे बरवे जाणती । आणि क्रिया कर्म न करीती । तरि तेहि न तरती । म्हणोनि दोन्ही युक्त असिजे ॥५७॥

गवां सर्पि शरिरस्थम् न करोत्यात्म पोषणम् ।।
विकृतम् कर्म रचितम् पुनस्तासांतु भेषजम् ।। ९ ।।

गाईचे जे दिव्य घृत । अप्रत्यक्ष पणे तियेचे शरिरीच वर्तत । परि ते पोषण न करी यथार्थ । तया गो देहाचे ॥५८॥ दोहन करोनि दुग्धाचे । अग्निसंगे तापऊन तयाचे । विरझण घालावे साचे । मग दधि होय पै ॥५९॥ दधि मंथने करुन । नवनीत बाहेर ये निघोन । ते कढविता परिपूर्ण । घृत होता येतसे ॥६०॥ ते घृत देता गाईस । परितःपुष्टि करी तियेस । औषध रुप आले देहस्थ घृतास । क्रियेचेनि योगें ॥६१॥ शुद्ध कर्म ती गाय जाण । तिचे भरण पोषण करुन । बुद्धि विवेके घेईजे दोहून । क्षीर तियेचे ॥६२॥ ते क्षीर लक्ष लाऊन ताविजे । निश्चयार्थ विरझण घालिजे । मग ते विवेके घुसळिजे । निज नवनीत

हाता ॥६३॥ तेंहिं ताविजे स्वानुभवें करुन । मग ते घृत चिदानंद घन । ते दिने दिने करित अरोगण । पुष्टी चढे अनुपम्य ॥६४॥ ना तरि घृत घेऊनि त्यागिता गाईसी । मग घृत लेश कैसा येर दिवशी । ऐसे न करावे करिता निज सुखासी । मुकी जेल सत्य पैं ॥६५॥ ऐसी क्रिया घृत दात्री कळली । तिस विसंबू नयें पाहिजे पाळिली । मग दिने दिने घेईजे नव्हाळी । निज घृताची ॥६६॥ घृत नासे कांही काला । अक्रिय ज्ञान तैसे बाळा । दुर्गंध हर्षीचा कंटाळा । तैसे जाण ज्ञान ते ॥६७॥ म्हणोनि नित्य गाईचे दोहन । तद् घृतेचि होय शुद्ध अन्न । बहु दिवसाचें करवि वमन । तेंवी ज्ञान अक्रियेंचे ॥६८॥ यास्तव एका ज्ञानें करुन । न होय सत्य योग साधन । क्रिया आचरता निर्वाण । विज्ञान येंई हाता ॥६९॥ ऐसी क्रियेची आहें थोरी । केवळ ज्ञान न करी बरोबरी । क्रिया ज्ञान होता एक सरी । विज्ञान प्राप्त ॥७०॥ विज्ञान ते कैसे ऐक । जेथ खुंटला विवेक । चिद्रुप ब्रह्म नैष्टिक । स्वस्वरुपी बिंबले ॥७१॥ तेणें बाणें पूर्ण समाधान । अन्य निंद्यमाजि असें अभिमान । जेणें गर्वित करी भावण । ते ज्ञान निंद्य जाणावे ॥७२॥ या लागी प्रमाणिक क्रिया करीजे । मग सम्यक ज्ञान होईल सहजें । दोही विण कदापि न होईजें । प्राणलिंग संबंध ॥७३॥

दे. उ. स्थावरम् केन संमिश्रं जंगम केनवा पुनः ॥
संबंधोनुहिते केन कृपया भतभावन ॥ १० ॥

पार्वती प्रश्न करीतसे | स्वामी स्थावर जंगम मिश्रित कैसे | हे निरोपावे प्रकाशे | ज्ञानाचेनि ||७४||

शि. उ. भक्तो माहेश्वर श्चैव प्रसादि स्थावरं भवेत् ॥
प्राणलिंगी शरण्यश्च लिंगैक्यो जंगम स्तथा ॥ ११ ॥

तव शंकर म्हणे गिरिजे | साही स्थळ जे बोलिजे | ते तीन तीन वाटणी म्हणीजे | स्थावर जंगम ||७५|| ते षट्स्थल म्हणसी कोण | भक्त माहेश्वर प्रसादि जाण | ते तिन्ही मिश्रित होऊन | स्थावर बोली बोलिजे ||७६|| प्राणलिंगी शरण ऐक्य जाणिजे | हे तिन्ही मिश्रित जंगम बोलिजे | येणे चि परि षड्लिंग ओजे | मिश्रित स्थावर जंगमी ||७७||

आचारं गुरुलिंगम् च स्थावर शिवलिंगकम् ॥
चरलिंगम् प्रसादंच महालिंगं च जंगमम् ॥ १२ ॥

आचार आणि गुरुलिंग | शिवलिंगहि असे स्थावरांग | चर प्रसाद महालिंग | जंगमांगी वसती सदा ||७८||

स्थावरं जंगमं चैव द्विविधं लिंगमुच्यते ॥
जंगमस्यावमानेन स्थावरं निष्फलं भवेत् ॥ १३ ॥

स्थावर आणि जंगम | ही दोन लिंगे उत्तम | परि चरलिंग पुजा नेम | विशेष पुण्या कारणे ||७९|| स्थावर लिंगा संस्कारुन | अर्चिती शिवकळा कल्पुन | चरलिंग आहे याहुन भिन्न |

जंगम म्हणती जया ||८०|| स्थावराचे होंय जंगम | जंग-माचे स्थावर हा भ्रम | न कळे गुरु वाचोनि वर्म | स्थि८-चर काय ते ||८१|| स्थावर जंगम एक तरि न मानिजे | जंगम उदरोनि स्थावर पुजिजे | तरि ते पूजा निष्फळ जाणिजे | भेद वादी म्हणोनिया ||८२||

स्थावरं जंगमं चैव एक रुपं तु मुलतः ॥
इतिभेद परि ज्ञानं दुर्लभं श्रणु पार्वती ॥ १४ ॥

सव्य वाम दिसती दोन्ही भाग | परि दोन्ही मिळोनि एकचि अंग | तेवि स्थावर जंगम एकचि लिंग | ऐसे जाणे तो दुर्लभ ||८३|| स्थावर जंगमाची स्थाने | तुज सांगू पूर्ण पणे | भक्त माहेश्वर प्रसादि जाणे | स्थावरांग जयाचे ||८४|| प्राणलिंगी शरण आणि ऐक्य | हे माझे सर्वदा प्राणाधिक्य | तया वेगळा मी राहणे अशक्य | ते जंगम रुप जाणावे ||८५|| हो माझी आत्मशक्ति | मी तुज सांगि-तली समूळ युक्ति | तैसिच आचरावे पार्वती | तरीच योग्य भक्त तो ||८६||

दे. उ. दासोहं भावकः कोवा सोहं भावश्च की दृश्यः ॥
भेदो भावद्वयस्येह ब्रुहिमे परमेश्वर ॥ १५ ॥

पार्वती प्रश्न करी सहजे | सोंहं भाव कोणासी म्हणीजे | आणि दासोहं भाव बोलिजे | कवणासि पै ||८७|| या उभयासी भेद कांही | असे अथवा मुळीचि नाही | बरवा

अर्थ निरुपिजे लवलाही ॥ कैलास पति देवराया ॥८८॥

शि: उ. दासोहं भक्तभापश्च सोहं भावश्च जंगम: ॥
भेदो भाव द्वयोर्नास्ति प्रकृति प्रति बिंबवत् ॥ १६ ॥

शिव म्हणे ओ पार्वती । तुज निरोपु भाव स्थिती । ते ऐकोन धरी चित्ती । सावध पणे तत्वा ॥८९॥ दासोहं म्हणिजे भक्तोत्तम । सोहं म्हणिजे तो जंगम । या उभया भेद नाही हे वर्म । गुरु मुखे जाणिजे ॥९०॥ बिंब आणि प्रति बिंबासी । जैसा भेद नाही दोहोसी । तैसा भक्त आणि जंगमासी । भेद नाही ओ देवि ॥९१॥ मीचि भक्त मीचि जंगम जाण । आपुलिया सुखा लागी झालो दोन । परि भंगले नाही एकपण । जाणती खूण ज्ञानिते ॥९२॥ सोने भूषण पणा आले । तरी काय सोने पण भंगले । तैसे देव भक्त होवोनि ठेले । माझे स्वरुप ॥९३॥

सोहं दासोहमाख्यातं केवळम् नाम भेदत: ॥
वस्तु भाव द्वयम् नास्ति प्रतिबिंब समम् मतम् ॥ १७ ॥

सोहं दासोहं हे केवळ नामचि दोन । जैसे बिंब प्रति बिंब असति अभिन्न । तैसे देव भक्ता नाही दुजे पण । देही आत्मा जैसा ॥९४॥ म्हणोनि भक्त माझा आत्मा जाण । भक्त असे माझे हृदयीचे ध्यान । भक्त माझे जीवीचे जीवन । जाणावी खूण पार्वती ॥९५॥ सज ईश्वरा ईश्वरपण । ते भक्तेचि दिधले जाण । मी मिरवतो ईश्वर पण । ते

भक्ताचे नि योगे ||९६|| मज भक्ताचेनि येथ असणे |
भक्ताचेन्हि योगे माझे जिणे | मी भक्ताचेनि महिमाने |
श्लाघ्यतु असे ||९७|| भक्ताचेनि मज भूषणे | भक्ताचेनि
मज लेणे नेसणे | भक्ताचेंनि आज्ञा वचने | मी वर्तत असे
ओ देवि ||९८|| भक्ताचेनि कार्य गुणे | मज निराकार
आकारणे | मी निर्गुण परि गुणासी येणे | भक्ताचि लागी
||९९|| मी भक्ताचे प्रिती भक्ति पायी | संतोषोनि तुजहि
देवि पाही | रावणासी देता मागे पुढे कांही | पाहिले
काय म्या ||१००|| नाना भक्ताची मज अत्यंत प्रिती |
म्हणोनि तूज भक्ताचे हाती | देता भिन्न भाव चित्ती |
मज न उपजेचि ||१०१|| मी प्रसन्न होतो भक्ताते | भक्त
फिरोनि पडती माते | परि मी घात पात त्याते | विचा-
रीत नाही ||१०२|| तुझेचि देखता पार्वती | मी प्रसन्न
झालो भस्मासुरा प्रति | तो माझ्याचि मस्तकी हात ठेऊ
पाहे चित्ती | विकल्प धरोनि ||१०३|| आपण त्याचा क्षय
करावा | कि स्वयचि त्याचा फळ भोग भोगवावा | ऐसे
विचारुन धरिता शांत भावा | स्वगुणेचि भस्म जाहला
तो ||१०४|| येथ वरि मज भक्ताची प्रीति | मी सर्वस्वे
असे भक्ताचे हाती | भक्ता वाचून या त्रिजगती | प्रिय
नाही मज अन्य ||१०५|| भक्त माझे ध्येय मी त्यांचा
ध्याता | भक्त माझे ज्ञेय मी त्यांचा ज्ञाता | भक्त
माझे भोग्य मी त्यांचा भोक्ता | ऐसा पढियंता आम्हा

तो ||१०६|| मी त्याचा देह तो माझा आत्मा जाण | तयाचे हृदयी माझी सेज सुखासन | येरा विण येर एक क्षण | न राहो आम्ही ||१०७|| आम्ही भक्ति भावाचे पाहुणे | भक्ति विण नावडति शाहणे | जे फुगती भक्ति अभिमाने | ते प्रिय न होती मज ||१०८|| करिती माझी भक्ति प्रिती | परि माझिया भक्ता निंदिती | ते नावडती मज जरि प्रिती | निंदकु म्हणोनि ||१०९|| माझी अत्यंत भक्ति करीती | येरीकडे हिंसा करी जीव घाती | ती भक्ति नव्हे माझिया घाता प्रति | प्रवर्तला तो ||११०|| तरि त्याची भक्ति घडे कैसी | मुखी घालोनि पंचामृतासी | मग वरोनि हाणी डांगेंसी | मस्तकावरी ||१११|| माझी अत्यंत भक्ति करी | कामक्रोधासी थारा अंतरी | चित्ताचे अनुसंधान विषयावरी | तरि तोहि नावडे ||११२|| म्हणोनि सांडोनि अभिमान | अखंड माझे करिता अनुसंधान | मग मीचि तो आपण | होऊनि ठाकें ||११३|| मी भक्ति भावाचा विकला | मी भक्ति भावें होय जोडिला | भक्ताचे अंकित होय त्याचिया बोला -| माजि वर्तत ||११४|| म्हणोनि भक्ता मज वेगळिक | नाही दोघे मिश्रित असो एकी एक | अष्टमहासिद्धी दासी त्यांच्या देख | घरी राबती मुक्ति चाऱ्ही ||११५|| मुक्ति राबती हे नवल कायी | मी अंगे राबें पार्वती पाहीं | या परते विशेष नवल कांही | सांगावे चोज ||११६||

जैसे मृत्यू काळी अमृत गोड । कि दुष्काळी भणंगा मिष्टा-न्नांचे कोड । याहून भक्तिची मज आवड । अत्यंत गोड ओ देवि ॥११७॥ परि क्रिया शुद्ध असे ज्याची । पूर्ण भक्ति मानू त्याची । ज्ञान क्रिया उभयाची । मेळणी असावी तेथे ही ॥११८॥ ही माझी आत्मशक्ति । मी तूज सांगितली समूळ युक्ति । तैसीच अचरावी पार्वती । तरी योग्य धर्म तो ॥११९॥ लिंगासी धर्म अति सूक्ष्म । क्रियाहि तैसीच तीक्ष्णक्रम । उत्तम धर्माचा हा नेम । कठिणची जाणिजे ॥१२०॥ वीरशैव मता बोधी । इतर धर्माची न लगे उपाधी । शिवतत्व सर्वज्ञ संबोधी । असे उत्तम धर्म हा ॥१२१॥ त्या साजी ह्या परमरहस्य । ग्रंथ उभवी श्री परमेश । लिंगाईत धर्माचे अधीश । बोधिती जना संक्षेपे ॥१२२॥ हा ग्रंथ अति उत्तम । लिंग भक्तिचा नित्य नेम । तयासाठी अनुपम । निर्मियले ज्ञान पै ॥१२३॥ जो येथ न धरी विश्वास । त्याचा सदा होईल कार्य नाश । आदरे रुढवी जगास । लिंग भक्ति थोर पै ॥१२४॥ शील क्रिया भक्ति धर्म । नम्र पणें वर्तता विक्रम । पर धर्माचा तुटे भ्रम । स्वधर्मांकूर विरुढलिया ॥१२५॥ स्वधर्माचे करावे मंडन । पर धर्माचे होय खंडन । अशी दृढ शास्त्रातून । वाक्ये शोधून पाहवी ॥१२६॥ इति श्रीपरमरहस्य सारा-मृत । ईश्वरपार्वती संवादि वर्तत । त्याचा साद्यंत मति-तार्थ । आदरे श्रुत केला मन्मथें ॥१२७॥

इति श्रीपरमरहस्ये हर गौरी संवादे स्थावर जंगम निर्णय निरुपणं नाम अष्टमोध्याय: समाप्त: श्लोक १७ ओव्या १२७



## अध्याय ९ वा

श्री गणाधिपाय नमः | अष्टम अध्यायाचें अंति | निरुपिली तपश्चर्येची स्थिती | संतोषोनि गिरीजा शिवा प्रति | काय पुसे तें ऐका ||१||

दे. उ. के भेदा भक्तिमार्गस्य गुणा: के तस्य वै शुभा: ॥
तद्रूपं न हि जानामि कथयस्व महेश्वर ॥ १ ॥

पार्वती म्हणे देवोत्तमा | ज्या भक्तिची सांगता एवढी महिमा | त्या भक्त स्थळाची भेदगरिमा | निरोपा स्वामी ||२|| ज्या भक्तिचिया सामुग्री आतुडा तुम्ही | म्हणतसा भक्ताचें घरी अंगे राबे मी | त्या भक्ताचे गुणभेद स्वामी | निरोपावे मजलागी ||३||

शि. उ. सदाचार: शिवेभक्तिर्लिगजंगमएकधी: ॥
लांछने लीनभावश्च भक्तस्थलमुदीरितं ॥ २ ॥

शिव म्हणे ओ पार्वती | भक्तस्थळ निरोपु तुज प्रति | जें ऐकता पावन त्रिजगति | चराचर होय ||४|| सहा पापाच्या झाल्या असता राशी | जें ऐकताच जाती क्षयासी | ऐसे

भक्तस्थळ तुजपासी | निरोपीन ओ देवि ||५|| सदाचारे शिव भक्तिने वर्तिजे | गुरुलिंग जंगम ऐक्य भावे मानिजे | परि आधि गुरुकीजे | दीक्षा घेईजे सद्भावे ||६|| सद्भावे विश्वास गुरुचरणी | तोचि भाव लिंग पुजनी | जंगमहि तेचि भावी मनी | तोचि उत्तम भक्त जाणिजे ||७|| जेथे देखे गुरु लांछन | तेथ सद्भावे करी शरण | निर भिमानी होऊन | करी भक्ति ||८|| एक भावे धरी प्रेम | वंदी सदा गुरुलिंग जंगम | त्यासी तीर्थ प्रसादाचा नेम | नित्याचारे वर्ते तो ||९|| जंगम देखुनि भावे वंदावे | माझे तुझे बगीचे न म्हणावे | रुप देखोनि शरण जावे | हे गुरु भक्ति लक्षण ||१०|| जंगमाचे गुण अवगुण न उच्चा- रावे आपण | तो कैसा तरि असो परि वंदन | भावें किजे ||११|| जंगमाचे पूर्वज न विचारिजे | तो गुरुरुपचि मानिजे | आवडी नावडी न धरीजे | जंगम लिंगाचे ठाई ||१२|| जे जे आपणा आवडत | ते ते जंगम लिंगी अर्पित | जऱ्ही हाता आले अमृत | तरि न वंचि तो ||१३|| मुखी षडाक्षरी मंत्र सतत | लल्हाटी विभूति शोभत | कंठी रुद्राक्ष माळा मिरवत | भक्त रायाच्या ||१४|| तीर्थ प्रसादाची आवडी मोठी | सेविता पडोनेदि भवीच्या दृष्टी | शिवाचार परिपाटी | आणिकाहि लावीतसे ||१५|| जंगम देखताची दृष्टी | धावोनि सद्भावे घाली मिठी | चरण रज लावी ||१६|| लिंग युक्त शरण लल्हाटी |

प्राण गेला तरी जावो । परि न सांडी निष्ठा भावो । तोचि निज भक्तसी ठावो । शुद्ध भक्त स्थळ या नांव ॥१७॥ तनुमन धन अर्पिता । शीण न मानी सर्वथा । म्हणे ज्याचे त्यासी देता । मी का कुंथो ॥१८॥ उदय काळी उठता । हीच मनी वाहे चिंता । की जंगम लिंगा अर्पिता । तरि भाग्य बरवे ॥१९॥ लिंगार्चितासी जंगम आलिया । धावोनि विश्वासे लागे पाया । शीतल विभुति पुढे करोनिया । म्हणे स्वामी कृपा करा ॥२०॥ नेवोनि बैसवी सिंहासनावरी । भावे बरवी पादार्चना करी । तीर्थ अर्पोनि प्रसाद स्विकारी । उत्तम भक्त या नावे ॥२१॥ भोजनोत्तर मुखशुद्धि । तांबुल अर्पितसे सुबुद्धि । भावे करुनि त्रिशुद्धि । शरण होत प्रीतिने ॥२२॥ जे सुख भोग ते जंगम लिंगाचे । जे कष्ट ते प्रारब्धाचे । ऐसा भाव धरोनि वर्ते साचे । तोचि भक्त जाणावा ॥२५॥

भृत्याचारसमाचारो लिंगजंगमरुपिणी ॥
द्वयोरैक्यसमायुक्तो भक्तराज सुबुद्धिमान् ॥ ३ ॥

सेवक भाव अंगी धरोनि । भक्तिचा अभिमान सांडोनि । एक भाव लिंग जंगम पुजनी । करी तोचि उत्तम भक्ता ॥२४॥ लिंग जंगमी भिन्न भाव धरिता । केलि भक्ति निर्फळ होय तत्वता । मा मुक्ति सायुज्यता । तयासि कैंचि ॥२५॥

किंकरवाणि समायुक्तो लिंगरुपेण जंगमं ॥
मनसा भावयत्येव भक्तस्थळसमन्वितः ॥ ४ ॥

किंकर वाणि वृति धरोनि। शांती रुपी मन लीन होऊनी। लिंग जंगम एकरुप मानुनी। सद्‌भावे पूजी जो ॥२६॥ तो माझा मुकुट मणि जाण। महा भक्त शिवाचार संपन्न। त्याचेनि माझे शिवपण। मिरवतसे ॥२७॥ तो भक्ति भक्तस्थळा लागी। जीवन जीवनया लागी। आहे म्हणोनि सर्वांग संगी। भक्ति नांदतसे उल्हासे ॥२८॥

अर्थप्राणाभिमानं च गृहदारादिकं तथा ॥
अर्पयेत् परया भक्त्या भक्तस्थळसुबुद्धिमान् ॥ ५ ॥

अर्थ प्राणाभिमान। पुत्र दारादि गृह जाण। ही सर्वहि किजे अर्पण। लिंग जंगमी भक्तिने ॥२९॥ काया वाचा मने करोन। उदार व्हावे भक्ति लागोन। एकभावे तल्लिन होऊन। समर्पावे लिंग जंगमी ॥३०॥ अमृताहुनि अधिक। पादतीर्थ प्रसाद मानी तो देख। सकळ तीर्था विशेख। होऊनि मानी ॥३१॥ त्यासी शिवलिंग जंगम प्राण। जे सत्यत्वे असे जाण। ही खूण जाणती सत्य शरण। भक्ति पंथा लाधले ॥३२॥

गुरुधर्माभिमानीस्यात् लिंगनिष्ठो हि जंगमः ॥
उपाचार्यः सदाचारी भक्तिमान् सुदृढवृती ॥ ६ ॥

स्वधर्माभिमान असावा गुरुसी। भावे पाळील शास्त्राज्ञेसी।

कदापी न चुकती वचनासी । धर्माभिमानी सत्य ते ॥३३॥ लिंगाचा इच्छित हेतू । पूर्ण करिता जंगम भक्तु । तया वेगळी मातु । नसे जाण दुसरी ॥३४॥ या लागी वीरशैवी । दुजी सेवा न करावी । इष्टलिंगासी अर्पावी । शुद्ध कर्मे आपुली ॥३५॥ अमृताहुनि अधिक । प्रसाद मानिती देख पंक्ति भोजन आवश्यक । इच्छितसे भक्त पै ॥३६॥ शिव सांगे गणाप्रति । जे शिवाचारे वर्तती । तया नसे अधोगती । सत्य जाणा वचन हे ॥३७॥ भक्त तयासीच नांव । येरा नसे अनुभव । भवाचे भय सावेव । स्वप्नी नसे सद्भक्ता ॥३८॥

प्रभाते मुखप्रक्षाल्य हस्तपादौ च क्षालयेत् ॥
दंतधावनशौचादि कृत्वा नित्यं शुचिर्भवेत् ॥ ७ ॥

प्रातःकाळी उठूनि सत्वर । शौच मार्गे मौन धरुनि साचार । न बोलता परस्पर । परतोनि यावे स्वगृही ॥३९॥ ऐसे स्तब्ध येण्याचा काय हेतु । स्वमस्तकातील ज्ञानतंतु । खर्ची घालू नये व्यर्थु । योग्य विचारा योजावे ॥४०॥ जो जो बोलण्याचा व्यापार । तो तो ज्ञान तंतु होती जर्जर । निद्रे अंती तयाचे अंकुर । सतेज पुन्हा होती पै ॥४१॥ म्हणून तया खर्ची व्यर्थ । घालू नये हे यथार्थ । शिक्षक गुरु समर्थ । सांगतसे शिष्याते ॥४२॥ मौने घरी येता परतून । सप्त मृत्तिका करासी लाऊन । वर नख दुसऱ्या

करडोन । घ्यावें तेणे क्रिया शुद्ध ॥४३॥ पाद प्रक्षाळण करुन । मग लिंगोदके मुखमंडन । दंताचा मल धुवून टाकी सत्य प्रतिदिनी ॥४४॥ येणे परी मुखमार्जन कीजें । मग ललाटा वरुन हस्त उतरिजे । परि मुखी घेऊन न घालिजे । शीतळ ललाटावरी ॥४५॥ आत्म स्थान असे भ्रुस्थानी । म्हणोनि न घालिजे मुखपाणी । तेथेंहि देवाची मिळणी । सदा असे ॥४६॥ म्हणोनि अर्ध मुखी अर्ध करी । ऐसे जल न घालिजे ललाटावरी । ऐसे न विचारोनि घालिजें जरि । तरि दोषी होईजे ॥४७॥ येणे परि मुखमार्जन करुन । मग करावे भस्मधारण । पूजा सामुग्री मेळऊन । शुचिर्भूत असावे सदा ॥४८॥

मज्जनं च त्रिकालेषु शुचिपाकसदासुधीः ॥
भविसंगपरित्याग इत्येतद् हितकारकं ॥ ८ ॥

मग शुद्धस्नान करोन । नेसावे शुक्ल धौत वसन । वरि उत्तरीय धारण करोन । प्रवृतावे पूजनी ॥४९॥ ऐक लिंग पूजेचे विधान । लिंगाचे त्रिकाळ कीजे पूजन । एकांत स्थळ पाहोन । शिवपूजा कीजे सावध ॥५०॥ आधी दोन्ही हात प्रक्षाळून । मग पात्रार्चन करोन । विभूति शीतळ पात्रासी लाऊन । मग लिंगासी काढीजें ॥५१॥ लिंग करस्थळी धरोन । लिंग मुखी शीतल घालून । तयाचे कीजे मुखमार्जन । आचमनादिकी पैं ॥५२॥ मग आरंभिजे

शिवलिंगार्चन | बैसिजे मन आकोंचत करोन | शुद्धासनी बैसून | करावे ध्यान शिवाचे ||५३|| आधी लिंगासी विभूति अवधरिजे | बोटी शेष उरले तें मस्तकी लाविजे | मग त्रिपुंड चर्चिजे ललाटभरी ||५४|| परि ते मंत्री शुद्धि करुन| उर्ध्वमुखी ललाटी लाऊन | गंध धूप दीप नैवद्य निवेदून| घंटा संयुक्त कीजे ||५५|| शंख चवरे दर्पण | आणिक हि जे पुजेचे भूषण | ते ते समुदाय घेऊन | लिंगार्चना पै किजे ||५६|| ऐसी लिंगाची पूजा त्रिकाळ | जो करी सद्भावे होऊन निर्मळ | जाणावे शुद्ध भक्ति स्थळ | उत्तम साच ते ||५७|| ते त्रिकाळ म्हणशील कोण कोण | प्रातःकाळी उदय होता अरुण | ते काळी कीजे लिंगार्चन | तैसेंचि मग माध्यान्ही ||५८|| चांदणी निघाली नसता| आणि सूर्य अस्तमान होता | त्या सायंकाळी लिंग पूजता तत्वता | यया त्रिकाळी लिंगार्चन होय ||५९|| ऐसे त्रिकाळ लिंगार्चन | वरि शुद्ध शुचि पाक करुन | लिंगासी कीजे निवेदन| न देखता भवि ||६०|| स्नान केल्या विणे स्वयंपाक| केलिया अनाचार पातक | घडे ऐसे शास्त्रादिक | सांगती धर्मग्रंथी ||६१|| स्त्रीया शुचिर्भूत असाव्या सदा| भवि स्पर्श करुनये कदा | जरि संसारी असे अपदा | तरि आचारा सोडू नये ||६२|| स्वधर्माचारे वर्तता | इंद्र संपत्ती ये हाता | खोटे नाही हो सर्वथा | स्वधर्मनिष्ठा श्रेष्ठ ||६३|| पाक झालिया पात्र शुद्धि | करावी भस्म धारणे

आधि। जंगम पंक्ति सत्यविधी। भोजना लागी असावा ॥६४॥ लिंग पुजा होता क्षणी। नैवेद्य अर्पण मंत्रे करुनि। लिंगार्पित प्रसाद मानुनि। ग्रहण करी सदा ॥६५॥ वीर शैवा घरीचे अन्न। पवित्र असे परिपूर्ण। तयाचा अंश घरातून। बाहेर कदा न जावा ॥६६॥ यास्तव तयाचा स्पर्श। घेता देता जेविता विशेष। आसन वस्त्रा अंगा लेश। लागू देता दोष घडे ॥६७॥ ऐसी क्रिया लिंग धर्मी। पाळी तो विशेष मर्मी। तयाची वाढतसे नित्य लक्ष्मी। क्रमाने ॥६८॥ ऐसे भविदेखता शिवाते अर्पण। न कीजे ऐसे नीलकंठीचे प्रमाण। म्हणोनि भविसंग त्यागोन। भक्ति मार्गी वर्तिजे ॥६९॥ ऐसा शिवार्चनाचा नेम। तेचि भक्त स्थळ उत्तम। परि भवि म्हणावे कवण तो नेम। ऐक ओ देवि ॥७०॥ ज्यासी पंच कलश दीक्षा नाही। तीर्थ प्रसाद तो नेणेचि कांही। तोचि भवि पार्वती पाही। गुरु विण नांदे म्हणोनि ॥७१॥ त्याचा संग त्यागावा। शिवमंत्र नाही म्हणोनि बोलावा। तोचि प्राणी भवी म्हणावा। अनंत जन्मा कारणे ॥७२॥ म्हणोनि धन्य ते शिवभक्त। जे झाले गुरु करंजात। आणि भवि संग न करीत। शिव भक्त शुद्ध ते ॥७३॥ वीरशैव सदाचार स्थिती। जाणे तो एक जंगम मुर्ती। जना संस्काराची स्फूर्ती। प्रगट कीजे सत्वर ॥७४॥ ऐसे जे भक्त असती। ते माझे मुकुट मणि ओ पार्वती। तो आत्मा

मी देह ऐसी प्रिती । भक्ताची मज ॥७५॥ ऐसें भक्ति स्थळ उत्तम । तुज निरोपिले जाणोनि तुझें प्रेम । ऐसे आचरे तेहि वर्म । तुज दाखविले ओ देवि ॥७६॥ ऐकोनि भक्त स्थळ पार्वती । पूर्ण संतोषली चित्ती । मग नमस्कार करोनि पुसती । झाली कांही आणिक ॥७७॥ वीरशैव सदाचार स्थिती । जाणे तो एक जंगम मुर्ति । जन्म संस्काराची स्थिती । प्रगट कीजे सत्वर ॥७८॥

गर्भाधानं पुंसवनं सीमंतं जातकर्म च ॥
तथा दीक्षा प्रभावेन लिंगनिष्ठा भवेध्रुवं ॥ ९ ॥

गर्भाधान हा संस्कार । सर्वासीच असावा साचार । त्याचा न करावा अनादर । पंचाचार विधिने कीजे तो ॥७९॥ हाचि जाणावा संस्कार प्रथम । दुजा तो डोहाळे इच्छा काम । तिसराहि पुण्य पराक्रम । जनना पूर्वी होतसें ॥८०॥ चौथा तो जातकर्म जाण । जन्म काली लिंग धारण । ऐसे शास्त्र बोले वचन । वीरशैव धर्माचे ॥८१॥ ऐसें हे चार गर्भ संस्कार । वीरशैव धर्माचे प्रकार । तया धर्माध्यक्ष वारंवार । श्रुत करी लिंगायता ॥८२॥ नामकरण बारावे दिवशी । उत्साह करोनि बालकासी । नांव ठेवणेंचि अनायासी । आप्त गोत्रा कळावया ॥८३॥ अन्न भक्षणाचा विधी । धर्म नितो दिन शुद्धि । पाहुनियां उदय संधी । ग्रह शुभ स्थानासी ॥८४॥ उपनिष्क्रम म्हणती । जेथे असे ती परम

भक्ति | शिशुसी चालावयाची शक्ति | आणू पाहती आवडी ||८५|| चौल संस्कार आठवा | देह स्थितीचा मानावा | सुख दुखा:चा वानवा | कळतसे तेणे पै ||८६|| सर्व संस्काराचा राजा | जयाचेनि योगे शिव पूजा | करिता घडे पुण्य काजा | स्वधर्म निष्ठा ती ||८७|| दीक्षा संस्कारा वाचून | लिंगायतचि नव्हे जाण | ज्ञाती धर्माची असे खूण | सत्य जाण पार्वती ||८८|| लिंगायता हा संस्कार | लागू असे शास्त्राधार | तया वाचून क्रियाचार | शुद्ध नसे नाक्षिपे ||८९|| जंगम दिक्षा असे दुसरी | अगाध असे तयेची थोरी | महेश्वरी अधिक तिसरी | वंद्य देख देवादिका ||९०|| या दोही दीक्षा जाण | गुरु पदाचे भूषण | स्वधर्माचा अभिमान | जेणे राहे सत्य पै ||९१|| म्हणूनिया धन्य ते भक्त | जे झाले गुरु कर जात | तेचि वीरशैव सद्भक्त | अन्य धर्मा वेगळे ||९२|| येथे झाले नऊ संस्कार | पुढे विवाहाचा होय प्रकार | गोत्र सुत्र वधू कुलाचार | पाहोनिया योजावा ||९३|| हे ऐसे दश संस्कार | तया पुढे धर्म पर | सांगोनि अंति विचार | मुख्य संस्कार हे ||९४|| याचे परि उपसंस्कार | षोडश संख्या समग्र | त्याचा विधीमंत्र फार | लिहिला असे धर्म शास्त्री ||९५|| ते पाहुन लिंगधारी | सर्व विधी प्रेमें करी | असत्य मानी तो भिकारी | जन्मोजन्मी होईल ||९६|| जो याच नेमे जाणे स्वधर्म | कदा न होय तया चिंता भ्रम |

सावधान आणि सप्रेम । निष्ठा असे धर्मा वरी ॥९७॥ या वरील संस्काराचे मंत्र । महा शुद्ध आणि पवित्र । तया वेगळे स्वतंत्र । दुजे मंत्रचि नसती ॥९८॥ हे मंत्र उपाचार्य मुखी । वसती सदा पुण्य श्लोकी । त्या वेगळी मिरवी शेखी । तया अज्ञान मानावे ॥९९॥ उपाचार्ये आपुले कर्म । सांभाळावे मुख्यधर्म । तयाचे मंत्रापासी प्रेम । सर्वकाळ असावे ॥१००॥ उपाचार्य जंगम असती । ते लिंगायता प्रति पाळिती । आचार धर्माची काळजी वाहती । सावरीती वेळोवेळी ॥१०१॥

दे. उ. जंगमस्य कथंरुपं । जंगमस्यच के गुणाः ॥
जंगमस्यच के भेदा : ब्रुहिमे परमेश्वर ॥ १० ॥

पार्वती पुसे शंकरासी । जंगमाचें रुप निरोपा मजसी । जंगम म्हणावे कवणासी । कैसा लक्षण भेद त्याचा ॥१०२॥ कैसे आचरण कोण स्थिति । कैसी निलकंठी कोण वृत्ति । ते निरोपा कैलासपति । आवडी माझिये ॥१०३॥

शि. उ. ज्ञानं जंगमरुपं स्यात् सोपाधिनिरुपाधिकं ॥
भक्तप्राण समायुक्तं एतज्जंगम लक्षणं ॥ ११ ॥

सदाशिव म्हणे मेनके ऐक । जंगमाचें रुप ज्ञान एक । ज्ञाना वाचून आणिक शोभेचिना ॥१०४॥ ज्ञान म्हणसी ते कोण । तरी वस्तुचें जाणपण । जाणोनि स्वयेंचि झाला आपण । तोचि जंगम जाणिजे ॥१०५॥ ब्रह्म होओनि सदा

असत | सदा शिवानंदे डुल्लत | करी ना तो करवित | कर्ता ना अकर्ता तो ||१०६|| मी तूं पणाच्या भास त[illegible] तुम्हेची कोणे काळेसी | उपाधि निरुपाधिसी | विरहित तोचि जंगम ||१०७|| तो स्वतंत्र विधिने असे | कोणा अधीन तो नसे | गुरु बुद्धि विण कांही करीतु नसे | तोचि जंगम उत्तम ||१०८|| तोचि गुरुमोक्षदाता | मोक्षहि होय पाया लागता | न मानी तो सर्वथा | श्लाघ्यता कांही ||१०९|| मुक्त म्हणीजे सुटिला | बद्ध म्हणिजे बांधिला | जो मुळीच बांधिला नाही त्याला | सुटला म्हणावे काई ||११०|| का जो बंध मोक्षातीत | वस्तूरुपचि असे साक्षी-भूत | वस्तुसी बंध मोक्ष म्हणता संत | हासती ऐकोनिया ||१११|| तो स्वये स्वरुपचि होओन | असे निर्विकल्प निर्गुण | निराश निजभरित निर्वाण | तोचि जंगम उत्तम ||११२|| तो ध्येय ध्याता ध्यानासी | अतीत ज्ञेय ज्ञाता ज्ञानासी | भोक्ता भोग्य भोगासी | विरहीत तो जंगम ||११३|| कर्ता कार्य कारणासी | अतीत दृश्य दृष्टा दर्शनासी | सत्वरजमत त्रिगुणासी | विरहित तो जंगम ||११४|| ऐसा जंगम तो वीरशैव | तोचि भक्ताचा सगुण जीव | न धरी कदापि द्वेष भाव | स्वधर्मी जना तारक ||११५||

अंगमिश्रितमाचारो आचारः प्राणमिश्रितः ॥
प्राणमिश्रितं लिंगं लिंगम् जंगममिश्रितं ॥ १२ ॥

अंग आचारासी मिश्रित असे । आचार प्राणासी मिश्रित वसे । प्राण तो लिंगासी आश्रित असे । लिंग जंगमी मिश्रित ॥११६॥ एवं परस्पर येरयेरास । मिश्रित होओनि असति समरस । येणे विधी वर्ते जो गुरु रूपत्यास । बोलिजे शुद्ध जंगम ॥११७॥

काम क्रोध विनिर्मुक्तो लोभ मोह विवर्जित: ॥
सर्वसंग परित्यागी सर्व श्रेष्ठस्तु जंगम: ॥ १३ ॥

काम क्रोधादि विरहित । मोह दंभासी अतीत । सर्व संगासी विनिर्मुक्त । तोचि जंगम श्रेष्ठ बोलिजे ॥११८॥ आता कामक्रोध कोण्या रिती । लोभ मोह कवणा म्हणती । त्याग म्हणिजे कोण स्थिती । जाणोनि मग त्यागिजे ॥११९॥ काम तो बहूता परि असे । एक काम स्वर्ग सुख मानसी वसे । स्वर्गांगनाभोग अमृत पान असे । त्यासाठी कामी लुब्धती ॥१२०॥ एक काम राज्यादि भोगासी । इच्छिताती गजांत लक्ष्मीसी । एक पाताळादि भोगासी इच्छितो काम ॥१२१॥ एक काम विषय इच्छा धरी । वरपडा पडे दाही विषयावरी । एक काम फळ इच्छा अंतरी । पुढे भोगु म्हणोनि ॥१२२॥ येणे परि काम असे बहूता परीसी । त्याने नाडिले थोर थोरासी । तया त्या गुन जो राहे त्यासी । शुद्ध जंगम बोलिजे ॥१२३॥ स्त्री काम महा बाधक । त्याते त्यागित असे [illegible] सुख । त्या

कामासी भिति ब्रह्मादिक । दुर्धर म्हणोनि ॥१२४॥ या लागे धन्य त्याचे जाणपण । जेणे सर्व काम टाकिले थुंकून । तोचि एक जंगम जाण । शिवाचारासी तारक ॥१२५॥ ऐक क्रोधाची खूण । बरवे पण पराचे देखून । वाटे करावे तयाचे नाशन । त्या नांव क्रोध जाणिजे ॥१२६॥ इच्छिले काम पूर्ण न होता चित्ते । महा चरफडीचे ये भरते । शुद्ध क्रोध म्हणो तयाते । कामाचा पुत्र क्रोध तो ॥१२७॥ कामाचा होता हरास । तरि ठाव नुरेचि क्रोधास । त्या दोहीसी अतीत जो त्यास । शुद्ध जंगम बोलिजे ॥१२८॥ लोभे लोभोनि मोहित । मोहिले नुबळें चित्त । लोभे स्त्री बाळे समस्त । आपुलि म्हणूनि मोहिला ॥१२९॥ बरवा पदार्थ देखोन । तेथें लोभ मोह न धरोन । जो निरपेक्ष सत्य शरण । तोचि लोभ मोहातीत ॥१३०॥ तो बरपडा नव्हे षड्विकाराचरी । दर्शन माने फुगारा न धरी । माझे तुझे भेदासी अंतरी । थारा नेदिच तो ॥१३१॥ स्वये विषयाते विषमानी । स्वर्गादि सुख तुच्छ गणी । स्वये गुरु रुपचि होओनि । असे तो उत्तम जंगम ॥१३२॥ उच्च कोणासी न करी कचकच । कोणासी न बोले उच्च निच्च । लटिके त्या गुनि वदे साच । तो उत्तम जंगम ॥१३३॥ कुचेष्टा कुचाळी । न करी कदा रळी रांगोळी । कु वाक्ये कोणा न सळी । तोचि उत्तम जंगम ॥१३४॥ जो पर जिवाची न करी हिंसा । पर निंदा न करी काही

आशा|परस्त्रिया मानी मातेशा| तोचि जंगम उत्तम||१३५|| तो निर्मळ तरि कैसा | पाताळ गंगेचा ओघ जैसा | राव रंक जया सरिसा | तोचि उत्तम जंगम ||१३६|| तो परमानंद भरित | कधी नाही हकहकित चित्त | कोणासी न परि हासित | तोचि जंगम उत्तम ||१३७|| सहज स्थिती तेणे असणे | भक्ति विणा न राहणे | परापेक्षा घेणे देणे | तोचि जंगम उत्तम ||१३८|| सर्व त्यागुनि विरक्त असणे | अन्न वस्त्रा लोलुप नसणे | वैराग्य वृत्ति सदा राहणे | जंगमोत्तमाचे ||१३९|| सर्व त्यागावे हे श्लोकीचे पद | तरी काय त्यागावे ऐक भेद | सर्व दोषांचा उपडिजे मूळ कंद | अहंकार तो ||१४०|| एकला अहंकार त्यागिता | सर्व त्यागिले होय तत्वता|जेवि मुळिहूनि वृक्ष उन्माळिता|शाखा पल्लव उन्मळिले ||१४१|| तेवि अहंकार त्यागिता सर्व | त्यागिले होय भव भाव | तोचि जंगम जाणिजे देवाधिदेव | आम्हासी वंद्य तो देवि ||१४२|| त्याचे दर्शन स्पर्शन | जरि घडे संभाषण | तरि भक्ति मुक्ति ओळंगे अंगण | कल्पांत वरी ||१४३|| तो पाहे जयाकडे कृपादृष्टी | तरि होय तया आनंदाची सृष्टी | स्वानंदा चढे पुष्टि | उठाउठी तत्काळ ||१४४|| त्याची भेटी व्हावयासी | कांही पुण्य असावे गाठीसी | पुण्या वाचून न भेटे कवणासी | सत्य शरण तो ||१४५|| पदरी कांही पुण्याची असेल जोडी | तरीच जंगम लिंगी होय आवडी | अन्य तो [illegible] कबाडी |

संसारी बद्ध तो ||१४६|| सुख पदार्थ दृष्टी देखोनि | त्याची इच्छा करी लोभ धरोनि | की कुकर्मासि आश्रय देऊनि -| वर्ते त्या जंगमा सोडावे ||१४७|| स्वतः न पाळी शास्त्र निती | सांगे तया विपरित बोलती | अधर्मे कुळे नरका जाती | सत्य जाण ओ देवि ||१४८|| स्वधर्माची जो करी निंदा | स्वकर्णे ऐके मुदा | प्रत्यूतर न देत कदा | जंगम वंश नव्हेची तो ||१४९|| ज्ञाति जंगम असून | जो न धरी स्वधर्माभिमान | तो श्वान शुकर योनि जाण | भोगी देवि कल्पवरी ||१५०|| जो अखंड स्वधर्माते | प्रति पादि-तसे सदर्थे | करी धर्म प्रसिद्धि जगाते | जंगम वंश तोचि जाण ||१५१|| ऐसा आता जो निरोपिला जंगम| तोचि वीरशैव मार्ग उत्तम | तुझे स्वरुप हे तुझे वर्म| तुज निरोपिले ओ देवी ||१५२|| श्री शंकराने पार्वती प्रति |निरोपिली जंगम स्थिती | ही वीरशैव धर्माची स्तुति | उच्चारिता पुण्य बहू ||१५३|| इति श्री परमरहस्य सारा-मृत | शिव गौरी संवादी वर्तत | त्याची टीका करोनि प्राकृत | कृत कृत्य मन्मथ ||१५४||

इति श्रीपरमरहस्ये हरगौरी संवादे भक्तमार्ग जंगमस्वरुप वर्णनं नाम नवमोध्यायः समाप्तः श्लोक १३ ओव्या १५४



## अध्याय १० वा

श्री शिवायनमः । नवम अध्यायी जंगम स्वरुप । वर्णिले स्वामी तुम्ही अमुप । परी मम हृदयीचा संकल्प । उरलाचि असे ॥१॥

दे. उ. शिवयोगीस्वरुपस्य जंगमार्यस्य के गुणाः ॥
स्वरुपं च तथाचारः श्रोतुमिच्छामि सांप्रतं ॥ १ ॥

जो शिवयोगी जंगमलिंग असे । त्याचे गुण निरोपा कैसे । त्याचा आचार कवणे स्थिती वसे । हे निरोपा स्वामी ॥२॥ आणिक विचारु मुख्य खुण । जंगमाचे कवण चिन्ह । इच्छा उदेली मजलागून । पूर्ण करी कृपाळुत्वे ॥३॥

शि. उ. जंगमं लिंगमाख्यातं द्वयमेकास्ति तत्तथा ॥
द्वयमेव समायुक्तं श्रेष्ठं तल्लिंगजंगमः ॥ २ ॥

जंगम लिंग एकचि असे । बाहेरी नामाचा भेद दिसे । ऐसा जाणोनि भेद समरसे । तो उत्तम जंगम ॥४॥ जंगम लिंगांत लिंग जंगमांत । एवं येरयेराते मिश्रित । अभेद भेद उभयात । जाणोनि वर्ते तो जंगम ॥५॥ जैसे पुष्प परिमळात । कि परिमळ पुष्पांत । भेद नाही येरयेरात तेवि लिंग जंगमी ॥६॥ रस जळांत कि जळ रसांत । गुळ गोडित कि गोडी गुळांत । तीळ तेलांत कि तेल तीळांत । भिन्नभेद दिसेना ॥७॥ तेवि लिंग जंगमाते जंगम लिंगाते ।

भेद नाही सर्वथा उभयाते । ऐसा ऐक्य भावे निभ्रांते । तोचि शुद्ध जंगम बोलिजे ॥८॥ जंगम आणि स्थावर । बोलती द्वय विचार । भेद कैसा वर्ते साचार । ऐक शक्ति सावधपणे ॥९॥ एका रुपी लिंग जंगम । असती जाण सप्रेम । म्हणोनि गुरुत्वाचा नेम । तया प्राप्त झाला की ॥१०॥ सद्योजातादि पंच वदन । मम मुखे असती प्रसिद्ध जाण । तेथुन उद्‌भवले तीच खूण । जंगम लिंगाची असे पँ ॥११॥ जंगम आणि लिंग एक । बाह्य नामाचा भेद देख । परि असे ते व्यापक । सर्वा ठाई सर्वदा ॥१२॥ त्याच्या दर्शन मात्रे करुन । अष्टोतरशत तीर्थे होती पावन । तो सकळा श्रेष्ठ पुज्यमान । उत्तम जंगम बोलिला ॥१३॥

मुखे मंत्रो हृदिध्यानं मस्तके लिंगधारणं ॥
शिखारुद्राक्षभस्मानि ह्येतज्जगंम लक्षणं ॥ ३ ॥

मुखी मंत्र हृदयी गुरुचे ध्यान । प्राणासी लिंगासी एकचि आसन । इष्ट प्राण मिश्रित करोन । वर्ते तोचि जंगम ॥१४॥ इष्टलिंग तो अर्च्य लिंग । प्राणलिंग तो ध्यान अंग । समाधिस्त राहे कदा नोव्हे भंग । जंगम प्राणी जाण तो ॥१५॥ त्याचे हृदय ते गुरुचे भुवन । विश्रांतिचे तेचि स्थान । त्याचे मुख ते गुरुचे वदन । म्हणोनि भोक्त तो सर्वासी ॥१६॥ त्याचे चाली गुरु चालत । त्याचे बोली

गुरु बोलत । ऐसा जंगम जो योग युक्त । तो मुकुट मणि माझा ॥१७॥

नि:शब्दं स्थावरम् प्रोक्तं समंत्रो जंगमो भवेत् ॥
लोकपुण्यं परं श्रेष्ठं दैवतं लिंगजंगमं ॥ ४ ॥

स्थावरासी शब्द मंत्र नाही । त्यासी जंगम मंत्रे स्थापन पाही । जीवन कळा त्याचे ठाई । ये-हवी तें स्थावर ॥१८॥ तो जंगम सर्व लोकास । पुज्यमान होय भाविकास । तया पुजिता होय स्वयं प्रकाश । निजभक्तासी ॥१९॥ सद्भावे पुजिता तयासी । नाश होय तत्काळ अविद्येशी । तो पावे शिवरुपासी । जो पुजी का विश्वासे ॥२०॥ विश्वास कैसा म्हणसी । सदा शिव भावे तयासी । पुजोनि तीर्थ प्रसादासी । सेविजे विश्वासोनि ॥२१॥ विश्वासे विण पुजिता । तो पुजा पावे निष्फळता । जंगम लिंगा विण निज भक्ता । अन्य दैवत नाही ॥२२॥ विश्वासे न पुजी गुरु । तो कदा नोहे पैल पारु । जंगम लिंगाचा महिमा थोरु । किती म्हणोनि वर्णावा ॥२३॥ देवाधिदेव जाणोन । जंगम लिंगा करी पुजन । तो स्वरुपी शिव होय आपण । तया जंगमाचे लक्षण ऐक देवी ॥२४॥

नि:संगत्वं निराभासं नि:सीमं निरुपाधिकं ॥
निर्द्वंद्वम् निर्मलम् नित्यम् एतज्जंगमलक्षणम् ॥ ५ ॥

तो नि:संग सर्व संगाचे ठाई । भोई भार नव्हे चि कांही ।

भासमान पण तेंहि आगळे चि असे ॥२५॥ निःसीम म्हणिजे मिति नाही । नसे अधिनत्व ते कोठेंहि । उपाधिचा लेशु तोहि । अंगी नसे तयाच्या ॥२६॥ देही असोनि विदेही । सदा निर्मल नित्य पाही । स्वतःसिद्ध पालट नाही । येणे लक्षणे लक्षित तो ॥२७॥ तो निःसंग का म्हणसी तरी ऐक । संगास्तव होय जन्म दुःख । अंतकाळी जो संग आठवे देख । तेचि होणे न चुके त्या ॥२८॥ जरी असे गुरुचे ध्यान । तरी अंतकाळी तेचि स्मरण । झालिया गुरु-रुप होणें आपण । न चुके पाही ॥२९॥ म्हणोनि ज्याचा संगध्यास असे । अंतकाळी तेंचि आठवे विश्वासे । मग देहांती ते होय सावकाशे । न चुके कोण्हा ॥३०॥ म्हणोनि सर्व संग त्यागून । अखंड गुरुरुपाचे करी पूजन । तेणें अंत-काळी होय तेंचि आठवण । गुरुरुपचि होणे मग ॥३१॥ जंगमपद तेचि गुरुपद जाणा । ऐक तयाच्या सर्व खुणा । गुरुस्थळा पासोनि आपणा । मोक्षप्राप्ती होत असे ॥३२॥ शरण आलिया जंगमासी । गुरुपद देत शिष्यासी । भेद भाव नसे मानसी । शुद्ध अंतःकरणी जंगम तो ॥३३॥ जो शिष्य जंगमपद घेऊन । गुरुपणा मिरवी धुडकावून । कृतघ्न निंदी जंगमा लागून । अपकिर्ती होय त्याची ॥३४॥ जंगम कुळीचा कुमार सदृढ । असावा गुरुपदा-रुढ । जंगमवेश देऊनि हुड । न मिरवावा सिंहासनी ॥३५॥ तेणें होय धर्म [illegible] । पापे अचरति अरिष्ट ।

तया संगे शिष्य श्रेष्ठ | श्रद्धा त्यागिती धर्म मार्गी ||३६||

निष्कलंकं निरापेक्षं निर्दोषं निस्पृहं तथा ॥
सत्यवाक् सदयं शांतमुक्तं जंगमलक्षणं ॥ ६ ॥

निष्कलंक निरापेक्ष गुण दुसरा | निर्दोष निराश सत्यवादी पांचवा खरा | दया शांती सात गुण ओ सुंदरा | तया जंगम लिंगाचे ||३७|| अवधारी ओ पार्वती | ते सात लक्षण जया अंगी मिरवती | तो जंगम कैलास पति | स्वयेचि बोलिजे ||३८|| ते सात लक्षण निर्णय करोनि | एक एक सांगेन विवेचोनि | ते हृदयी धरोनि वर्ते जनी | तोचि सत्य शरण ||३९|| निष्कलंक म्हणीजे वास ना त्याग | वासनेचा कलंक न धरी अंग | वासना त्यागे निष्कलंक च्रांग | तोचि उत्तम जंगम ||४०|| निरापेक्ष म्हणिजे अपेक्षा नाही | कोणासी मागणे नाही कांही | कोणे एके पदार्था चाहि | अपेक्षा न करी ||४१|| अमृताहुनि अधिक भोग | जरि प्राप्त झाले चांग | तरी अपेक्षेचे अंग | तीळ भरी न सेवि तो ||४२|| नित्य तृप्त अखंडित | तया अपेक्षा कैचा हेत | संतुष्ट स्वानुभवे तृप्त | निरापेक्ष जंगम तो ||४३|| वाटेवरी धन पडिले असता | त्यासी धनी कोणी नसता | तेहि अपेक्षेने ठेओनि घेता | निरपेक्षता ती उडाली ||४४|| मग अपेक्षा करोनि घाते | मेळविजे जे नाना भोगाते | ते कांही न घडे सत्य शरणाते | संकटी अडले

जरि ॥४५॥ एवं निरपेक्षता गुण दुसरा । आता ऐक निर्दोष गुण तिसरा । मनादि दोषे इंद्रिय अणुमात्रा। लिंपे चिना ॥४६॥ प्रपंचादि दोष समस्त । परि नातळे जयाचे चित्त । सर्व दोष विरहित । तोचि शुद्ध जंगम ॥४७॥ निस्पृह म्हणिजे स्पृहा नाही । कोणाचा संग असरा न धरी काही । निराश अशा अणुमात्र न करी पाही। कोणा पदार्थाची ॥४८॥ पाताळादि भोग विलास । न घे तो ध्यानी मानस। नाशिवंत जाणोनि सर्वास । निःसंगत्वे वर्ततसे ॥४९॥ ऐसा निःस्पृह गुण चौथा। पांचवा सत्यवादी निरोपु आता । जया लक्षणे मुक्तता। तात्काळ पावे॥५०॥ प्राण जात असता संकटी । तरी असत्य उमठेना ओठी। सदा सत्य वाक्ये वाहे पोटी । स्वहितालागी ॥५१॥ मा अल्पासाठी तत्वता । असत्य वदेना सर्वथा । तो सत्य वादी असत्य बोलता । सत्याची दशा जाय ॥५२॥ ना तरी सत्य बोलोनि इकडे । जीवघात करी जरी तिकडे। तरी वाचा नव्हे लावची जाण फुढे। सत्य वदोनि घात केला ॥५३॥ परमार्थ बोलावा निश्रांत । परि कोणाचे न दुखवावे चित्त । ज्या वचने होय घात पात । ते वाक्य काय खरे ॥५४॥ परमार्थची बोलें वाक्य दीप। दहा जनासी होय सुखरुप । एका दोघाते होय दुःखरुप । तरि तो काय परमार्थ ॥५५॥ एकाचा बुडता संसार । अथवा मुळी घालावया मेली चोर । तेथे लटके बोलोनि वाचवी

जो नर । तो साचचि जाणिजे ॥५६॥ ना तरी साचचि बोलोनि निश्चितार्थ । येरी कडे होतसे घात । तरी ते साच न मानिती संत । सत्य रुपी असत्य म्हणोनि ॥५७॥ जो सत्य वादी पुरुष । कुश्चल दोष युक्त न बोले कवणास । कपटी कल्पानिक वाक्यास । मुखासी न आणि कधी ॥५८॥ सत्य वाक्य जे गुरुचे । सदा मुखी उच्चारण त्याचे । अन्यथा घोष न करी वाचे । ते सत्य वाक्लक्षण पांचवे ॥५९॥ आता आईक दयेचे लक्षण । पीडीता देखे पर जीवा आपण । नेणो सांडील आपुला प्राण । शुद्ध दया त्या नांव ॥६०॥ जीवा तळी आपुला जीव आंथुरी । अत्यंत कृपेने संरक्षण करी । तो कोणासी न दुखवी अंतरी तेचि दया जाणिजे ॥६१॥ कां सर्वाभूती परमात्माचि असे। म्हणोनि कोण्हासी दुख देत नसे। या लागी दया नांदतसे। मूर्तिमंत तेथे ॥६२॥ त्यासी द्वैतार्थचि नसे पाही । कोण्हाचा घात न करी कांही । नेणो आपणचि वर्ते सर्वा देही। ऐसी दया जया पासी ॥६३॥ आपणचि अवघा झाला। मग कांही दुःख होईल आपणाला । आपुले हाते आपुला डोळा फुटला । तरि काय हात छेदिजे ॥६४॥ हात छेदीता दोन्ही होती घात । डोळा फुटला गेला हात । हाताचा अन्याय गिळीता निश्चित । तरि एकचि दुःख ॥६५॥ तैसे कोणी दुःख दे आपणास । आपणहि दुःखविजे त्यांस । तरि आपणचि वरपडा होईजे दुःखास । कां

आपणचि अवघा म्हणोनि ||६६|| या लागी कोणी करीता हानी | दुख दायी कोणासी नोहे ज्ञणी | दुःख दे त्यासी सुख चिंती मनी | त्या नांव दया ओ देवि ||६७|| ऐसी दया ज्या पासी | तो स्वामी होय आम्हासी | तो जगी श्रेष्ठ होय सकळासी | दया निधी जाणीजें ||६८|| आता शांती ते सातवें लक्षण | तें अंगी बाणले संपूर्ण | जैसा अथांगी गुंडा जाय बुडोन | तैसा परवाक्या क्षोभेना ||६९|| पराचे शब्द तीक्षण बाण | तें लागतो धरुनि वर्म संधान | परि न डळमळे जयाचे समाधान | ते शुद्ध शांती वो ||७०|| काम क्रोध दंभ अहंकार | तें असोनि शांतीचा बडिवार | मिरवी तो मुर्ख साचार | सोंग लौकिक नाटक ||७१|| पुर्ण शांती आली जाणिजे केंव्हा | नीचाचे नीच बोल साहे जेंव्हा | कधि नुठि अंहभावा | तें जे तेचि शांति ||७२|| जेथे विकाराची समाप्तता | केले सुकृत न मिरवी सर्वथा | जाणिव शाहणिव ज्ञानाभिमानता | नाही जया तेचि शांती ||७३|| सर्व करिता अपहारास | तरी न धरी अल्प क्रोधास | ऐसी शांती जया योगियास | तो शुद्ध जंगम ओ देवि ||७४|| शांती बाणली ऐसी ज्यासी | काम क्रोध निमाले त्यापासी | मी माझे पदवी बैसवी त्यासी | तो पुज्यमान आम्हा ||७५|| स्वधर्माचा कंटाळा ज्यास | त्याचे ज्ञान भ्रष्ट विशेष | त्यासी भाषण न करी उदास | शांती तया बोलिज ||७६|| ऐसी शांती आदि सात लक्षणे |

ज्याच्या अंगी बाणली भाग्य गुणे । तोचि जंगम मी म्हणे । येर तें वेष धारी ॥७७॥ हे सप्तहि ज्याच्या अंगी लक्षण । त्यासी कळिकाळ येई शरण । तेथे भव भय बापुडे कोण्या मुखे करोन । सन्मुख येती ॥७८॥ या लक्षणी जो जंगम भुषित । त्या आधिन मी कैलास नाथ । त्याचे चरणी तीर्थे नांदती समस्त । काशी आदि करोनि ॥७९॥ तो जिकडे पाहे सहज दृष्टी । तिकडे होय सुखाची वृष्टी । त्यासी वंदी तो उठाउठी । ईश्वरु होय ॥८०॥ तो ज्यासी सुखी राहे म्हणे । त्यासी म्या अगत्य उद्धरणे । तो ज्यासी देववी त्यासी देणे । त्याचिया वचने पार्वती ॥८१॥ आता आणिक एक लक्षण । जंगमाचे निरोपु आपण । ते ऐकता होईजे पावन । निजभक्त जनी ॥८२॥

मुग्धत्वं मूर्तिमंतत्वं मदमोहादिवर्जितं ॥
मायादित्रिलं नास्ति यस्यासौ जंगमस्मृतः ॥ ७ ॥

मुग्ध मौन होओनि असे । कोण्हासी सर्वथा बोलणेची नसे । मा गदारोळ करोनि बडबडीतसे । हे केवि घडे ॥८३॥ तयासी आधिक बोलणे नाही । जरि बोलो लागे हि कांही । तरि अमृताहुनि गोड पाही । तेंहि मपितची बोलणे ॥८४॥ ना तरि पडसादीची उत्तरे । जे बोलिजेती तेचि उमटती अक्षरे । कोणी न बोलता मौनाकारे । चोचि असिजे जैसे

॥८५॥ तेवि जो जितुके बोलें बोलणे । तेणेसी तितुकेचि वदिजे वचने । परि कोण्हासी अधिक उणे । न बोले मौन ॥८६॥ विकाराचा शब्द मुखा नाणि । निंदा कुश्चित न वदे वचनी । शिवमूर्ति शांत होओनि । असे तोचि जंगम तारक ॥८७॥ स्थिर बुद्धि सदामदमोहातीत । कुबुद्धि विकारासी विरहित । माया ममता देह बुद्धि नातळत । व्योमातीत तो ॥८८॥ तो त्रिमळा विरहित असे । त्रिमळा कधि आतळत नसे । तो जंगम मज भीतरी असे । मी तया आत बाहेरी ॥८९॥ म्हणसी ते त्रिमल कोण । प्रथम आणवमल जाण । दुसरा तो मायीय मल कुलक्षण । आला असे माया वशे ॥९०॥ आता तिसरा तो अवधारी । कर्मज म्हणोनि कार्मिक म्हणति एक सरी । त्याचा कर्ता जीव निर्धारी । बोलिला असे सर्वज्ञे ॥९१॥ ऐसिया त्रिमळाते त्यागून । स्वस्वरुपी असे रममाण । ऐसिया शिवदासा जंगम पण । सहजचि प्राप्त होय ॥९२॥

माता नास्ति पिता नास्ति नास्ति नाम कुलस्यच ॥
अयोनि संभवं शुद्धं उत्तमं जंगमस्थलं ॥ ८ ॥

त्यासी माता पिता नास्ति गोत । त्यासी नाम नाही कुळजात । अयोनि संभव सदोदित । चिन्मय चिद्रुप तो ॥९३॥ जंगम स्थलाची ऐक थोरी । माता पिता नास्ति जन्मांतरी । अयोनिज निर्मिला त्रिपुरारी । जंगम वंशा कारणे ॥९४॥

याचा महिमा पूर्ण । पाहा शिखामणिची खूण । तुजे पाशु पत प्रमाण । असे सत्य अवलोकी ॥९५॥ तेंणे होय ते समाधान । स्वधर्मी राहे अभिमान । धर्मोपदेशकांचे मन। आनंद पावे तेणेचि ॥९६॥ जो जंगम अभिमानी प्रचंड । गुरुस्थला जाणा वया शोधी ब्रम्हांड । तो मूळ स्थळाचा दोर्दंड । पारकरी भवार्णवा ॥९७॥ स्वधर्मी निष्ठा ठेवलिया । भवसागरा तरावया । तरि तयाचेया पूर्ण कार्या। विघ्न बाधा न होय पै ॥९८॥ गुरु शास्त्रे असत्य मानिता। तरि नरक प्राप्त होय तत्वता । जंगम मूळ शोधोनि भजता । क्रिया राहे अचूक तेंथे ॥९९॥ क्रियेस्तव शोधावे मूळ । येऱ्हवी वृथा न करी छळ । वेष पाहिलिया तत्काळ । उत्थान द्यावे भक्तिने ॥१००॥ जो भाव राखी गुरु पदासी । जो क्रिया भंगू न दे मानसी । तोचि गुरु पुत्र अविनाशी । पद पावेल सत्वर ॥१०१॥ वेषधारी जंगम होती । भृष्टाचारे ज्ञातीत वर्तती । ते उभयकुल नरका नेती । अधर्माभिमाने करोनिया ॥१०२॥ या करीता जंगम कुळीचा जंगमोत्तम । त्यासीच गुरुपदाचा नेम । म्या निरोपिला स्वमुखे सुगम । तत्रांतरी वेळोवेळा ॥१०३॥

स्वधर्मनिरतामाता पिता यस्य तथैवच ॥
तस्यापि जांगमी दीक्षा गुरु सूत्र क्रमण हि ॥ ९ ॥

शंकर म्हणे हिमनगबाळा । म्या तुज निवेदिले जंगम

कुळा । शुद्ध जंगमाचाची पुतळा । योग्य असे गुरु पद. ॥१०४॥ कोणी गादीस नवस करिती । पुत्र झालिया गादीस अर्पिती । त्याची दीक्षा करोनि सोडिती । सेवा धारी म्हणोनिया ॥१०५॥ त्याने त्यजुनिया संसार । घेऊन जंगम वेष निर्धार । गुरु सेवा करावी फार । आत्म हिता कारणे ॥१०६॥ सेवा धारीस दीक्षा असणे । हे तव शास्त्र अज्ञे प्रमाणे । परि पदारुढ होऊन त्याने । गुरु पद घेऊ नये ॥१०७॥ जरि गुरुपद घे कपटे करुन । तरि तया कृतघ्नता घडे जाण । अधर्मी म्हणती तया लागुन । विश्वास त्याचा न धरावा ॥१०८॥ आपण बुडोन दुस-ऱ्यास बुडवी । स्वधर्माचा अभिमान सोडवी । तेणे तया अधोगतीची पदवी । मिळेल सत्य पार्वती ॥१०९॥

आसप्नमं कुलं शुद्धं यस्यचोभयपक्षकं ॥
तस्य जंगमवंशस्य दीक्षा माहेश्वरी शुभा ॥ १० ॥

या करिता सत्‌शिष्य जाण । सप्तकुळचा शुद्ध पाहून । जंगम दीक्षा तया लागून । द्यावी सत्य उद्धारा ॥११०॥ जंगम कुळीचाच शिष्य । पदी घ्यावयास निर्दोष । उत्तम कुळ शुद्ध विशेष । माहेश्वर पूज्य तोचि ॥१११॥ स्वधर्मीचे ठाई रत । माता पितरा सहित । भुरुद्र अवतार सत्य । गुरुस्थळा जाणावे ॥११२॥ गुरु स्थलाचे महात्म्य । पूर्वी घ्यायी शिवागमे । वर्णिले ते अनुपमे । श्रोत्या लागी

सादर ॥११३॥

> येपुनर्भुवाबाह्या ते न ग्राह्या संकराः तथा ॥
> प्रमादात् प्राप्तदीक्ष्योऽसौ वर्जयेत् श्वानवत् बुधैः ॥ ११ ॥

माहेश्वरी दीक्षा कारणे । सप्तकुळच्या विवाहीत असणे । तरिच माहेश्वरी दीक्षेते पावणे । पुर्नविवाह माता वर्ज्य ॥११४॥ संकर जाती असता । तरि माहेश्वर दीक्षा नाही तत्वता । चुकोनि दीक्षा प्राप्त होता । त्याच्या त्यागचि करावा ॥११५॥ जैसा श्वानाचा स्पर्श पाही । तैसा धरावा भ्रष्ट देही । दीक्षा झाली म्हणोनि कांही । शंका न धरावी तेथे ॥११६॥ गुरुस्थला पासोनि जन्म । त्यासीच क्रियेचा नित्य नेम । तोचि स्वधर्माचा धरी प्रेम । पुर्वाघा कारणे ॥११७॥ नेमे करी त्रिकाळ स्नान । तैसेच भस्म उधळण । न स्वीकारी पर अन्न । सदा कर्मी पवित्र ॥११८॥

> देहं नास्ति कुलं नास्ति नास्ति जिव्हारुचिस्तथा ॥
> नास्त्यासंगः संगो न श्रेष्ठं तज्जंगमस्थलम् ॥ १२ ॥

जेथे देहची नास्ति । तेथे कुळ यातीस कैसी गति । सर्व व्यापक स्वयंभू मूर्ति । परि मुर्तिचा साक्षी तो ॥११९॥ मूर्ति अमूर्ति विरहीत । वर्णाश्रमासि अतीत । दर्शनाभिमाना नातळत । शुद्ध जंगम तो ॥१२०॥ पाची इंद्रिये हाती न धरी । काम्य कर्मेंद्रिया कैची उरी । तेथ लंपट जिव्हा रुचिवरी । काय होईल बो ॥१२१॥ तयासी

भुकेचिया तोंडा। मिळो कोंडा अथवा मांडा। परि दुःख नसे वरपडा। रसने साठी ॥१२२॥ जो संतुष्ट सदा जंगम लिंग। तो न करी हकहक न इच्छी भोग। ऐसा सत्य शरण जो चांग। तो त्रैलोक्यासी वंद्य ॥१२३॥ संग कुसंगासी न धरी। निःसंग एकाकी निर्विकारी। ऐसा जंगम स्थळी निर्धारी। उत्तम जंगम तो ॥१२४॥

शांत्यैव भस्ममुत्धूळच शुचित्वमणिभूषणं ॥
विषयान् शिक्षितुं दंडं परतत्वं च खर्परं ॥ १३ ॥

शांत निवांत ते शरण। नित्य करी भस्म स्नान। सदा शुचित्व असे अंतःकरण। गंगाजळाहुनि ॥१२५॥ ना तरि त्रिकाळ स्नान करी। द्वादश टिळे लावी शरीरी। जरी त्रिगुण मळकट अंतरी। तरि ते विटंबना की ॥१२६॥ म्हणोनि अंतरी ज्ञाने शुद्ध झाला। बाहेरी क्रियेने क्षाळिला। शुद्ध शुचित्व बोलिला। शिवाचारा संपन्न तो ॥१२७॥ ऐसे शुचित्व लक्षण। ते रुद्राक्ष माळा भूषण। सूवर्ण हिरे रत्न मुक्ताफळ जाण। हे भूषण नोव्हे त्यासी ॥१२८॥ त्याचे भूषण ते शुचित्व लक्षण। येर ते तया तृणासमान। विवेकाचा दंड करोन। विषयासी दंडी सदा ॥१२९॥ धरोनि विवेकाचा दंड करी। विकारा पशुत्वाते निवारी। परम तत्वाची हाती खापरी। येणे भूषणे भूषित तो ॥१३०॥

रुपारुपं समाख्यातं कामनिष्काम एवच ॥
माया निवारणे नोवतम् एतज्जंगम लक्षणं ॥ १४ ॥

रुपा अरुपत्वें मानी । चांगले ओखटे न करी कडसणी । जे जे दिसे तें ते शिवार्चनी । निंदा स्तुती दोन्ही न करी ॥१३१॥ काम निष्काम नाही भावना । माया सांडोनि निर्माय झाला हे आठवेना । निराकार निर्माय जाणा । वस्तु आपण ॥१३२॥ हेचि भावी भावने रहित । मा निर्मा-येसी नातळत । परात्पर होओनि असत । येणे लक्षणे॥१३३॥

पंचाक्षरं पंचववत्रं प्रणवं मूर्तिसंयुतं ॥
परत्वस्यपरिज्ञानम् श्रेष्ठं तज्जंगमस्थलम् ॥ १५ ॥

पंचाक्षरी पंचमुखी जाण । तो पंचमुखे ओंकारा पासून । ओंकार परतत्वा पासून उत्पन्न । ते परतत्व जो जाणे ॥१३४॥ ते परतत्व गुरुमुखे जाणोनि । मग तेचि असे होओनि । जागृति सुषुप्ती स्वप्नी । पालटू नाही जया ॥१३५॥ तो मनुष्य देहि ही भावना । न भाऊन वस्तुत्वे भावी आपणा । तोचि जंगम श्रेष्ठ जाणा । शिवाचारासी गुरु होय ॥१३६॥

आचारोवाप्यनाचारो सीमानिःसीमवर्जितः ॥
गमनागमनं नास्ति स एवोत्तमजंगमः ॥ १६ ॥

त्यासी आचार अनाचार नाही । कोण्ही म्हणती ते बोलणे कांही । तरि याचा निर्णय पाही । निरोपु ओ देवि ॥१३७॥

तो आचार करोनि अकर्ता । म्हणोनि आचार नाही सर्वथा । अनाचार तरि तत्वता । आचरेचि ना ॥१३८॥ म्हणोनि आचार अनाचार नाही । बोलीलो तेंहि अनुभवे पाही । येऱ्हवी आचार सोडो नये कांही । जरि वस्तुरुप झाला ॥१३९॥ हरपली वस्तु तरि दीपु पाहिजे । सापडलिया मग दीपु त्यागिजे । येणे परि क्रिया त्यागिली म्हणिजें । तरि न मानिती संत या बोला ॥१४०॥ क्रिया करोता वस्तुचि जरि झाला । तरि न त्यागिजे आचाराला । जरि आचार त्यागि तरि मोडिला । भक्ति पंथ आपणचि ॥१४१॥ येथे त्याग अत्यागाचा सोस नाही । जरि गुरु कृपे आपणचि वस्तु होई । तरि सहजचि ढाळे ढाळे राही । आचार क्रिया ॥१४२॥ तो आचार क्रिया करोनि अकर्ता । फळ हेत नाही त्याचे चित्ता । तेंथ मी मा न मा कोण म्हणता । माझे तुझे ॥१४३॥ तया गमनागमन तरि नाहीं । जरि गमन करि तरि ठाईचा ठाई । देह हिंडता आपण पाही । स्थिर अढळ असे तो ॥१४४॥ कुंभाराचे चाका खालील । खुंटा जैसा असे अढळ । तैसा गमनागमनी निश्चळ । मेरु जैसा ॥१४५॥ त्याचे ईथुकेचि अर्थ वर्म । जे अकर्ता केवळ परब्रम्ह । सृष्टी विचरे भक्ताचे प्रेम । द्यावया लागी ॥१४६॥

जंगमे गमनम् नास्ति स्याच्चेतद् भक्तमन्दिरम् ॥
अन्यस्य गृहमिच्छेद्यः सद्योगीमांस भक्षणम् ॥ १७ ॥

जंगमासी नाही गमनागमन | जरी उठेचि मनी गमन कारण | तरी भक्ताचे गृही जाणे जाण | निराश पंथे ||१४७|| अभक्त भवीच्या गृहासी | जावयाची इच्छा धरी मानसी | तरी गोमांस भक्षण घडे त्यासी | पातकिया होय तो ||१४८|| अभक्त भवि म्हणिजे कवणासी | पंच कळश दीक्षा नाही ज्यासी | गुरु विण जीवे त्या निगुरीयासी | अभक्त भवि बोलिजे ||१४९|| शिवभक्त म्हणवी आपणासी | पुजी आन दैवतासी | अभक्त भवि बोलिजे त्यासी | अनाचारी म्हणोनि ||१५०|| तीर्थ प्रसादाची वार्ता | कधी कोणे काळी नेणे सर्वथा | लिंग पुजनी नावडी चित्ता | तो गे तोचि भक्त भविया ||१५१|| ऐसीया भवीच्या घरासी | जरि इच्छा धरी मानसी | तरि आमिष भक्षण घडे त्यासी | या लागी भवी संग त्यागिजे ||१५२|| पंचकलश दीक्षा शिव मंत्र ज्यासी | एक जाणे गुरुलिंग जंगमासी | तीर्थ प्रसादी प्रेम भक्त बोलिजे त्यासी | त्याच्या घरा सुखें जाणे ||१५३||

भवनेन मुखगोष्टिः स्यान् अनं भक्तप्रतिग्रहम् ॥
भक्तैः सहत्वंसन्नित्यम् भक्तानाम् गृहसंग भाक् ॥ १८॥

ऐसिया शिव भक्ताचे घरी जाईजे | त्यासी गुह्य गोष्टी बोलिजे | त्याचे अन्न धन दान प्रतिग्रह घेईजे | गुरुकर जात म्हणोनि ||१५४|| जो एकभावें पुजि गुरुलिंग

जंगम | ज्यासी तीर्थ प्रसादी नित्य नेम | त्याचा संग कीजे उत्तम | भविसंग त्यागोनिया ||१५५||

भक्तस्त्री भक्तहस्तेभ्यः शुचिरन्नम् प्रतिग्रहः ॥
भक्तकायनिवेध्यं च इत्येज्जंगमस्थलम् ॥ १९ ॥

भक्ताचे स्त्रीचे हस्ता कुण | सेवा घेईजे प्रेम भक्ति कूण| भक्ता घरीचे अन्न पाणी सेवन | क्रिया मुखे किजे देवि ||१५६|| ज्या भक्ते कीजे तन मन धन अर्पण | त्याची काया किजे पावन | ऐसे हे जंगम स्थान | निरोपण करी शिवभक्ति ||१५७|| वीरशैवाचे संस्कार | गर्भादि अंतकालावर | लिंगधारीने सत्वर | गुरु हस्ते करवावे ||१५८|| गुरु तोचि असे देख | उपगुरुचा वंशक | तया हस्ते ही मांत्रीक | क्रिया करावी शास्त्राज्ञे ||१५९|| शिवाचारासी जंगम गुरु | ऐसा आगम गर्जे मेरु | तोचि करील भवपारु | वीरशैवा लागुनी ||१६०||

लिंगार्पितम् न कर्तव्यम् कर्तव्यं जंगमार्पितम् ॥
लिंगजंगमसंयुक्त जंगमस्य विशेषतः ॥ २० ॥

जंगम मुखे वीण अर्पण | लिंगासी नोव्हे हो जाण | समीप जंगम न होता नैवेद्यन | स्वमुखे कीजे ते ऐका ||१६१|| अन्ना वरोनि हात फिरवोनि लिंगासी दाविजे | तोचि हस्त मुखा लाविजे | येणेचि परि तीन वेळा कीजे | निवेदन लिंगासी ||१६२|| लिंग जंगम संयुक्ते कुण |

प्रसाद कीजे विश्वासे कुण। तोचि जंगम त्रिजगती पावन। मजहि पूज्यमान तो ॥१६३॥ लिंगासी दाविल्याविण तृण-काडी । न सेवि सर्वथा थोडी । विष अथवा अमृत गोडी। विसरोन तो न घाली मुखी ॥१६४॥ हे का म्हणसी तरी ऐक। गुरु लिंग जंगम तिन्ही एक । म्हणोनि लिंगासी पुजिता देख। गुरुचि पुजिला होय ॥१६५॥ तैसाचि जंगम पुजिता देख। गुरुची पुजिला होय विशेख। म्हणोनि गुरुलिंग जंगम एक । भावे पुजि तो जंगम अथवा भक्त ॥१६६॥ कोणी म्हणती जंगम तो परब्रह्म। त्यासी पुजेचा कायसा नेम। वस्तु झालिया क्रिया कर्म धर्म। कायसा तयासी ॥१६७॥ तरि यदर्थि उत्तर ऐकिजे। शिव शिवेचि यजिजे। हे उत्तर श्रुति शास्त्री बोलिजे। जाणती शिवशरण ॥१६८॥ देव होओनि देवा भजिजे। आपुलिया भक्ति सुखा आपण घेईजे। आपणचि भक्ति सुखा वाढविजें। आपुलिया सुखासाठी ॥१६९॥ जेणे जीवासी दिधले शिवपण। आणि रंकासी रावपण। म्हैशासी सिंहपण। दिधले ज्या गुरुने ॥१७०॥ त्या गुरुची न किजे कैशी भक्ति। न करिता जाय अधोगती। सायुज्याचे माथां नांदती। गुरु भक्ति ओ देवि ॥१७१॥ भक्ति विण नुसते ज्ञान। ते जैसे नासिके विण मुख जाण। या लागी भक्ति वैराग्य ज्ञान। संपन्न तो उत्तम जंगम ॥१७२॥

स्थावरार्पितनैवद्यं न मेस्यात् तृप्तिकारकं ॥
जंगमार्पित नैवद्यं मम तृप्तिकरं परम् ॥ २१ ॥

स्थावरी करीता निवेदन । तेणे मी तृप्त नोव्हे त्रिनयन । जंगम लिंगी करीता अर्पण । मी तृप्त होय ओ देवि ॥१७३॥ ज्यासी नाही शिवाचार । त्याने पुजिजे स्थावर । ज्याचे हृदयस्थळी शंकर । त्याने स्थावर पुजू नये ॥१७४॥ अमान्य करोनिया हृदयीचे लिंग । जो धरी स्थावरी भक्ति अंग । तो शिव भक्त नोव्हे केवळ सोंग । बहुरुपियाचे ॥१७५॥ इष्टलिंग लोळतसे उराखाली । अन्य स्थावरा दंडवत घाली । त्याचे मुख देखता अंघोळी । वस्त्रासहित करावी ॥१७६॥ गळा असोनिया त्रिनयन । जो अन्य देवताचे करी उपासन । तो भविहून परता जाण । लिंग निष्ठा नाही म्हणोनिया ॥१७७॥ या लागी लिंगी निष्ठा धरिजे । जंगम हि तद्रूप मानिजे । जंगम मुखे लिंगासी अर्पिजे । तेणे मी तृप्त ओ पार्वती ॥१७८॥

निराकारं च साकारं निर्विकारं सुखावहं ॥
साक्षात्मुक्तिपदं भावमुत्तमं जंगमस्थलम् ॥ २२ ॥

जंगम स्थळ ते निराकार । तेचि बोलिजे साकार । साकार होओनि निर्विकार । षड्विकार विरहीत ॥१७९॥ते षड्विकार म्हणसी कोण । जायते स्थिती विवर्धते तीन । चौथा विपरिणमते पांचवा अपक्षियते जाण । मृत्यू तो साहवा

विकार ॥१८०॥ या विकाराचा निर्णय सांगेन । जायते म्हणीजे जन्मला आपण । अज अजन्मा आत्मा असोन । मी जन्मलो हा विकार वाहे ॥१८१॥ स्थिती म्हणिजे मी एक इथे आहे । नाही हे आत्म्यास नांही पाहे । तो सदोदित अस्ति नास्ति होय ना जाये । ऐसे असोनि मी एक आहे म्हणे ॥१८२॥ मी एक आहे म्हणिजे स्थिती । तो मी नाही होईन हे हि वाटे कि चित्ती । असे नसे मी हा विकार दुसरा स्थिती । श्रुति बोलती ग्वाही ॥१८३॥ तिसरा विवर्धते विकार । म्हणे मी वाढतो होतो लहान झालो थोर । आत्म्यास वाढणे लहान थोर आकार । घडे काय तो ॥१८४॥ आत्म्यासी विवृद्धि वाढणे नाही । तो जैसा तैसा असे तिही अवस्थाच्या ठाई । ऐसे असता म्हणे मी वाढतो देही । हा विकार वाहे नुसताचि ॥१८५॥ परिणमते विकार चौथा । मी तरुण विषय विलास भोक्ता । ऐसी तारुण्याचो वाहे अवस्था । विसरोनि आपणया ॥१८६॥ आत्म स्वरुप ते तरी स्वतः सिद्ध । त्यास कैसे बाल्य तारुण्य वृद्ध । ऐसा असोनि निज बोध । मी तरुण हा विकार वाहे ॥१८७॥ अपक्षियते तो विकार पांचवा जाण । म्हणे मी म्हातारा मज वृद्धपण । आता मज येणार मरण । ही घोकणीच राहे चित्ती ॥१८८॥ वृद्ध अवस्था आत्मत्वी न लगे । तव मृत्यू अवस्था कैसी लागे । मी मरेन हा विकार वाहे अंगे । नाशिवन्ति देह बुद्धि ॥१८९॥

आत्मा तरी जरा मरणातीत | त्यासी जन्मला ही स्थिती वाढवीत | तारुण्य वार्धक्य मृत्यू भावित | हे साही विकार नसताचि ||१९०||ऐसीया षड्विकारासी नातळत |म्हणोनि सदा सुखरुप सदोदित | तोचि उत्तम जंगम जग भरीत | सद्गुरु बोलिजे त्यासी ||१९१|| तो साक्षात प्रभू साक्षीभूत | त्यासी चाऱ्ही मुक्ति शरणागत | तो पावला निर्गुण मुक्ति निभ्रांत | हे ही बोलणे न्यून ओ देवि ||१९२|| बद्ध म्हणीजे बांधिला | मुक्त म्हणीजे सुटला | बंध मुक्तिचा निर्णय केला | हाच की साधुजनी ||१९३|| जो मुळिच बांधला नाही | त्यासी सुटला म्हणणे कायी | म्हणोनि बद्ध मुक्त वेगळा पाही | जंगम तोचि जाणिजे ||१९४|| स्वप्नी राजा मोळिविक्या झाला | जागृति आलिया पाहो लागला | तव राज्यपदी देखे आपणाला | स्वप्न मिथ्या झाले ||१९५|| जरि राजा स्वप्नी मोळीविक्या झाला | तरी राजपदा काय मुकला | निद्रेस्तव भास जो भासला | तो लटिका नसताचि ||१९६|| तैसे लटिकेचि बांधले पण | तें सत्यत्वे भासे संकल्पे जाण | तो गुरुकृपे संकल्प गेलिया निक्षोन | मग कोण बद्ध मुक्त म्हणे ||१९७|| ऐसा बंध मुक्तिसी विरहित | षड्विकारासी अतीत | ऐसिया जंगमाचे मी करीत | ध्यान ओ देवि ||१९८|| तो धीर गंभीर अचल अढळ | अकुळ अमुळ अद्वैत अकळ | अव्यक्त अविनाश अमळ | त्रिमळा विरहित ||१९९||

अनाम अगम्य अगोचर । अनुपम्य अलक्ष अपरंपार । अकल्पीत असंग अगणित अपार । नेणवें कोणा ॥२००॥ निर्गुण निराकार निजरुप । निर्धूत निरामय निर्विकल्प । निष्प्रपंच निःसंग निष्पाप । निर्वैर सर्वाभूति ॥२०१॥ निराश निश्वास निराभास । निर्गंम्य निरुपम निजानंद निःशेष । निश्चळ निरीच्छ निर्दोष । निरंजन मुर्ती जंगम ॥२०२॥ जगदाकार जगन्निवास । जगद्रुप जगन्नायक जगदीश । जगज्जीवन जनी वनी वास । सर्वत्र जयाचा ॥२०३॥ व्यापून सकळ ब्रह्मांडास । सर्वत्र असे जयाचा वास । परब्रह्म पुरुष अविनाश । जंगम तो ॥२०४॥ परब्रह्म परमेश्वर परमानंद । परवस्तु परात्पर प्रसिद्ध । परमगहन परंधाम निजानंद । परम पावन जंगम तो ॥२०५॥ चिद्रूप चैतन्य चिद्घन । चिदानंद चिन्मात्र पूर्ण । चिदैक चिद्विलास चैतन्यघन । सच्चिदानंद तो ॥२०६॥ सदोदित सबराभरित । सद्रुप सदोदित सदा शांत । सत्स्वरुप सद्बोध सुमत । कुमतातीत जो जंगम ॥२०७॥ जो स्वये प्रभुरुप झाला । पुनःकाय वर्णावे तयाला । अमृता गोड ऐसे बोलता बोला । बोलचि लाजे ॥२०८॥ का गोडचि त्यासी गोड म्हणणे । म्हणता म्हणणिया उणे । गोडचि त्यासी गोडपणे । काय स्तविजे ॥२०९॥ तैसे अनुपम्य वस्तु पुर्ण पणे । जे असे ते आपण झाला गुरु कृपेने । त्यासी काय वर्णावे कवणे । तेथे वेद श्रुति थकित ॥२१०॥ ऐसा जंगम तो

शिवमुर्ति । निराभास भासेना कोणा प्रति । अढळ ढळेना प्रळय कल्पांती । म्हणोनि निश्चळ सदा तो ॥२११॥

नादं निश्चललिंगस्य बिंदूनिश्चल जंगमः ।।
नादबिंदुसमायुक्तं श्रेष्ठं तज्जंगमस्थलम् ।। २३ ।।

लिंगासी नाही जैसा नादु । तैसा जंगमासी नाही बिंदू । नादबिंदू समायुक्तं ऐसा बोधु । जंगम लिंगासी असे ॥२१२॥ लिंग नादाविण मौन केवळ । न बोले कोणासी असे निश्चळ । तैसा जंगम हि न बोले कोणासी निवळ । होओनि असे तो ॥२१३॥ तयासी बोलणें तरी नाही । परि परोपकारार्थ बोलें जरि काही । ज्या बोले सुख होय परदे हि । तैसे बोलणे बोलें ॥२१४॥ म्हणोनि नाद बिंदूसी अतीत । नाद ते बोलणे नाही बहूत । नाद जिंतिला मौने निश्चित । होओनि ठेला ॥२१५॥ परि आपुले क्रिया कर्मे करी । केलियाची सय न धरी अंतरी । प्रवृतीत लौकिक बोल जिव्हाग्री । नाणी कदा तो ॥२१६॥ म्हणोनि नादातील जंगम । बिंदु तरिच तो निःसीम । तो शिवभक्ति रुप देखें परब्रह्म । तव बिंदु कैचा तया ॥२१७॥ या लागी नाद बिंदु कला जोंति । विरहित जो परब्रम्ह मुर्ति । हे उत्तम स्थळ ओ पार्वती । निरोपिले तुज ॥२१८॥ ही जंगम लक्षण स्थिती । देवि निरोपिली तुज प्रती । हे एकोनि ऐसे जे होती । ते धन्य होती संसारी ॥२१९॥ जंगम ऐसे

म्हणवावे । आणि या लक्षणी न वर्तावे । तरि ते सोंग जाणावें मैंदाचिये घरीचे ॥२२०॥ या लागी धन्य तोचि जंगम । जो येणे लक्षणे वर्ते उत्तम । तोचि जाणिजे परब्रह्म । मी हि वंदी तयाते ॥२२१॥ हे जंगम स्थळ पवित्र पावन । पार्वती तुज निरोपिले प्रेम जाणोन । ऐकता सद्भाव धरोन । शिवलोका पाविजे ॥२२२॥ इति श्रीपरमरहस्य सारामृत । शिवगौरी संवादि वर्तत । त्याची टीका करोनि प्राकृत । कृत कृत्य मन्मथ ॥२२३॥

इति श्रीपरमरहस्ये हरगौरी संवादे जंगमस्थळनिरोपणं नाम दशमोध्यायः समाप्तः श्लोक २३ ओव्या २२३



## अध्याय ११ वा

श्री शिवायनमः मागील अध्यायी जंगम महात्म्य । श्री परमात्मे वर्णिले अत्युत्तम । परमरहस्य अनुपम । विशेषे करुन वर्णिले ॥१॥

दे. उ. को भेदो नादरुपस्य बिंदू भेदस्तथैव च ॥
कलारुपभिदं देव ब्रुहि मे परमेश्वर ॥१॥

पार्वती म्हणे देवाधिदेवा । नादरुपाचा भेद निवेदावा । बिंदू भेद तोहि दाखवावा । कळा रुप ते कोण कैसे ॥२॥

त्याचा निरोपावा भेद । मी अज्ञानी मतिमंद । पुरवावा माझा हा छंद । कृपाळुत्वे परशिवा ॥३॥

शि. उ. नादोगुरुमुखं चैव बिंदुर्लिंगमुखं तथा ।
कलाचरमुखं ज्ञात्वा अर्पयेत् स प्रसादभाक् ॥ २ ॥

ईश्वर म्हणे पार्वती प्रति । ऐक नादबिंदुची स्थिती । सुक्ष्म म्हणती जया प्रति । तेचि तुज निवेदितो ॥४॥ नाद तो जाणावा शब्द । तयाचे स्थान ध्युःशुद्ध । गुरुत्वास तो प्रसिद्ध । आला असे जाण पा ॥५॥ म्हणोनि नाद गुरुच म्हणती । योगी योग्या संकेते जाणविती । अंतरी आनंदे पोती भरती । मापे देति हर्षोनिया ॥६॥ बिंदुचा कैसा विचार आसे । तोहि सदा लिंगरुप भासे । लिंग तो परब्रह्मचि असे । म्हणोनि बिंदु म्हणति तया ॥७॥ कला तो चरलिंगी जाणावी । अव्यक्ता व्यक्तत्वास आणवी । क्रियारुप असोनि आघवी । मोक्षमार्गा दावितसे ॥८॥ ऐसा कलेचा महिमा । शिव सांगे ऐके उमा । प्रश्नोत्तराची सीमा । न वदवे मुखाने ॥९॥ आता सांगू मुख्यखुण । जेणे ज्ञान होय परिपूर्ण । ते संक्षेपे करुन । बिंदु निरोपु आता ॥१०॥ नाद तो गुरुमुखे जाणिजे । बिंदु तो लिंग मुखे ओळखिजे । कला ते जंगममुख म्हणिजे । ऐसा त्रिविध भेद हा ॥११॥ नाद बिंदू कला हे तिन्ही । गुरुलिंग जंगम जाणोनि । अर्पूजाणे भावे प्रसादमुखे

करुनी । तोचि प्रसादी पुरुष ॥१२॥ तोचि प्रसादी महा-ज्ञानी । अज्ञानांधा होय तरणी । जयाचे संसर्गे करुनि । ज्ञान होय मूढ जना ॥१३॥ प्रसादी म्हणावे कोणासी । गुरुलिंग आणि जंगमासी । ऐक्य भाऊनि मानसी । वर्ते निर्मत्सरी सदा ॥१४॥ ऐशा त्या नादबिंदू कळा । प्रसादी मिळाल्या सकळा । ऋद्धि सिद्धिचा पूर्ण मेळा । प्राप्त होय प्रसादिका ॥१५॥ जे प्रसादिक होऊ इच्छिती । त्यानी शरण जावे गुरु प्रति । पाहुनिया शिष्याची आचार शक्ति । स्वशील द्यावे आवडीने ॥१६॥ शील चालविण्या करीता । पाहिजे कुटुंबाची श्रद्धा तत्वता । स्वधर्माभिमाने वर्तता । क्रिया राहे सतेज पै ॥१७॥ क्रियाचारे जो तेजःपुंज । तया भीतो यमराज । तपःश्चर्येचे मूळबीज । थोरी जाण क्रियेची ॥१८॥

> नादबिंदूकलारुपं तद्रूपं भुवि निर्मलम् ।
> गुरुजंगमलिंगाय ज्ञात्वा सततमर्पयेत् ॥ ३ ॥

नाद बिंदू कळा रुप । हे गुरुलिंग जंगमाचे स्वरुप । जाणोनि नित्य अर्पण करी तो निजरुप । उत्तम जंगम ॥१९॥ नाद बिंदू कलेंचे रुप । वरी वर्णिलेसे अमूप । त्रिविध ऐक्य भक्ति स्वरुप । जाणोनि अर्पिजंगम तो ॥२०॥

> गंत्र लिंगमुखं ज्ञात्वा अंगभावेन भावितं ॥
> जंगमस्य मुखं ज्ञात्वा संसारस्य न बंधनं ॥ ४ ॥

जंगम मुख सर्व सुखाधिक | त्याचाहि भेद ऐक | देह भाव-नेस जाणिजे लिंग मुख | लिंग मुखे प्राण सुखी ||२१|| लिंग मुखी जे जे होय अर्पण | तेणे अर्पणें सुखी होय आपण | परि लिंगार्पण जंगम मुखे जाण | लिंगाचे मुख जंगम ||२२|| म्हणोनि जंगम मुखें विण | लिंगासी नव्हे अर्पण | या लागी जंगम चैतन्यघन | परब्रह्मचि तो ||२३|| ऐसिया जंगमाचे करी जो पुजन | विश्वासे सद्भाव धरोन | त्यासी नाही भवबंधन | तो चिद्रूप होय ||२४|| त्याचे मुखीचा प्रसाद चरणीचे तीर्थ | जो सेवी विश्वासे परम भक्त | त्यासी कळिकाळ येती शरणागत | मा भवबंधन कैंचे त्या ||२५||

प्रसादस्य मुखं ज्ञात्वा परं चेह न विद्यते ।।
त्रिविधैक्यमिदं देवि ज्ञातव्यं सोहमेवचं ।। ५ ।।

ऐसा प्रसाद मुखे करुन | जो जाणोन भजे ऐक्य भावे सज्जन | त्यासी इह पर जाण | इच्छिणें नाही ||२६|| गुरुलिंग जंगम त्रिविध | ऐक्य भावे भजे भावना शुद्ध | तोचि भक्त तोचि जंगम निबद्ध | तारक शिवाचारासी ||२७|| तोचि मी मी तोचि जाणिजे | तया मज भेद न मानिजे | तयाचेनि देवपण माझे | येऱ्हवी मी देव ना भक्त ||२८|| पाहता मी निर्गुण निराकार | भक्ति सुखास्तव धरीला अवतार | त्याचे योगे मी देव साचार | तो भक्त

म्हणोनि ॥२९॥ भक्तांगे देव देवांगे भक्त । ये-हवी तो देव भक्त नामाविण सदोदित । परि आपुलिया सुखा देव भक्त । आपणचि होओनि ठेला ॥३०॥ देव भक्त एकचि असत । परि सापेक्ष ऐसी असे मात । नसता देव कोठिल भक्त । आपणचि सर्वत्र भरला असे ॥३१॥ तोच वस्तू इष्टलिंग प्राणलिंग । होवोनि ठेली भावलिंग । भक्ति सुखा लागी रुपे अभंग । अनेक धरिली प्रभुने ॥३२॥

दे. उ. इष्टलिंगमुखं किंवा प्राणलिंग मुखं तथा ॥
भावलिंगमुखं चैव ब्रुहि मे परमेश्वर ॥ ६ ॥

पार्वती म्हणे सदाशिवा । इष्ट प्राण आणि भावा । या लिंगत्रयी प्राण अर्पावा । हे पूर्वी कथिलेसे ॥३३॥ तरि याची वदने किती । ती सांगावी मज प्रति तरिच मी धन्य धन्य त्रिजगती । होईन सत्य स्वामिया ॥३४॥ इष्ट-लिंगासी मुखे किती । निरोपावे कैलास पति । प्राणलिं-गासी कोण मुख गती । मुखे किती भाव लिंगासी ॥३५॥

शि. उ. इष्टलिंगमुखं पंच प्राणलिंगस्य तत्तथा ॥
पंचपत्र मुखं देवि भावलिंगस्य कीर्तितं ॥ ७ ॥

शंकर म्हणे ओ गौरी । मीच वसे लिंगाभितरी । मम मुखेचि निर्धारी । असती सर्व लिंगा ॥३६॥ इष्टलिं-गासी मुखे पांच जाण । प्राण अपान व्यान उदान समान । हे पाची प्राण पांच मुखे नेमुन । इष्टलिंगासी ॥३७॥

इष्टलिंगासी प्राण । मिश्रित झाला आपण । म्हणोनि प्राणलिंग ऐसे उच्चारण । प्राणलिंग बोलिजे ॥३८॥ इष्टलिंगासी प्राण समरसला । म्हणोनि प्राणलिंग नांव पावला । त्याची पंच मुखे लाधला । समरसला या लागी ॥३९॥ इष्टलिंगासी भाव मिश्रित झाला । म्हणोनि भावलिंग नाम पावला । तोचि पांच मुखे लाधला । समरसला या लागी ॥४०॥ पांची प्राण मुखे करुन । जे जे होय अर्पण । ते ते इष्टलिंगासी जाण । त्याची मुखे म्हणोनिया ॥४१॥ प्राणलिंग भाव लिंग निगुती । इष्टलिंगी मिश्रित असती । म्हणोनि तेहि लाधति तृप्ती । जी होय इष्टलिंगासी ॥४२॥ ऐसा इष्ट प्राण भाव लिंग । हे तिन्ही मिळोन एक अंग । करोनि पुजी तो पावे पद अभंग । जंगम अथवा भक्त ॥४३॥ त्रिविध ऐक्य मानोनि करी पुजा । तेणे संतोष वृषभध्वजा । होतसे अनायासे कैलास राजा । लिंग पुजा श्रेष्ठ ही ॥४४॥

दे. उ. इष्टप्राणादि लिगानां पुजनस्य च को विधिः ॥
भावलिंगस्य का पूजा सर्व कथय विस्तृतं ॥ ८ ॥

गिरीजा पुसे ईश्वरासी । इष्टलिंगाची पुजा कैसी । प्राणलिंग भावलिंगासी । पूजिजे कैसे ॥४५॥

शि. उ. अष्टविधार्चनं कुर्यात् इष्टलिंगस्य पूजनं ॥
प्राणलिंगानुसंधानं प्राणलिंगस्य पूजनं ॥ ९ ॥

ऐक इष्टलिंगाचे पूजन । गंध धूप दीप अष्ट विधार्चन । नैवद्य फल तांबुलादि समर्पण । इष्टलिंगासी कीजें ॥४६॥ बरवा त्रिकाळ साधून । एकांत स्थानी करी पूजन । गुरु रुप लिंगासी भाऊन । पुजिजे ओ देवि ॥४७॥ ऐक आणिक हि पूजन । घंटा चामर दर्पण । काडवाती कर्पुर दहन । अनेके विधार्चनी पुजिजे ॥४८॥ ऐक प्राण लिंगाचे पूजन । ध्यान धरिजे मानस दृढाऊन । ध्यानी लिंग आणिजे गुरु भावने कुन । प्राण लिंग पूजन या नांव ॥४९॥ ध्यान षोडशोपचारे ओजे । मानस पूजा बरवी कीजें । येणे परि संतोषविजे । प्राणलिंगा लागोनि ॥५०॥

मनोलयपरे तत्वे भावलिंगस्य पूजनं ।
एतल्लिंगार्चनज्ञानं विशेषं श्रुणु पार्वती ॥ १० ॥

मन तल्लिन ठेवोनि लिंगा सारिसे । लिंगा माजी समरसोनि असे । मना मनपणाचा आठवू नसे । त्या नांव भाव लिंग पूजा ॥५१॥ मनाचे रुप तें संकल्प विकल्प जाण । ते संकल्प विकल्प गेलिया निमोन । मग मनासी कैचे मन पण । त्या नांव मनोलय पूजा ॥५२॥ ऐसे मनोलय पूजन । तेचि भाव लिंगाचे अर्चन । घडे जया तयाचे विशेष ज्ञान । ऐक ओ पार्वती ॥५३॥ या तिन्ही पुजा लिंगासीच घडती । त्रिविध भावे एकचि लिंग मूर्ति । ते गुरुत्वे ऐक्य स्थिती । पूजिजे एकत्वे ॥५४॥ ऐसे त्रिविध मिळोनि एक लिंग ।

ते श्री गुरुचेचि निजांग । म्हणोनि लिंगासी जी पुजा कीजे चांग । ती गुरुसी अर्पण होय ॥५५॥ म्हणोनि लिंग ते परमेश्वर पूर्ण । का म्हणसी तरी गुरु लिंगासी नाही भिन्नपण । जे परब्रह्म तेचि गुरु चैतन्यघन । या लागी लिंग ते परब्रह्म ॥५६॥ ऐसी जो नित्य करी भावलिंग पुजा । तेणे वश केला कैलास राजा । स्वधर्माचा पाया मूळ बीजा । अधिकारी होय तो ॥५७॥ भावलिंग हेचि भक्ति अंग । विश्वभरी असे त्याचा वेंग । प्राणी मात्री हे तत्व वसे चांग । म्हणोनि धर्मवृत्ति असे ॥५८॥ जयाची भाव भक्ति निमाली । तुच्छत्वे बुद्धि फांकली । त्याच्रिया धर्मा भ्रष्टता आली । हे सांगणे कासया ॥५९॥ जो धर्मघ्न होय तर्कटी पूर्ण । धर्मज्ञे त्याचे न पाहवे वदन । पंक्ति समागमे न करी भोजन । दुष्टा शासन हेचि पै ॥६०॥

दे. उ. इष्टलिंगार्पितं किंवा प्राण लिंगार्पितं तथा ॥
भावलिंगार्पितं तद्वत् ब्रुहि मे परमेश्वर ॥ ११ ॥

पार्वती म्हणे लिंग मूर्ति । लिंगत्रयाची अर्पण स्थिति । मज निरोपावी पशूपति । जग उद्धाराकारणे ॥६१॥ इष्टलिंगासी कोणा अर्पणें तृप्ति असे । प्राणलिंगी तृप्ति कैसे वसे । भावलिंगी तृप्ति जगदिशे । निरोपावी कैसी ती ॥६२॥

शि. उ. इष्टलिंगार्पितं अंग प्राणलिंगार्पितं मनः ।।
भावलिंगार्पिता तृप्तिरित्यवेहि वरानने ।। १२ ।।

शिव म्हणे गिरीजे ऐक खूण । इष्टलिंगा शरीर कीजे अर्पण । प्राण लिंगा अर्पिजे मन । भावलिंगासी तृप्ती पैं ॥६३॥ देह बुद्धिचा सर्वस्व त्याग कीजे । त्या नांव इष्ट-लिंगार्चन सहजे । मनाचे चंचळत्व अर्पिजे । प्राणलिंगा र्चन त्या नांव ॥६४॥ जे जे घडे तयास तृप्ति । ते ते भाव-लिंगा अर्पण स्थिति । या परी त्रिलिंगी अर्पण गति । निरोपिली तुज ॥६५॥ आणिक सांगतो तुज एक । लक्ष देओनि ऐक सम्यक । इष्ट देह असे नैष्टिक । जीवा लागी निश्चये ॥६६॥ देह हा इष्टलिंगार्पित असे । इष्ट देहि इष्टलिंग वसे । आन देही तो न वसे । अ लिंगी जाण बोलती तया ॥६७॥ इष्टलिंग वीरशैवास । तये त्यासी अर्पिले शरिरास । प्राण लिंगार्पित मानस । तृप्ति जाण भाव लिंगा ॥६८॥ लिंगधारी महा योगी । जे वी नटले भावलिंगी । तयाची इच्छा अहंता जगी । न प्रवर्ते कालत्रयी ॥६९॥ हे भेद चरलिंगाचे । दुजे स्थावर बोलती वाचे । भेदाभेद काढता तयाचे । वाटे विस्मय मानसी ॥७०॥ ज्या ज्या काळी धर्म हानी । शिवभक्ति ते उच्छे-दुनि । वीरशैव मार्गा लागोनि । बुडविती वेळोवेळा ॥७१॥ त्याची करावया स्थापना । आचार्य गुरुरुपी जाणा । करिती ज्या भूलिंगातुनि गर्जना । ती चरलिंगे

मानावी ||७२|| जेथून आचार्य प्रगटले | ते स्थान स्वायं-भूवागमी वर्णिले | ते पाहिजे पाहिले | प्रत्यया लागुनि ||७३|| हे आचार्य पांच असती | त्याचया अवतारी विशेष शक्ति | ब्रह्मादि देव अनुसरती | पावन मार्ग तयाचा ||७४|| ते ज्या स्थानी गुप्त होती | ती स्थले पवित्र असती | तीर्थे तयासीच म्हणती | शिव स्थाना लागुनी ||७५|| त्या लिंगासी चरलिंग | मानावे सत्य शास्त्रांग | वीरशैव आचार भंग | येणे नोव्हे कल्पांती ||७६|| वीर-शैव धर्माचे मुख्य तत्व | शिवा वाचून अन्य दैवत | न मानणे श्रेष्ठ अद्भूत | एक शिव सर्व कर्ता ||७७|| ज्या लिंगासी ईश्वर नाम | ती चरलिंगें जाणावी उत्तम | वंद्य असे श्रीशैल्य धाम | वीरशैवा जाणावे ||७८|| अरण्य स्थानी उदास | पूर्वोस्थापित लिंग विशेष | अर्चिती जया तापस | तीहि चरलिंगेचि ||७९|| चरलिंगे स्थिर होती | तया स्थावर बोलती | कालांतरे प्रगटती | धर्म हानी झालिया ||८०|| तया स्थावरासी वंदावे | भक्ति भावे अर्चवावे | प्रसिद्ध पणे पुढे व्हावे | लिंग महात्म्य वाढवा-वया ||८१||

दे. उ. षट्स्थलं च कथंजातं षट्स्थलस्य च के गुणाः ।।
षट्स्थलानां नु भेदं हि कथयस्व ममानघ ।। १३ ।।

पार्वती म्हणे स्वामी त्रिनयना | षट्स्थळ कैसे झाले सांगा

खुणा | कोण गुण कैसा भेद प्राणा | निरोपावे स्वामी ||८२||

शि. उ. श्रुणुदेवि प्रवक्ष्यामि गोप्याद्गोप्यतरं पदं ।।
यत्श्रुत्वा शुद्धचित्तेन न पुनर्जननं भूवि ।। १४ ।।

शिव म्हणे ऐक गुढ गुह्याकार | षट्स्थळ ते अत्यंत गौप्य परात्पर | तें तुज निरोपिन साचार | परि सुचित होओनि ऐक देवि ||८३|| हे निरोपु नये भक्तिहीनासी | जो कधी नेणे गुरुलिंग जंगमासी | भक्ति मार्गाचे प्रेम दिसें तुजपासी | म्हणोनि निरोपु तुज ||८४||

महालिंगमिदं देवि मनोतितमगोचरं ।
निर्नाम निर्गुणं नित्यं निरंजननिरामय ।। १५ ।।

षट्स्थळाचे साही अंग साचे | तया माजी श्रेष्ट जें सहावे मुळीचे | अधि ऐक महिमान तयाचे | अगम्य अगोचर ||८५|| पूर्वी जी जी लिंगें कथीली | सहा संख्येने दाखविली | एक एका पासून झाली | लिंगे जाण षड्विध ||८६|| सर्व लिंगासी आधार | महालिंग होय साचार | तया पासोनि ॐकार | प्राप्त होय योगिया ||८७|| ते मनोतीत अगोचर मन बुद्धि चित् न पावती पार | नाना मत विवेक विचार | निमाले जेथे ||८८|| ते निर्नाम नाम रुपातीत | निर्गुण सर्वगुण विरहित | ते नित्यानित्यासी नातळत | नाम तरि महालिंग जाण ||८९|| श्रोते म्हणती अनाम निरोपिले | पुनः महालिंग नाम का स्थापिले | ते भासावया खूण नाम

लाविले | ये-हवी साचचि अनामते ||९०|| ते निरंजन निरामय महालिंग | तेच्चि जाहले साही लिंगासी अंग | आपणच्चि षट्स्थळ अभंग | होऊनि ठेले ||९१||

निर्मलं निष्कलं ज्ञेयं निर्भेदं निरुपाधिकं ॥
अद्वैतानन्दसंपूर्णमसादृश्यमिदं श्रृणु ॥ १६ ॥

ते निर्मळ त्रिमळातीत | ते निष्कळ कला विरहित | भेदा भेदासी नातळत | उपाधि रहित ते ||९२|| अद्वैतानंद संपूर्ण निराश | समदृष्टी जया समसरिस | तो महालिंग वो विश्वास | धरुनि ऐक पा ||९३||

महालिंगात् समाख्यातं प्रमादस्य समुद्भव ॥
शिवलिंगात्तथाचैव जंगमस्य समुद्भवः ॥ १७ ॥

ऐसें महालिंग निरोपिले | तेच्चि प्रसादलिंग होओनि ठेले | प्रसाद लिंगा पासाव झाले | जंगम लिंग ते ||९४|| जंगम लिंगा पासून | कोणलिंग झाले तेहि निरोपिन | तू भक्त-राज म्हणोन तुज | गुह्य चोरु नये ||९५||

तथा जंगमलिंगेच शिवलिंगसमुद्भवः ॥
शिवलिंगात्तथा देवि गुरुलिंग समुद्भवः ॥ १८ ॥

जंगम लिंगा पासोन वहिले | शिवलिंग उद्भवले | शिवलिंगा पासून जाहले | श्री गुरुलिंग ते ||९६||

गुरुलिंगात्तथाचारलिंगस्यापि समुद्भवः ॥
षट्स्थलं तत्परिज्ञेयमेकीभावे विशेषतः ॥ १९ ॥

गुरुलिंगा पासाव उद्भवले । ते आचार लिंग होओनि ठेले । येणे परि षट्स्थळ झाले । एकचि महालिंग ते ॥९७॥ ही साही लिंगे एक भावने । गुरुमुखी जाणोनि पुजणे । विधीयुक्त सद्भावने । निज निष्ठे ॥९८॥

प्राणो आचारलिंगस्य गुरुलिंगं भवत्यपि ॥
प्राणस्तु गुरुलिंगस्य शिवलिंगं भवेत्तथा ॥ २० ॥

साही लिंग येरयेरा प्रति । प्राण होओनि असती । आचार लिंगासी प्राण पार्वती । गुरुलिंग जाणिजे ॥९९॥ गुरु लिंगासी प्राण । शिवलिंग नेमस्त जाण । हे तुज निरोपितो गुह्य ज्ञान । तू भक्तित रत म्हणोनिया ॥१००॥

प्राणश्च शिवलिंगस्य जंगमंलिंगमेव च ॥
तत्तुजंगमलिंगस्य प्रसादं लिंगमेव हि ॥ २१ ॥

शिवलिंगासी प्राण जाणिजे । जंगम लिंग ते बोलिजे । म्हणोनि मी न विसंबे सहजे । जंगम लिंगासी ॥१०१॥ जंगम लिंगासी मंत्र प्राण । तया जाणावे आवरण । जीवित्वाची मुख्य खुण । प्रसाद लिंग होय ॥१०२॥

तत्प्रसादगतप्राणमहालिंगमिदं श्रृणु ॥
अस्य प्राणसमाख्यातोक भावसमन्वितं ॥ २२ ॥

प्रसाद लिंगासी प्राण | महालिंग स्वये जाण | या साही लिंगासी नाही भिन्नपण | अभिन्न ऐक्यत्वे असती ||१०३|| महालिंगा पासून उद्भवले | महालिंगी विलय पावले | ऐसें हे सहा प्रकार वहिले | एका लिंगा पासोनिया ||१०४|| महालिंगाचे बीज अक्षर | ॐकार रुपी निर्विकार | स्वयंस्फुर्तिचा होता चमत्कार | प्रगटतसे सर्वत्री ||१०५|| ऐसा हा षड्गुणऐश्वर्य संपन्न | एकचि शिव परम पावन | तया वाचून महाप्रलयातून | कोणी न राहती ब्रह्मा-दिक ||१०६||

> प्रभावन्हेर्यथाऽभिन्ना तथैवात्राऽपि भाव्यते ॥
> महालिंगस्थलं देवि षड्विधं व्याकृतं तथा ॥ २३ ॥

अग्निस आणि अग्निकांतीस | भिन्न भेद नाही दोहीस | तेविं पांचा आणि महालिंगास | भेद नाही ऐक्यभावें ||१०७|| एकले महालिंगचि जाण | षट्स्थळ झाले आपण | म्हणोनि नाही भावना भिन्न | तया महालिंगासी ||१०८|| जरी षट्स्थल होओनि ठेला | तरी भिन्न भेदासी नाही आला | जरि वृक्ष शाखा उपशाखा झाला | तरी भेदा-वला नाही तो ||१०९|| जैसा उस कांडोकांडी चढला | तरी तो उसपणा नाही मुकला | कांडी भिन्न दिसती परि त्याला | उसचि बोलिजे आघवा ||११०|| तैसा एकचि महालिंग | झाला षट्स्थळाचे अंग | परि तया नाही भिन्न

भाग | वेगळे पणाचा ||१११|| म्हणोनि षट्स्थळासी | आणि महालिंगासी | भेद नाही येरयेरासी | एकचि म्हणोनि ||११२||

एवं लिंगं समाख्यातं षड्भेदात्तु यथाक्रमं ।।
ज्ञात्वा लिंगार्चनं कूर्यात् प्राणाभेदेन मुक्तये ।। २४ ।।

ऐसे एक भावे लिंगार्चन | करी सांडून भेदाचे भान | तैसे षड्लिंगी भजन | एकत्वे किजे ||११३|| प्राणासी लिंगासी भेद नाही | हे जाणोनि पूजा करी जो पाही | तो निज भक्त त्याचे पायी | तरें शिवाचार ||११४|| ऐसी अभेद क्रिया चुको न दिजे | तरि सहजे महालिंग होईजें| महालिंग झालिया तैसेंचि असिजे | तेणे स्थिती ||११५|| तेणेंत्रि स्थिति असता | तरि स्वयेंचि होईजे वस्तुता | निर्विकल्प झाल्याविण तत्वता | नये हाता ती वस्तु ||११६|| शिवपुजा करावया कारणे | भक्ति भावा प्रति पाळणे | इष्ट वस्तु विरोढुन संतुष्ट होणे | इष्टलिंगे करोनिया ||११७||

दे उ. इष्टलिंगस्य का भाषा को वा वर्णस्तथार्चनं ।।
धारणं केन कर्तव्यमधिकारोत्र कस्य वै ।। २५ ।।

पार्वती म्हणे जी महेशा | मज सांगा इष्ट भाषा | जेणे तुटे सर्वेशा | पुनर्जन्म बंधन ||११८|| इष्टलिंगाचा वर्ण कोण | कवण्या काळी अर्चावे जाण | कवणाचे व्हावे निरु-

पण | प्राण वल्लभा मज लागी ||११९|| आणिक जया वर्णा प्रति | इष्ट लिंगाची असे प्राप्ती | तयाची वर्णाची स्थिति | अधिकार परत्वे मज ||१२०||

शि. उ. स्थूल देहेषु यल्लिगं तदिष्टं नीलवर्णकं ॥
धार्यंते भाविकैः सर्वैः भक्तियोगैकतत्परैः ॥ २६ ॥

स्थूल देही जे लिंग असे | तया म्हणती इष्टलिंग विश्वासे | शास्त्री निरोपिली सौरसे | मूल लिंग म्हणोनिया ||१२१|| हे इष्टलिंग नीलवर्ण | पूजे लागी होय जाण | त्या प्रति करावे जतन | प्राणाहुनि अधिक पै ||१२२|| जया भक्ति भाव असे अधिक | तेणे धारण करावे इष्ट लिंग देख | तेहि गुरु आज्ञा पूर्वक | शिवदिक्षा विधीने ||१२३|| नारी नरा सकळीका | येथे अधिकार असे देखा | तेथे वर्णाश्र-माचा उपखा | काढू नये पै ||१२४||

उत्तमांगे गले वाऽपि कुक्षौ वक्षस्थळेऽपिवा ॥
तथा हस्तस्थले वाऽपि प्राणलिंगं धरेत् सुधिः ॥ २७ ॥

लिंग धारणेचि स्थाने | तुज सांगु वरानने | मस्तकी कंठी असणे | अथवा हृदयावरी ||१२५|| हृदयावरी अथवा करस्थळी | धारण करी वीर मंडळी | तेणे संतोषे मी चंद्रमौळी | देवी भक्ता कारणे ||१२६|| नाभीचे खाली लिंग येता | दोष घडे लिंग धारका तत्वता | देहा पासोनि वेगळे करिता | प्रायश्चित घेणे लागे पै ||१२७||

त्रिकाळ करावे अर्चन । भावे बिल्वदळे वाहून । प्राण लिंगचि जाणून । इष्टलिंगां भजावे ॥१२८॥

निर्विकल्पमिदं ज्ञेयं प्राणे लिंगं तु लियते ॥
लिंगमेव परंब्रम्ह तस्य नाम चराचरं ॥ २८ ॥

निर्विकल्प होओनि लिंगार्चन । कीजे लिंगी तल्लीन होऊन । प्राण तो लिंगी लयात नेवोन । तेचि होऊन राहिजे ॥१२९॥ कां तरी लिंग ते परब्रह्म । केवळ उत्तमाचे उत्तम। लिंग कैसे परब्रह्म घडे हे वर्म । ऐक निरोपु ओ देवि ॥१३०॥ सद्गुरुने लिंग दिधले जेंव्हा हाती । तेंव्हा काय निरोपिले शिष्या प्रति । हे लिंग जाणिजे माझिच मूर्ति। सद्भावें पूजिजे यासी ॥१३१॥ जे जे लिंगासी करी अर्पण। तें ते मजचि होय समर्पण । म्हणोनि सद्भावे करी पूजन । हे निरोपण श्री गुरुचे ॥१३२॥ तव गुरु आणि जंगम लिंगासी । भेद कैचा उभयासी । लिंग तोचि गुरु ऐसे अनुभवासी । आले की ओ देवि ॥१३३॥ आता गुरु तोचि परब्रह्म । हे तु जाणसी सहज वर्म । मागे निरोपिले गुरु उत्तम । परब्रह्मची तो ॥१३४॥ गुरु जव परब्रह्म होय । तव लिंगासी ब्रम्हत्व केवि नये । म्हणोनि लिंग परब्रम्हचि पाहे । येणे न्याये ओ देवि ॥१३५॥ या लागी लिंगासी गुरु भावे पुजिजे । लिंगी प्राण लयासी नेईजे । या परि लिंगी लिंग होओनि असिजे।

सदाकाळ तद्रुप ||१३६|| एवं लिंग ते परब्रह्म | भाविजे जाणोनि हे वर्म | तैसेचि षड्‌लिंगें उत्तम | पुजिजे तेणेचि भावे ||१३७||

दे. उ. महालिंगस्य के भेदाः प्रसादस्य तथा पुनः ।।
भेदाः जंगमलिंगस्य शिवलिंगस्य ते तथा ।। २९ ।।
गुरु लिंगस्य के भेदाः आचारास्य च के पुनः ।।
इति तत्वं न जानामि कारुण्याद् ब्रुहि शंकर ।। ३० ।।

देवि म्हणेजी शंकरा | प्राण वल्लभा करुणा करा | षड्‌लिंगाचा भेद दातारा | गौरी हरा निरोपावा ||१३८|| महालिंग प्रसादलिंग | जंगम आणि शिव लिंग | गुरुलिंग आणि आचार लिंग | सहा लिंगे हेचि की ||१३९|| हे कोण कोणा पासाव झाले | कोण मुखी कोण लिंग | उत्पन्नले | ते पाहिजे निरोपिलें | सर्वेश्वरा मज लागी ||१४०||

शि. उ. महालिंगमिदं देवि प्रसादं लिंगमेवच ।
तस्माज्जंगमलिंगं च शिवलिंगमभूततः ।। ३१ ।।
ततोहि गुरुलिंगं च आचारं च ततः पुनः ।।
ऐकेकप्राणमाख्यातमेकेकेन समन्वितं ।। ३२ ।।

शंकर म्हणे देवी ऐक | महालिंगा पासून प्रसाद लिंग देख | प्रसाद लिंगा पासाव नेमक | जंगम लिंग ते ||१४१|| जंगम लिंगा पासोन | शिवलिंग झाले उत्पन्न | शिवलिंगा

पासून गुरुलिंग ते ॥१४२॥ गुरुलिंगा पासाव आचार लिंग जाण। हे उत्पन्नले एकमेकाचे प्राण होऊन। म्हणोनि ते अभिन्न होऊन। असती भेद विरहित ॥१४३॥ महालिंगा पासाव पांच लिंगें झाली। ते पांच मुखी पांच जन्मली। ती पांच मुखे महालिंगाची भली। निरोपु तुज ऐक ॥१४४॥ ईशान तत्पुरुष अघोर तीन। वामदेव सद्योजात हे पांच जाण। या पांच मुखातून उत्पन्न। लिंगें झाली ऐक पा ॥१४५॥

एकैक मनुते यस्तु पंचानन समुद्भवः ॥
प्रसादोद्भवईशानात् तत्पुरुषाज्जंगमोद्भवः ॥ ३३ ॥
शिवलिंगमघोराच्च वामदेवात्तथा गुरुः ॥
आचारस्योद्भवं चापि सद्योजातान्मिन्दं श्रुणु ॥ ३४ ॥

एकेका मुखातुन। एकेक लिंग झाले उत्पन्न। कोण्या मुखातून कोण। तें ऐक ओ देवि ॥१४६॥ प्रसादलिंग ईशान मुखातून। तत्पुरुषी जंगम लिंग उत्पन्न। शिवलिंग अघोर मुखापासोन। जाहले जाण पा ॥१४७॥ गुरुलिंग वामदेव मुखातून। आचार लिंग सद्योजाता पासून। ऐसी पांच मुखातून। प्रकाशली ती ॥१४८॥ महालिंग आणि पांच लिंगे। ही रुपा आली जयाचिये संयोगे। ती आणिक असति तीन लिंगे। तीहि ऐक निरोपु तुज ॥१४९॥

भावादि त्रिषुलिंगेषु जगत् सृष्टयादि कारणं ॥
एकैकाच्च द्वयं जातम् नवलिंगस्य उद्भवः ॥ ३५ ॥

सृष्टी तारावया चांग | विस्तारली षड्लिंगे अभंग | एकेका पासाव स्वयं भाग | द्वयद्वयते ||१५०|| साही लिंग ते तीन लिंगा पासोन | सहा आणि तीन नवलिंग जाण | एकेका पासोन दोन दोन | ते ऐक निरोपु तुज ||१५१||

आचारं गुरुलिंगंच इष्टलिंगाद्धि जायते ॥
शिवं जंगमलिंगं च प्राणलिंगसमुद्भवं ॥ ३६ ॥
प्रसादंच महालिंगं भावलिंगाद्धि निर्गतं ॥
एतानि शिवलिंगानि क्रमशो वर्णितानि ते ॥ ३७ ॥

आचार लिंग गुरुलिंग जाण | हे झाले इष्टलिंगा पासोन | शिवलिंग जंगमलिंग उत्पन्न | प्राणलिंगा पासाव ||१५२|| प्रसाद लिंग महालिंग ऐक | भावलिंगा पासाव देख | तिन्ही आणि सहा नेमिक | खूण निरोपिली तुज ||१५३|| या नव लिंगाची खूण | विरळा जाणे कोणी सत्य शरण | जयाचे चरणी तीर्थे पावन | त्याते वंदू आपण आम्ही ||१५४|| ही नवलिंगे स्वयं पूर्ण | असती इष्टलिंग रुप होऊन | ही धर्म शास्त्राची खूण | गुरुकृपे ओळखावी ||१५५|| इष्ट प्राण भाव हि नावे | अर्चलिंगा असती आघवे | जाणोनिया पूर्ण भावे | वर्तावे वीरशैवे ||१५६|| सर्व पुजेचे सार प्रसिद्ध | एक लिंग पूजा फल अगाध | शिवागमी वर्णिले विशद | विष्णू आदि देवा ते ||१५७|| लिंग पुजेने तापसी | नाम पावले ब्रम्हऋषी | ब्रम्ह विचार

तये मानसी । येत शिवकृपेने ॥१५८॥ ऐसी जी लिंग पूजा श्रेष्ठ । सकल ब्रम्हांडी ही बलिष्ट । तेथे नसे कदा अनिष्ट । ग्रह दशा जाण पा ॥१५९॥ शिवसांगे भवानी प्रति । माझे धारण जे करिती । तया नसे अधोगती । पवित्र कैलास प्राप्त होय ॥१६०॥ तो ही नवलिंगे ऐकत्वे असती । येर येरा मिश्रित वसती । तेंचि पुसे कर जोडोनि पार्वती । मिश्रित कैसें म्हणोनि ॥१६१॥ इतिश्री परमरहस्य सारामृत । उमा महेश्वर संवादी वर्तत । त्याची टीका करोनि प्राकृत । कृत्य कृतार्थ मन्मथ ॥१६२॥

इति श्रीपरमरहस्ये हरगौरी संवादे षटस्थल नवलिंग स्वरुप वर्णनं नाम एकादशोध्यायः समाप्तः श्लोक ३७ ओव्या १६२

## अध्याय १२ वा

ॐकाराय नमः ॥ एकादश अध्यायी लिंग विचार । सांगितला नव लिंग प्रकार । तैसाच मिश्रभाव सविस्तर । वर्णिला येथे ॥१॥

दे. उ. किंमिश्रितं सदाचारं किमिश्रं गुरुलिंगकम ॥
किमिश्रं [illegible]स्यात् किमिश्र जंगम तथा ॥ १ ॥

प्रसादमिश्रितं किं स्यात् महालिंगं तथैव च ॥
इत्यर्तान्मिश्रितं भावं सकलं कथयस्व मे ॥ २ ॥

पार्वती म्हणे शंकरासी । कवण लिंग कवणासी । मिश्रित होओनि असे तत्वासी । सांगा मज स्वामिया ॥२॥ आचार लिंग कोणाशी मिश्रित । कोणा मिश्रित गुरुलिंग असत । मिश्रित कोणासी शिवलिंग वसत । जंगम लिंग मिश्रित कैसे ॥३॥ प्रसाद लिंग मिश्रित कोणासी । मिश्रित निरोपा महालिंगासी । ऐसे साही लिंगे कोण कोणासी । मिश्रित निरोपा स्वामी ॥४॥

शि. उ. आचारं गुरुलिंगं च प्रसादं जंगमं तथा ॥
शिवलिंगं महालिंगमेकैकेन सुमिश्रितम् ॥ ३ ॥

शिव म्हणे अंबे प्रति । मिश्र लिंगाची कैसी व्याप्ती । उभय लिंगे एक्ये समावती । तो मिश्रभाव जाणावा ॥५॥ गुरुलिंग आचार लिंग मिश्रित असती । शिवलिंग जंगम लिंग मिश्रित वसती । प्रसाद लिंग महालिंग स्थिती । येरयेरातें असती ते एकत्वे ॥६॥ ऐसे सहा लिंग मिश्रित । हे ऐकोनि संतोषले चित्त । मग प्रश्न करी असत । काही ॥७॥

दे. उ. ज्ञानबीजाक्षरं किं वा आचारस्य च बीजकम् ॥
गुरुलिंगस्य किं बीजं किं बीजं शिवलिंगकम् ॥ ४ ॥

पार्वती पुसें शिवातें । महालिंगासी बीजाक्षर कोणतें । आचार लिंगासी निरुतें । कोणतें बीजाक्षर ॥८॥ कोणतें बीजाक्षर गुरु लिंगासी । कोणतें अक्षर शिवलिंगासी । कोणतें अक्षर जंगम लिंगासी । प्रसाद लिंगासी अक्षर कोण ॥९॥

शि. उ. प्रणवं ज्ञानबीजं च आचारस्य नकारकं ॥
मकारं तु गुरोर्बीजं शिकारं लिंगमूर्तिकं ॥ ६ ॥
वाकारं जांगमं बीजं प्रसादस्य यकारकं ॥
एवं बीजाक्षरज्ञाता दुर्लभश्च वरानने ॥ ७ ॥

पार्वतीसी निरोपी शंकर । महालिंगासी बीज ॐकार । आचार लिंगासी बीज नकार । गुरुलिंगासी बीजाक्षर । मकार बोलिजे ॥१०॥ शिवलिंगासी बीज शिकार । जंगम लिंगासी वाकार । प्रसादलिंगासी य कार । बीजाक्षर बोलिजे ॥११॥ नमः शिवाय हा पंचाक्षरी । ॐकार संयोगे बोलिजे षडाक्षरी । तें षडाक्षर षड्लिंगासी अवधारी । साही बीजे निरोपिली ॥१२॥ तीच साही बीजे तत्वादीकासी । कोण बीज कोणासी । ते ऐक एकचित्त मानसी । होओनिया ॥१३॥

ॐकारं पंचभूतात्मा नकारं दशइंद्रियः ॥
मकारं मनपंचानां शिकारं प्राणनायकं ॥ ८ ॥
वकारं दशवायूनां यकारं त्रिगूणं भवेत् ॥
एवं पडाक्षरं बीजं शृणु मे पार्वती यथा ॥ ९ ॥

ओंकार बीज पंच भुतात्मकासी । न कार तो दशइंद्रि-यासी । म कार अंतः करण पंचकासी । प्राण पंचकासी शिकार तो ॥१४॥ वा कार तो दशवायुसी । य कार तो त्रिगुणासी । ऐसे बीज तत्वादिकासी । नेमिले असति ओ देवि ॥१५॥ ही साही बीजे षड्‌लिंगासी । हे षट्‌बीज षट्‌चक्रासी । हेचि साहि षट्‌स्थळासी । ते षट्‌स्थळ पार्वती पुन पुसे ॥१६॥

दे. उ. नामानि षट्‌स्थलस्यास्य गुणरुपाणि सर्वथा ॥
प्रीत्यर्थं मम देवेश कृपया वद, सांप्रतं ॥ १० ॥

पार्वती म्हणे देवा महेशा । षट्‌स्थळाचा नामरुप. ठसा । निरोपावे स्वामी जगदीशा । कृपाळुवा ॥१७॥ गुढ रहस्य हे षट्‌स्थळ । सांगा जी मज निर्मळ । वीरशैवाचे आदि मूळ । अलभ्य जे ब्रह्मादिका ॥१८॥

शि. उ. भक्तो माहेश्वरश्चैव प्रसादी प्राणलिंगकः ॥
शरण्यः शिवलिंगैक्यः इदं षट्‌स्थल मुत्तमम् ॥ ११ ॥

ईश्वर म्हणे ओ देवि ऐक । प्रथम भक्तस्थळ म्हणिजे एक । माहेश्वर दुसरे नेमक । तिसरे ते प्रसादी बोलिजे ॥१९॥ चौथे ते प्राण लिंगी जाणिजे । पाचवे ते शरण स्थळ ओळखिजे । सहावे ऐक्य स्थळ बोलिजे । महासत्य शरण ॥२०॥ याची नामे कळति तऱ्ही कांही । परि याची स्थिति कळली पाहिजे पाहि । कळलियावरी तैसाचि

वर्तता होई । तरि तो सत्य शरण ॥२१॥ हे एकताचि निज वर्म । पार्वती प्रश्न करी धरोनि प्रेम । या षट्स्थळाची स्थिति उत्तम उत्तम । ती निरोपा स्वामी ॥२२॥

दे. उ. भक्तो माहेश्वरश्चै व प्रसादी प्राणलिंगकः ॥
शरण्यः शिवलिंगैक्य पट्स्थळं च कथं भवेत् ॥ १२ ॥

पार्वती पुसे शंकरासी । नमन करुनि चरणासी । एकेका स्थळाची कैसी । आचरणुक कोणे परी ॥२३॥

शि उ. सदाचारः शिवेभक्तिः लिंगजंगम एकधीः ॥
लांछने शरणं यस्तु भक्तस्थलमनुत्तमं ॥ १३ ॥

शंकर म्हणे ओ पार्वती । षट्स्थळ ऐके प्रेम प्रिती । त्यातून प्रथम भक्ति । स्थळ निरोपु तुज ॥२४॥ सदाचारे आचरे शिवभक्ति । तो आचार निरोपु प्रेम प्रीती । अनाचार न धरी अणुमात्र हाती । कोटी लाभ जोडे जऱ्ही ॥२५॥ तरी अनाचार तो न करी । आवडी गोडी अत्यंत शिवाचारी । शिवा वाचून ब्रह्मा हरी । न मानी कोणासी ॥२६॥ जैसा पतीस भाव भक्ति चित्त । आपुले पतीचे तीला व्रत । म्हणोनि पतिव्रता निभ्रांत । नाम तियेचे ॥२७॥ ती जैसे आपुले पती विण । सर्वथा न करी कोणाचे ध्यान । वर्णिता न करी श्रवण । ती धन्य जाण पतिव्रता ॥२८॥ तैसा न स्मरे शिवविण आन । पूर्ण

एकविध भक्ति धरुन । राहे सदा निष्ठेतें ठेओन । हे भक्तिस्थळ उत्तम ॥२९॥ शिवावाचून कांही । ध्यानी मनी स्मरणी आन नाही । शिव लांछन देखे ज्याचे ठाई। धावोनि पायी मिठी घाली ॥३०॥ इतर देव असती शिवाचे सेवक । तया भजता दोष अनेक । भक्ति भावें अर्चिता नरक प्राप्त होय श्रुति वदे ॥३१॥ गुरुलिंग आणि जंगम तिहिच्या पुजेस एकचि नेम। तिही एकभावे पुजी भक्तोत्तम । तो मुकूटमणि शिवाचारासी ॥३२॥ एक मूर्ति त्रिभाग जाली भक्तकाजे । म्हणोनि गुरुलिंग जंगम बोलिजे । तिन्ही एकचि मानुनि पूजा ओजे । तोचि भक्त उत्तम ॥३३॥ जंगम लांछन देखोनि नयनी । आपुली परावी बगी न धरी मनी । धांवोनि भावें लागे चरणी । भक्तस्थळ उत्तम या नांव ॥३४॥ जंगम लिंगी भेद धरीता। अधोगति पावे तत्वता । परमात्म भावे मानिता । पूजिता मोक्षपद पावे ॥३५॥ गुरु वचनी अविश्वास । शास्त्र वाक्या लावी दोष । कुतर्की पांडित्य विशेष । अभक्तस्थळ हेचि ॥३६॥ स्वधर्म पुराणा कंटाळत । परधर्म श्रवणा धावत । तयातें धर्म श्रेष्ठ मानित । अभक्त स्थळ तेचि ॥३७॥ स्वधर्म सोडोनि आपुला । जरि उत्तम धर्म स्विकारीला। अधोगति नरक तयाला । स्वधर्म त्यागिताचि ॥३८॥ जैसे परस्त्री परधन । अनर्थासी होय कारण । तैसे परधर्म आचरण । घडे पातक सत्य पै ॥३९॥ तीर्थासी

विश्वास अत्यंत | लिंग जंगमी ठेविचित्त | ऐसे भक्तस्थळ थोडियाने बहुत | निरोपिले तुज देवि ||४०|| आता माहेश्वर स्थळ | तुज निरोपु निर्मळ | जे ऐकता पातक सकळ | जळोनिजाय ||४१||

परस्त्रियं परार्थंच वर्जितो भाव शुद्धिमान् ।।
लिंगनिष्ठो जितात्मा च माहेश्वरस्थले पुमान् ।। १४ ।।

आता माहेश्वर स्थळ महिमान | पार्वती ऐक विश्वास धरोन | तयासी परस्त्री माते समान | काम नाही तयासी ||४२|| का म्हणसी तरि ऐक | तयासी आत्मा आत्मी नाही देख | जे देखे ते शिवचि एक | तेथे आत्मा आत्मी कैंची ||४३|| त्यासी स्त्रीचि दिसत नाही | जे देखे ते शिवचि पाही | मा कामना उठे तया कायी | भोग विषयासी ||४४|| वोर निष्ठा अंगी येता देख | तो करी सारासार विवेक | मग वासनेचा पल्ला एकाएक | येईल कोठोनिया ||४५|| तया परद्रव्य पाषाणा समान | परनिंदा हिंसा न करी आपण | इत्यादि वर्जी सर्व अवगुण | भाव शुद्ध माहेश्वर तो ||४६|| लिंगनिष्ठे निपुण करी पुजा | लिंग जंगमी भाव नाही दुजा | गुरु भावने लिंगासी पुजी ओजा | जंगमी तेचि निष्ठा ||४७|| गुरुसी भजे शिवभावना | ऐशा माहेश्वरस्थळाच्या खुणा | आता प्रसादी स्थळाचि विवेचना | निरोपु ऐक जी देवि ||४८||

लिंगार्पितं प्रसादं च सुभोगी लिंगसंयुतं ॥
अनर्पितपरित्यागी प्रसादिस्थलमुत्तमम् ॥ १५ ॥

ऐक तिसरे प्रसादी स्थळ । प्रसाद सेवनी निष्ठा अढळ । नित्य प्रसाद सेवि निर्मळ । भावे विश्वासे ॥४९॥ जंगम परब्रह्मचि मानिजे । त्याचा प्रसाद लिंगमुखे सेविजे । तृण तेंहि लिंगासी दाविजे । मग स्वये सेविजे आपण ॥५०॥ प्रसादा गोडकडू बहू थोडे । जे म्हणती ते केवळ वेडे । शिवगणी मिरवी कोण्या तोंडे । नित्य गोडी नेणे प्रसादाची ॥५१॥ प्रसाद न मिळे धर्म भ्रष्टा । जो करी पर धर्मांचा साठा । कुतर्कि पाखांडमत श्रेष्ठा । प्रसाद वर्ज्य असे पै ॥५२॥ प्रसाद महिमा विशेष । होतसे ऋद्धि सिद्धि वश्य । वेद चर्चा प्राप्त श्वानास । प्रसादाने घडलीसे ॥५३॥ अनार्पित ते न अर्पिजे । कठिण अंश तो सांडून दाईजे । आप पर जंगमी न लेखिजे । भावे सेविजे प्रसाद ॥५४॥ प्रसादी विन्मुख न घडे कधी । प्रसाद लिंगार्पित करी आधी । भावे सेविता प्रकाशे सद्‌बुद्धि । अष्टमहा सिद्धी ओळगंती अंगणी ॥५५॥ हे लटिके म्हणसी तरि ऐक । श्वानमुखे वेद वदविला अष्टमहा सिद्धीचें काय कौतुक । प्रसाद निष्ठा देख । मा अष्टमहासिद्धी त्या किती ॥५६॥ प्रसाद निष्ठा जयासी पूर्ण असे । तो वंदिजे म्या महेशे । त्याचे दर्शन घे विश्वासे । तो पुण्य पुरुष भाग्याचा ॥५७॥ ऐसा प्रसाद निष्ठेचा नेम । तुज दाविला निरुपम । आता प्राणलिंग

उत्तम | चौथे स्थळ ते ऐक ||५८||

तथा प्राणगुणे लिंगं लिंगे प्राणः समाहितः ॥
सुखदुःखभयं नास्ति प्राणलिंगीस्थलं भवेत् ॥ १६ ॥

प्राणलिंगी स्थळाचे ऐक निरोपण | लिंगी ऐक्य प्राण गुणे करोन | प्राण तो लिंगी लयास नेओन | लिंग प्राण एक झाला ||५९|| लिंग तो प्राण प्राण तो लिंग | उभयाचे एक असे अंग | म्हणोनि लिंग गेलिया मग | देह केवि राहें ||६०|| भानु अस्तमानी किरण जाये | दीप गेलिया प्रकाश केवि राहें | तैसा लिंग गेलिया प्राण पाहे | राहू शके केवि देवि ||६१|| आत्मा गेलिया देह जरि राहे | तरि लिंग गेलिया प्राणलिंगी ठायें | या लागी प्राणलिंगी न राहे | लिंग गैलिया वरी ||६२|| अखंड त्याचा प्राण | लिंगी असे होओनि मग्न | या लागी प्राणलिंगी नामाभिधान | शोभे तयासी ||६३|| तो लिंग रुप होओनि असे | म्हणोनि तया सुख दुःख भय नसे | तो सुख दुःखा विरहीत वसे | निर्भय होओनिया ||६४|| सुख झालिया फुगेना | दुःख झालिया तो उतरेना | कलि कालासी तो भिईना | निष्ठेचेनि बळे ||६५|| जो स्वयेंचि रावो जाहला | तो काय भियिल सेवकाला | तैसा तो लिंगी लिंग होओनिया ठेला | तया काळ यम कैचा ||६६|| प्राणलिंगी तत्व समाधी | लिंगी प्राण अर्पि सुधी | कासया

तया मृत्यू उपाधी । अमर असे जगी तो ॥६७॥ म्हणोनि लिंगधारी दहन । करणे गोत्रहत्या जाण । स्वयं समाधिस्त म्हणोन । समाधी च करिती तया ॥६८॥ हा परम पावन । साधन करिता साध्य होय जाण । जो असे वीरशैव कुलोत्पन्न । जाणे मर्म गुरु कृपे ॥६९॥ ऐसे हे प्राणलिंगी स्थळ । तुज निरोपिले सकळ । आता शरणस्थळ निर्मळ । निरोपु पांचवे ते ॥७०॥

पतिर्लिंगं सती चाहंमिति युक्तं सदाधिया ।
पंचेंद्रियसुखं नास्ति शरणस्थलमुत्तमं ॥ १७ ॥

ऐक शरण स्थळाचे महिमान । लिंगासी स्वपति करोन । आपण सती होई शरण । प्रेम तयासी धरोनि ॥७१॥ सती पति जैसे एक असती । येरयेरासी भेद न धरिती । तैसी लिंगी अति प्रिती । युक्त होओनि असे ॥७२॥ सती पतीची शरीरें वेगळें दिसती । परि आत्मत्वे एक होओनि असती । तैसे लिंगी शरण स्थिती । होओनि असे ॥७३॥ देखोनिया सत्य शरण । तात्काळ करी दंड प्रणामे शरण । किंकर वृत्ति निरभिमान । म्हणोनि शरण स्थळ नाम हे ॥७४॥ पांची इंद्रियाचे सुख अथवा दुःख । अणुमात्र नाही देख । लिंग सुख सुखदायक । होओनि असे ॥७५॥ लिंग सुखी तो रत झाला । त्रिकाळ पुजा करु लागला । अखंड अहनिशी रमो ठेला । लिंगी लीन होओनि ॥७६॥ ज्याचे

मुखी अखंड अमृत वाटी। तो काय कांजीसी लाळ घोटी। लिंग सुख सोडोनि विषयासाठी। रंक नोव्हेचि तो ॥७७॥ वोकिल्या वोकासी। परतोनि कोण्ही न सेवी त्यासी। तैसा न घे विषयासी। ते शरणस्थळ उत्तम ॥७८॥ श्री गुरुची सेवा करावया। सदा देह ठेविला पाया। तोडिली संस्मृतिचीची माया। तया शरण म्हणावे ॥७९॥ पतिव्रता पतीचे वचनासी। न टळे सदा सावध जैसी। तेवि लिंग पुजा गुरुदर्शनासी। न टळे कालत्रयी ॥८०॥ ऐसा लिंग मोही विषय त्यागी। ते शरणस्थळ निरोपिले तुज लागी। आता ऐक्य स्थळ उत्तम मार्गी। निरोपु तुज ते सहावे ॥८१॥

षडूर्मयश्च षड्वर्गोनास्ति चाष्टविधार्चनं ॥
निर्भयं शिवलिंगैक्यं शिखि कर्पुर योगवत् ॥ १८ ॥

ऐक्य स्थळ ते सहावें। ते षडूर्मि वेगळे असे स्वभावे। षड्वर्गासी ते ना गवे। निरंजन मुर्ति ॥८२॥ सुख दुःख मानापमान। नाही आपपर निरभिमान। क्षुधा तृष्णा शीत उष्ण। लागता न डळमळी तो ॥८३॥ काम क्रोध लोभ दंभ मोहो। जया कडे न लभे पाहो। मदमत्सर सर्व विकार समूहो। अणूमात्र विटाळ तयाचा ॥८४॥ मी तुं हे नांही तया कधी। आशा मनिषा विषय कुबुद्धि। न घे आलिया अष्टमहासिद्धी। शरणागत वीर ॥८५॥ तो

स्वयेंचि वस्तु होओनि असे । या लागी जरा मरण आठवतु नसे । मा देह बुद्धि तया असे । हे केवि घडे ॥८६॥
जेथे देह बुद्धि चि नाही । तेथे अष्ट विधार्चन पूजा कांही । पुज्य पुजक पूजा आपण पाही । होओनि ठेला ॥८७॥
तो भव भया विरहीत । न करी लौकीक गोष्टी मात । न मिरवी जाणीव शाहणीव व्युत्पत । लिंगी रत होओनि असे ॥८८॥ तो लिंगी मिळोनि कैसा गेला । जैसा कर्पूर अग्निरुपचि झाला । तैसा लिंगी मिळोनि ठेला । लिंग होओनि तो ॥८९॥ भूताकृति भिन्न देखेना । त्रिभुवनी देखे आप आपणा । विश्वी ऐक्य विश्व आपणा । पाहे म्हणोनि ऐक्य स्थळ तो ॥९०॥ तो निजरुप निरालंब भरित । निर्विकल्प निरंजन मूर्त । निजानंद निर्धूत । निरामय तो ॥९१॥ तो निराश निःसंग । अनुपम्य अनुरागी अनंग । अनाम अप्रमेय निजांग । होओनि असे ॥९२॥ तो शिव तत्वी मग्न होओन । ईश्वर रुपे राहे आपण । अज्ञ जनाते उद्धरुन । निज मार्गालावितसे ॥९३॥ शिवपुजा शिवस्मरण । करिता नसें त्यासी भान । शिवतत्वाची मुख्य खूण । लीन जाण तेथेंचि ॥९४॥ तया जरा मरण नाही । तो अमर असे विदेहि । योगाभ्यासी सदाहि । पूर्णत्व पावला ॥९५॥ सर्व नाडीचे शोधन करोन । जेथीचे तेथेंचि खुंटओन । दश दिशा प्रति शोधुन । दशद्वारा आकर्षि ॥९६॥ प्राण व्याप्त शरीरा भितरी । तो काढोनि ब्रह्मरंध्री ।

प्रवेशितसे निर्धारी। कोटी चंद्र सूर्य प्रभा जिथे ॥९७॥ तेथे धीर धरुनि उघडिता नेत्र। तो तया प्रभेच्या परत्र। अतिसुक्ष्म न वर्णवे अणुमात्र। ज्योति पवित्र दिसतसे ॥९८॥ तो मार्ग परम कठिण। मना प्रवेश नोव्हे जाण। म्हणोनिया योगी उन्मन। म्हणती तया ॥९९॥ तेथे गुरुचें न चाले। कोण्या उपाया न हाले। एक निश्चल तत्व डोले। स्वस्वरुपी अखंड ॥१००॥ त्या दृष्टीचें आवरण। अति सदृढ होय म्हणोन। जरि मागे न पाहे परतोन। तरिच चढे पुढती॥१०१॥ विद्युत चपळ गति आत्म दृष्टी। चमकोनि मिळे जोति पोटी। मागुती चढोन येता त्रिकुटी। उठाउठी भेंटतसे ॥१०२॥ जीव शिवा पडिल्या गाठी। हीच असे ऐक्यता मोठी। तत्वात्रिना जेथें सृष्टी। उद्भव हाय जाण ॥१०३॥ हा जाणोनि ऐक्य योग। जो करी लिंगार्चन सांग। तो ऐक्य स्थळाचा मार्ग। पावला असे निश्चये ॥१०४॥ तोचि सद्गुरु शिवाचा-रासी। आणि तारक विश्वजनासी। जो पुजी ऐसिया विश्वासेसी। तो होय तद्रुपचि ॥१०५॥ त्याचे मुखीचा प्रसाद चरणीचे तीर्थ। विश्वासे सेंविता अधोगती चुकत। तो परब्रह्म भावना निभ्रांत। भाविजे निज भक्ति ॥१०६॥ तो जयाकडे कृपादृष्टी पाहे तयासी सुखाची दिवाळी होय। त्याचे कळिकाळ वंदिती पाय। मा इतराचें भय काय तया ॥१०७॥ तें परब्रह्मचि मुसावले।

भक्ति सुखा लागी अवतरले | वीरशैव नाम पावले | ऐक्य स्थळे ते ||१०८|| त्या स्थळी सत्यशरण | असती तेचि होओन | ते मजहि होती पुज्यमान | षट्स्थळ ते ||१०९|| हे ऐक्य स्थळ सहावे | तूज निरोपिले प्रेम भावे | ऐसे ऐकोनि आनंदली जीवे | मग प्रश्न करिती झाली पुढारी ||११०|| इति श्रीपरमरहस्य सारामृत | शिवगौरी संवादी वर्तत | त्याची टीका करीनि प्राकृत | कृत कृत्य मन्मथ ||१११||

इति श्रीपरमहस्ये हरगौरी संवादे षट्स्थल निर्णय निरोपणं नाम द्वादशोध्यायः समाप्तः श्लोक १८ ओव्या १११



## अध्याय १३ वा

श्री गुरवें नमः | मागिल अध्यायाचे अंती | सहा स्थळांची निज स्थिती | ती श्रुत केली देवि प्रति | कृपादृष्टी करोनि ||१|| आता पुढे सुरस प्रकार | देवी प्रश्न करील साचार | वीरशैव धर्माचे सार | वारंवार प्रगटवा म्हणोनि ||२||

दे. उ. मिश्रितं भक्तमाहेशं प्रसादि प्राणलिंगिनि ॥
शरण्यैक्यं च किंवा स्यात् ब्रूहि मे परमेश्वर ॥ १ ॥

पार्वती म्हणेजी शंकरा । हे षट्स्थळ कैसे मिश्रित दातारा । भक्त माहेश्वर प्रसादी येरयेरा । मिश्रित कैसे ॥३॥ प्राणलिंगी आणि शरण । ऱ्हावे ऐक्य स्थळ जाण। हे परस्पर मिश्रित त्रिनयन । निरोपिले पाहिजे ॥४॥

शि. उ. भक्तोमाहेश्वरश्चैव प्रसादो प्राणलिंगक: ॥
शरण: शिवलिंगैक्य: एक: पंचसु मिश्रितं ॥ २ ॥

शंकर म्हणे ओ पार्वती । हे येरयेरा मिश्रित असती । एक एक पांचा प्रती । मिश्रित तें ऐक ॥५॥ भक्त मिश्रित माहेश्वर स्थळासी । तैसाची शरण आणि ऐक्यासी । मिश्रित असे भक्त स्थळ ते ॥६॥ तैसेचि माहेश्वर भक्त स्थळासी । मिश्रित असे प्रसादी प्राणलिंगासी । शरण्य आणि ऐक्यासी । मिश्रित माहेश्वर ते ॥७॥ तैसेच मिश्रित प्रसादि पांचासी । भक्त माहेश्वर प्राण लिंगीयासी । शरण्य आणि ऐक्यासी । मिश्रित असे प्रसादीस्थळ ते ॥८॥ तैसेचि मिश्रित प्राणलिंगी पांचासी । भक्त माहेश्वर प्रसादी यासी । शरण्या आणि ऐक्यासी । प्राणलिंगी मिश्रित असे ॥९॥ तैसेंचि शरण्य मिश्रित पांचासी । भक्त माहेश्वर प्रसादियासी । प्राणलिंगी शरण्यासी । ऐक्य स्थळ मिश्रित असे ॥१०॥ ऐसे षट्स्थळ मिश्रित येरयेरासी । ते निरोपिले समस्त तजसी । हे ऐकोनि संतोषिली मानसी । पुन: प्रश्न करिती झाली आणिक ॥११॥

दे. उ. भक्ताद्यैक्यावसानानां स्थलानां क्रमशः प्रभु ॥
अंगानि तानि सर्वाणि कथयस्व ममानघ ॥ ३ ॥

पार्वती म्हणे कैलास नाथा । कोण्या स्थळास कोण अंग निरोपा आता । म्हणोनि चरणावरी ठेविला माथा । भक्ति भावे करोनिया ॥१३॥ अंबेचा प्रश्न रहस्य सार । प्रगट करी वारंवार । शंकरसांगे अरुवार । जग उद्धारा कारणे ॥१४॥

शि. उ. आकारौंकारवबयोः संशयोरपि वा पुनः ॥
भेदो हि नैवविद्येत छथयोर्जययोरपि ॥ ४ ॥

अंग म्हणिजे अंगचि बोलिजे । अकारा ओंकारा भेद नेणिजे । व कारा ब कारा भेद नाही जाणिजे । स कारा श कारा भेद नाही ॥१४॥ द कारा ह कारा भेद नास्ति । ज कारा य कारा नाही भेद गती । छ कारा थ कारा उभया प्रति । भेद नाही ओ देवि ॥१५॥ ऐसे अक्षराचे जाणिजे भेद । जो जाणे तो ज्ञानिया स्वतःसिद्ध । तो वाचिता कथिता ग्रंथ प्रबंध । गुंतेचिना कधी ॥१६॥ गिरिजेने षट्-स्थळाचि अंगे पुसिली । ती निरोपिती आता चंद्रमौळी । तेचि श्रोतिया प्रति सुगम बोली । निरोपु आता ॥१७॥

शि. उ. भक्तस्यांगमियं पृथ्वी जलं माहेश्वरस्यच ॥
प्रसादिनोऽग्निरंगं स्याद् वायुस्तत् प्राणलिंगिनः ॥५॥
आकाशं शरणांगं च ऐक्यस्यात्मा उदीरितः ॥
आकाशं शरणांगं च ऐक्यस्यात्मा उदीरितः ॥ ६ ॥
एतदंगस्थलज्ञानं सुसूक्ष्मं कमलानने

शंभू निरोपी गिरिजेसी। ऐक ओ षट्स्थळाचे अंगासी।
पृथ्वी अंग भक्त स्थळासी। निभ्रांत जाणपा ॥१८॥
जळांग माहेश्वरासी। तेंज ते शोभे प्रसादियासी। प्राणलिंग
तो वायु अंगेसी। असतुसे ॥१९॥ अकाश अंग शरण्यासी।
आत्मत्व अंग ऐक्यासी। ऐसी षट्स्थळाची अंगे तुजसी।
निरोपिली ओ गिरीजे ॥२०॥ इतुके ऐकोनि संतोषिली।
सद्भावे चरणा लागली। मग काय विनविती झाली।
शंकरासी देवि ती ॥२१॥

दे. उ. एतेषां षट्स्थलानां च का त्रा हस्ता भवंति हि ॥
हस्तभेदं न जानामि ब्रुहि मे परमेश्वर ॥ ७ ॥

देवि म्हणे शंकरासी। निरोपा षट्स्थळाचे हस्तासी।
कोणहस्त कोण्या स्थळासी। त्यांची नामे कायसी ॥२२॥

शि. उ. भक्तं सुचितहस्तं च सुबुद्धिश्च महेश्वरः ॥
प्रसादी निरहंकारं सुमनः प्राणलिंगिनः ॥ ८ ॥
ज्ञानहस्तं शरणस्य भावमैक्यस्य तन्मतं ॥
एते हस्ता परिज्ञेयाः षट्स्थलानां क्रमेण ते ॥ ९ ॥

शिव म्हणे गिरीजे ऐक। षट्स्थळाचे जे हस्तक। सुचित
हस्त भक्तासी देख। शोभतु असे ॥२३॥ सुबुद्धि हस्त
माहेश्वरासी। निरहंकारी हस्त प्रसादियासी। सुमन हस्त
प्राण लिंगासी। साजिरा दिसे ॥२४॥ शरण्यासी ज्ञान
हस्त। भावहस्त ऐक्यासी निभ्रांत। ऐसे साहि हस्त

शोभत । षट्स्थळासी ॥२५॥ आदि षट्स्थळाची निरोपिली अंगे आता निरोपिले हस्त तेणेचि भागे । देवि पुसे षट्स्थळाची लिंगे । कोण लिंग कोणासी ॥२६॥ अंबेचे प्रश्न असती गहन । परमात्मा स्वये करीतसे विवेचन । हा संस्कृत संवाद भावे कुन । आणीला प्राकृति ॥२७॥

दे. उ. भक्तमाहेश्वरादीनां क्रमशो लिंग पूजनं ॥
कथ्यतां मे परब्रम्हन् षट्स्थलस्य रहस्यकं ॥ १० ॥

देवि म्हणे कोण लिंग भक्तासी । महेश्वरे पुजिजे कोण लिंगासी । कोण लिंग प्रसादियासी । प्राणलिंगासी कोण लिंग ॥२८॥ कोण लिंग शरण्यासी । ऐक्य स्थळ वंदी कोण लिंगासी । हे निरोपा म्हणोनि चरणासी । पार्वती लागे ॥२९॥

शि. उ. भक्तस्यचारलिंगं स्यात् गुरुलिंगं महेशितुः ॥
प्रसादिनः शिवलिंगं जंगमं प्राणलिंगिनः ॥ ११ ॥
शरणस्य प्रसादं स्यात् महालिंगं मतं ततः ॥
ऐक्यस्याचर्यं विशेषेण स्थलभेदात् प्रकीर्तितं ॥ १२ ॥

शंकर म्हणे ओ गिरिजे । भक्तासी आचार लिंग जाणिजे । गुरुलिंग म्हणिजे । महेश्वरासी ॥३०॥ शिवलिंग प्रसादियासी । जंगमलिंग प्राणलिंगासी । प्रसादलिंग शरणासी । महालिंग ते ऐक्य स्थळासी । पूज्य असे निज हस्ते ॥३१॥

ऐसी स्थळे साही लिंगासी । पूजिती षट्हस्ते नेमेसी । ते निरोपिले तुजलागी ॥३२॥

दे. उ. आचारस्यमुखं देवि गुरुलिंगं मुखं तथा ।।
शिवलिंगमुखं चैव चरलिंगमुखं च किं ।। १३ ।।
प्रसादस्य मुखं किं वा महालिंगमुखं तथा ।।
इदं सर्वं न जानामि कथयस्व महेश्वर ।। १४ ।।

गिरिजा म्हणे शंकरासी । कोण मुख आचार लिंगासी । मुख कोण ते गुरु लिंगासी । शिवलिंगा कोण पैं ॥३३॥ चर म्हणती जंगमासी । कोण मुख असे त्या लिंगासी । आणिक त्या लिंग स्थितीसी । निरोपावे ॥३४॥ प्रसादी आणि महालिंगासी । मुखे किती निश्चयेसी । किती किती असती कवणासी । वेगळाली सांगा मज ॥३५॥

शि. उ. ज्ञानलिंगमुखं पंच आचारादिकमुच्यते ।।
षड्विधानां तु लिंगानां मुखानि क्रमशः श्रुणु ।। १५ ।।

शंकर म्हणे गिरीजेसी । पांच पांच मुखे एक एका लिंगासी । हे षड्लिंग येरयेरासी । मुखे जाणिजे ॥३६॥ महालिंग प्रसादलिंग दोन । जंगम लिंग आणि शिवलिंग चार जण । पांचवे गुरुलिंग नेमुन । ही पांच मुखे आचार लिंगासी ॥३७॥

जंगमं लिंगमाचारं ज्ञानलिंगप्रसादकं ।।
शिवलिंगसमायुक्तं इत्येतद् गुरु लक्षणं ।। १६ ।।

महालिंग प्रसादलिंग जंगमलिंग । शिवलिंग आणि आचारलिंग । ही पंचलिंगे चांग । मुखे गुरुलिंगासी ॥३८॥

महालिंगप्रसादं च जंगमाचारमेव च ॥
गुरुलिंगमुखं पंच शिवलिंगस्य निश्चितं ॥ १७ ॥

महालिंग प्रसादलिंग । जंगमलिंग गुरुलिंग आचारलिंग । हे पांच शिवलिंगासी चांग । मुखे शोभती ॥३९॥

आचारं ज्ञानलिंगं च गुरुलिंगप्रसादकं ॥
शिवलिंगमुखं पंच चरलिंगस्य तत्वतः ॥ १८ ॥

महालिंग प्रसाद लिंग जाण । शिवलिंग गुरुलिंग गहन । आचार लिंगादि पंच नेमून । मुखे चरलिंगासी ॥४०॥

जंगमं शिवलिंगंच आचारं गुरुज्ञानकं ॥
एतत् पंचसमायुक्तं प्रसादं लिंगलक्षणं ॥ १९ ॥

महालिंग आचारलिंग जाणिजे । शिवगुरु जंगमलिंग जे । ही त्याची मुखे बोलिजे । प्रसाद लिंगासी पैं ॥४१॥

जंगमं शिवाचारं गुरुलिंगं प्रसादकं ॥
एतत् पंच मुखान्याहुः महालिंगस्य मुक्तिदं ॥ २० ॥

आचारलिंग शिवलिंग गुरुलिंग जाण । जंगमलिंग प्रसाद लिंग नेमून । ही महालिंगासी प्रमाण । पांच मुखे बोलिजे ॥४२॥ हे षड्लिंग येरयेरांची मुखे । तुज निरोपिली भक्ति

प्रेम सुखे । ऐकोनि सुख जाहले निकें । पार्वती देवीसी ॥४३॥ म्हणे अजी भाग्य उदया आले । जे बहूकाळ होते लोपले । ते स्वामीने बोधिले । कृपा करोनि मज ॥४४॥ आजी माझ्या दैवा नाही पार । जे स्वमुखें निरोपितसा दातार । आता कायसा दरार । जन्म मृत्यूचा ॥४५॥ जन्ममृत्यू येथ केवढीयाचे । कर्तव्य पुसिले यम काळाचे । नाम नाहीच संसाराचे । ऐसे केले कृपाळुत्वे ॥४६॥ जे जे करितसा निरोपण । तेणे शिवाचार होय संपन्न । जे सत्य शरण शिवाचारासी पावन । त्याचे हृदयीचे गूज हे ॥४७॥ जें नर करिती शिवधर्म आचरण । तयाचे तुटे जन्म मरण । संसाराचे नुरे कारण । शिवपदा योग्य तो ॥४८॥ जन्म मृत्यूचा दरारा । अशैवा लागी निर्धारा । नेमिले असे यम किंकरा । शिक्षा द्यावया लागी ॥४९॥ शैवाचे मुखी शिवनाम । वीरशैवांगलिंग सम । त्याचे सुक्ष्म धर्म नेम । न कळे इतराप्रति ॥५०॥ ते करिती शिवागम श्रवण । तेणे शिवाचार होय संपन्न । स्त्री पुत्र सेवकादि जाण । होती निपुण शिवधर्मी ॥५१॥ ऐसा शिवाचार जाण । तो ऐकला परम पावन । जो वर्ते शिवाचारे पूर्ण । उद्धरुन जाय तो ॥५२॥ वीरशैव धर्म परम कठिण । तो न जाणावा इतरा समान । क्रिया शुद्ध परम पावन । असे जाण लिंगधारी ॥५३॥ लिंगपूजा हाचि नित्य नेम । भक्ति भावे तेचि करी सप्रेम । गुरुलिंग

आणि जंगम । त्याते भजे आवडी ॥५४॥ पंच शिवलिंगा पासोन । पंचाचार झाले निर्माण । ती लिंगांगी जाणती खूण । इतरा न कळे तत्व पै ॥५५॥ परि लिंग पुराणाचे ठाई । रुद्र सृष्टीचे मर्म पाही । उल्लेखिले असे लवलाही । निज भक्ता कारणे ॥५६॥ ऐसा शिवाचार जाण । ऐकता परम पावन । शिवाचारे वर्तता संपूर्ण । उद्धरता होय जगा ॥५७॥ मी एकली होईल पावन । त्याचे आश्चर्य स्वामी कोण । परि शिवाचार संपूर्ण । उद्धरता होय ॥५८॥ मज पुसावया हेचि कारण । जे मी उद्धरे आणि जग होय पावन । म्हणोनि आणिक प्रेमे प्रश्न । करिती झाली जगदंबा ॥५९॥

दे. उ. पंचभूतमयं देहं केन रुपेण चार्पणं ॥
कस्मिन् लिंगे भवेत् स्पष्टं कथयस्व माहेश्वर ॥ २१ ॥

गिरिजा म्हणे शंकरा प्रति । हे पंच भौतिक शरीर अर्पिती । कोण्या लिंगी कोण तत्व निवेदिती । ते निरोपा स्वामी ॥६०॥

शि. उ. आचारस्यार्पिता पृथ्वी गुरुलिंगार्पितं पयः ॥
शिवलिंगार्पितं तेजो वायुश्च समार्पितः ॥ २२ ॥
प्रसादार्पितमाकाशं प्रणवो ज्ञानार्पितः ॥
एतदर्पण सद्भावं दुर्लभं श्रुणु पार्वती ॥ २३ ॥

शंभू म्हणे देवि एक मात । आचार लिंगासी पृथ्वी अर्पित ।

गुरुलिंगा आप निभ्रांत । शिवलिंगी तेज ते ॥६१॥ वायु जंगमलिंगी अर्पण । अकाश प्रसादलिंगी निवेदन । महालिंगा अर्पिती जाण । प्रणव तो ॐकार ॥६२॥ ऐसे षड्‌लिंगा षड्‌तत्व अर्पण । याचा भेद जाणें तो ज्ञानिया पूर्ण। त्याचे आम्ही वंदू चरण । सत्य सत्य वो देवि ॥६३॥

> विषयाः पंचभोगा ये पंचेद्रियसमन्विताः ॥
> पंचाक्षरे पंचवक्त्रे सद्‌भावेन समर्पिताः ॥ २४ ॥
> शब्दस्पर्श रुपरसं गंधश्चापि हि पंचमः ॥
> एतेषामर्पणं नित्यं निष्कामो मुक्ति भाक्‌नरः ॥ २५ ॥

पंचविषयादि भोग जे जे । ते पंचाक्षरी अर्पण कीजे । पंचद्रिय द्वारे समर्पिजें । पंचलिंगा मुखी ॥६४॥ पांच इंद्रिय द्वारे पांच विषयासी । अर्पि प्रणव सहाळ्या लिंगासी । तेंचि लाविले मुक्ति पदासी । परि ते दुर्लभ ओ देवि ॥६५॥

> एवं पंचादिकं चैव पंचवक्त्रे समर्पणं ॥
> जानाति निर्मलो बुद्धः तस्य हस्ते शिवं पदं ॥ २६ ॥

एवं पंचविषयादि भोग । पंच मुखी समर्पिजे चांग । तो ज्ञानिया जाणिजे अभंग । शिवपद प्राप्त तयासी ॥६६॥ ऐकोन गिरिजे संतोष झाला । अर्पणे प्राप्त होय शिवपदाला । तरी तेन्चि पुसे शंकराला । अर्पण ते कैसे ॥६७॥

दे उ.
> कं लिंगमर्पयेत् को वा विषयः केन हेतुना ॥
> तत्सर्वं कमशो देव ब्रुहि मे कृपया शिव ॥ २७ ॥

पार्वती पुसे कैलास पति | कोण विषय कोण्या लिंगाप्रति |
अर्पिजे कवणे स्थिती | ते निरोपा परमेश्वरा ||६८||

शि. उ. शब्दं प्रसादलिंगाय चरलिंगाय स्पर्शनं ।।
शिवलिंगाय रुपं तत् गुरुलिंगाय वै रसं ।। २८ ।।
गंधमाचारलिंगाय महालिंगाय ॐततः ।।
एतन्मुखपरिज्ञानं दुर्लभं श्रुणु पार्वती ।। २९ ।।

परमेश्वर म्हणे उमेश | शब्द विषय प्रसाद लिंगास |
अर्पिजे स्पर्श जंगम लिंगास | शिवलिंगास रुप पै ||६९||
गुरुलिंगासी रस | आचारलिंगा सुगंध सुरस | प्रणव तो
महालिंगास | समर्पिजे आदरे ||७०|| ऐसे समर्पि जो
जाणोनि खूण | तो दुर्लभ वो सत्य शरण | त्याचे अखंड
आम्हा ध्यान | त्याचे चरण वंदू आम्ही ||७१|| ऐसेंचि
नेमे चालता | तरी सायुज्य येतसे हाता | दुर्लभ असे
आचरता | वीरव्रत लिंगधारीचे ||७२||

यदींद्रियमुखज्ञानं तदींद्रियमुखेन च ।।
अन्येंद्रियेण भोक्तव्यं न भवेत् कर्मभेदतः ।। ३० ।।

येथे ज्ञानिया म्हणसी का स्तविजे | तो योग्या योग्य जाणे
ओजे | जेथिचे भोक्तव्य तेथेचि देईजे | म्हणोनि धन्य तो
||७३|| आन इंद्रियाचे विषय आनासी | भोक्तव्य नव्हे
तें तयासी | ज्याचें विषय ते त्याने त्यासी | सुखें भोगिजे
||७४|| जैसे अन्य स्थानीचे भूषण | अन्यस्थानी लेता

अमान्य । स्थानीचे स्थानी शोभायमान । दिसे साजिरे ॥७५॥ पाहता तरी एकचि भोक्ता । दुसरा येथ नाही तत्वता । परि इंद्रिय द्वारें भोक्तव्यक्ता । भिन्नत्वे भोगी ॥७६॥ भिन्न भिन्न पदार्थ भोगी । परि ऐकत्वे एकाचि अंगी । विषय अनारिसे परि निजांगी । भोक्ता तो एकचि ॥७७॥ म्हणोनि जेथीचे विषय तेथेंचि भोगिजे । तेथे गुरुचि भोक्ता जाणिजे । म्हणोनि येरयेरा न लाविजे । लाविता विच्छिन्न पडे ॥७८॥ पुष्पाचा परिमळ नेत्री काय घेईजे । मुक्ताफळ चरणी काय परीक्षिजे । आणि मुखे ऐकिजे । शब्द तो कायी ॥७९॥ काय श्रोत्रे बोलिजे । कि हस्ते चालिजे । काय चरणे कीजे । भोजन क्रिया ॥८०॥ म्हणोनि येराचि क्रिया येरासी । न करवे करिता सायासी । ज्याचे त्यानेचि कीजे भोक्ता सर्वासी । श्रीगुरुनाथ एकचि तो ॥८१॥

इंद्रियादिगतं किंचित् यत्सुखं तत्तुपावनं ॥
तत्प्रसादं च भोक्तव्यं तदींद्रियमुखेन च ॥ ३१ ॥

इंद्रिय द्वारे किंचिन्मात्र सुख । होय ते गुरुचि भोक्ता देख । तो प्रसाद मानिजें विशेख । ऐसा नेम असे ॥८२॥ परि लिंग मुखे जे होय अर्पण । तोचि प्रसाद बोलिजे नेमून । लिंग मुखे विण जे होय निवेदन । तो प्रसाद नोहे ओ देवि ॥८३॥

दे. उ. मिश्रितस्य स्वरुपं मे कथयस्व महेश्वर ॥
परस्परं मिश्रभावं न जानामि सदाशिव ॥ ३२ ॥

पार्वती म्हणे ईश्वरासी । हो विषये मिश्रित तो कैसी ।
कोण विषय कोणासी । मिश्रित असती ॥८४॥

शि. उ. शब्दं पंचसमायुक्तं स्पर्शं पंचसमान्वितं ॥
रुपं पंचसमाख्यातं रसपंचसमन्वितं ॥ ३३ ॥
गंधं पंचसमायुक्तं मिश्रितं तत्वतः श्रुण् ॥
यथा द्रव्य मुखं ज्ञात्वा अर्पणं तत्तु दुर्लभं ॥ ३४ ॥

शंकर म्हणे देवीसी । एक एक मिश्रित पांचासी । ऐसे मिश्रित येरयेरासी । असती ओ देवि ॥८५॥ हे मिश्रित मुखे जाणोन । जो करी आत्मार्पण । तो ज्ञानिया दुर्लभ जाण । सत्य शरण ओ देवि ॥८६॥

दे. उ. कानींद्रियाणि केभ्यश्च लिंगेभ्यः क्रमतोऽर्पयेत् ॥
निर्णयं श्रोतुमिच्छामि सुस्पष्टं भगवन् वद ॥ ३५ ॥

पार्वती म्हणे शंकरासी । कोण इन्द्रिय कोण लिंगासी ।
अर्पित निरोपा भेदासी । कैसा निर्णयो देवा ॥८७॥

शि. उ. श्रोत्रेंद्रियसमायुक्तं प्रसादं लिंगमेव च ॥
त्वगींद्रियमुखं ज्ञेयं जंगमस्य तथैव हि ॥ ३६ ॥
नेत्रेंद्रियमुखं तस्य शिवलिंगस्य तन्महत् ॥
[illegible] नैव तथा ॥ ३७ ॥
हृदेंद्रिय मुखं चैव महालिंगस्य

हे पार्वती ऐक ओजे । श्रोत्रेंद्रिय प्रसादलिंग बोलिजे ।
त्वगींद्रिय जंगम जाणिजे । चक्षु शिवलिंग ते ॥८८॥
जिव्हेसी गुरुलिंग जाणिजे । घ्राणासी आचारलिंग ओळखिजे । मानसहृदयलिंग जाणिजे । ते महालिंग असे ॥८९॥
षड्‌लिंग षडींद्रिय मुखे । षड्‌विषय भोगिती सुखे । षट्‌स्थळासी भोक्तव्य निके । प्रसाद मुखे तेवि ॥९०॥

हृद्रेंद्रियमुखं ज्ञात्वा ऐक्यमेव प्रसादवान् ॥
श्रोत्रेंद्रियमुखं ज्ञात्वा शरणस्य प्रसादभाक् ॥ ३८ ॥
त्वगींद्रियमुखं ज्ञात्वा प्राणलिंगी प्रसादवान् ॥
नेत्रेंद्रियमुखं ज्ञात्वा प्रसादिस्यात् प्रसादभाक् ॥ ३९ ॥

या षड्‌इन्द्रिया मुखे करोन । प्रसाद भोग जाणे तो प्रसादिया पूर्ण । मानस इंद्रियाचे मुखे जाणे तो जाण । ऐक्य स्थळ बोलिजे ॥९१॥ श्रोत्र मुखे जाणोन शब्दाते घेणे । तया शरणस्थळ प्रसादी म्हणणे । त्वगींद्रिय मुखी स्पर्श सेवने।तो प्राणलिंगी प्रसादी बोलिजे ॥९२॥ चक्षुरिंद्रिय मुखे जाणोनी रुपे घेणे । तया प्रसादी स्थळ प्रसादी म्हणणे। ही खूण सत्य शरणचि जाणे। जो शिवाचारासी अग्रगणी ॥९३॥

जिव्हेंद्रियमुखं ज्ञात्वा तत् प्रसादी महेश्वरः ॥
घ्राणेंद्रियमुखं ज्ञात्वा तथा भक्तः प्रसादवान् ॥ ४० ॥

जिव्हेंद्रिय मुखे जाणोनि रस घेणे । तया माहेश्वर स्थळ

प्रसादि म्हणणे । घ्राण मुखे जाणोन गंध सेवने । तया भक्तस्थळ प्रसादि बोलिजे ॥९४॥ आता षट्स्थळ षड्-लिंगासी । कोण्या अंगे कोण्या हस्ते कोण विषयासी । कोण तृप्ती करी कोण्या लिंगासी । ही खूण पुसो म्हणे देवि ॥९५॥ ऐसा पार्वती प्रति शंकर । भक्ति ज्ञान सांगे आचार । जे ऐकता वीरशैव एकाग्र । प्राणी पावन होती पैं ॥९६॥ इति श्रीपरमरहस्य सारामृत । शिव गौरी संवादी वर्तत । त्याची टीका करोनि प्राकृत । कृत कृत्य मन्मथ ॥९७॥

इति श्रीपरमरहस्ये हर गौरी संवादे षड्लिंग निर्णय निरोपणं नाम त्रयोदशाध्यायः समाप्तः ओव्या ९७ श्लोक ३९

## अध्याय १४ वा



श्री गुरुभ्यो नमः । मागील अध्यायाचे अंती । पार्वती प्रश्न करी शंकरा प्रती । परम संतोषोनि कैलास पती । उपदेश करीतसे ॥१॥

दे. उ. स्थळानामंगहस्तानि लिंगानि च क्रमेणं वै ॥
अर्पणं तु तथा ब्रुहि प्रकारेण च केन वा ॥ १ ॥

देवि म्हणे भक्त स्थळादि करोन । कोण्या लिंगा कोण

स्थळ करी पूजन | कोण्या अंगे कोण्या हस्ते कोण मुखे करोन | कोण विषय अर्पिजे ||२|| ही अर्पण विधी मज लागोन | षड्लिंगाचे निरोपावे पूजन | म्हणोनि वंदिले चरण | कृपा कीजे स्वामिया ||३||

शि. उ. चित्तहस्तेन भूम्यंगे भक्तस्याचारलिंगके ।।
घ्राणे च तन्मुखे गंधं अर्पितं तृप्तिभाक् भवेत् ।। २ ।।

शंकर म्हणे पार्वतीसी | आधी ऐक भक्त स्थळासी | तो पुजी कोण्या लिंगासी | कोण्या पदार्थे ||४|| भूमी अंगे सुचित्त हस्ते | घ्राणमुखे गंध विषयाते | तृप्त करी आचार लिंगाते | ते भक्त स्थळ जाणिजे ||५||

माहेश्वरो जलांगे च बुद्धिहस्तेन सद्गुरुं ।।
जिव्हामुखे रसतत्वं अर्पितं तृप्ती भाक्भवेत ।। ३ ।।

जळांग सुबुद्धि हस्ते | जिव्हामुखे रस विषयातें | तृप्तकरी गुरुलिंगाते | ते माहेश्वर स्थळ जाणिजे ||६||

निरहंकार हस्तेन अनलांगं प्रसादिकः ।।
शिवलिंगमुखे नेत्रे अर्पितं रुपभोगवान् ।। ४ ।।

अनलांगे निरहंकार हस्तें | नेत्रमुखे रुप विषयातें | तृप्तकरी शिवलिंगाते | तो प्रसादी म्हणावा ||७||

मनोहस्तेन वाय्वांगे प्राणलिंगी तथैव च ।।
जंगमे त्वङ्मुखेनैव अर्पितं स्पर्श भोगवान् ।। ५ ।।

वायु अंगे सुमन हस्ते । त्वगींद्रिय मुखे स्पर्श विषयाते । तृप्तकरी जंगम लिंगाते । ते प्राणलिंगी स्थळ जाणिजे ॥८॥

ज्ञानहस्तेन शब्दो व्योमांगे तत्प्रसादकं ॥
श्रोत्रं च तन्मुखेनैव अर्पितं शब्दभोगवान् ॥ ६ ॥

व्योमांगे ज्ञान हस्ते । श्रोत्र मुखे शब्द विषयाते । अर्पित करी प्रसादलिंगाते । ते शरणस्थळ जाणिजे ॥९॥

आत्मांगे भावहस्तेन ऐक्य चापि महात्मके ॥
प्रणवं हृन्मुखेनैव पदार्थं तृप्तिभाक् भवेत् ॥ ७ ॥

आत्मांगे भाव हस्ते । मानस मुखे प्रणव विषयाते । अर्पण करी महालिंगाते । ते ऐक्य स्थळ जाणिजे ॥१०॥ ऐसे षड्लिंग षडंगे कुण । जाणोनि जो करी आत्मार्पण । तोचि सत्य शिवगण । सत्यशरण बोलिजे ॥११॥ ऐसिया कळा जाणोन । जो करी सद्भावे पूजन । तो सर्व शिवाचारासी संपन्न । सत्य शरण ओ देवी ॥१२॥ त्याचे दर्शन स्पर्शन संभाषण । जयासी घडे भाग्याकुण । तरि निवारे जन्ममरण । कळिकाळ शरण तया ॥१३॥ तो जयाकडे कृपेने पाहे । तयासी सृष्टी सुखाची होय । तो म्हणे मोक्षासी जेथे राहे । तेथेचि राहे त्याचें बोला ॥१४॥ अष्ट महासिद्धी येती त्याच्या दासी चारी मुक्तिजाण । निराश शरण । परि तो न पाहे तया लागोन

म्हणोनिया ॥१५॥ ऐसे जें सत्य शरण । तेचि आचारासी अग्रगण । शिवाचारासी संपन्न । मुकुट मणी आमुचे ॥१६॥ त्याचे प्रसादे करोन । शिवाचार होय पावन । मजहि दैवत पण । त्याचेनि ओ देवि ॥१७॥ मी तरी निर्गुण निराकार । भक्ति प्रेमा लागी झालो साकार । भक्त माझे हृदयीचे जिव्हार । त्याचे साचार ध्यान मज ॥१८॥ त्याचे सदा मज चिंतन । त्याचे आवडे मजस्मरण । मी न विसंबे एक क्षण । तोहि अर्धपळ न विसंबे ॥१९॥ तो आत्मा माझा मी त्याचे शरीर । तया मज नाही भेदा कार । जैसी गोडी आणि साखर । अभिन्न असे ॥२०॥ ऐसे ऐकोन पार्वती । महा आनंद पावली चित्ती । मग आणिक कांही विनंती । करिती झाली ते काळी ॥२१॥

दे उ. चित्तादिसर्वहस्तानां क्रमोत्पत्तिः स्वभावतः ॥
श्रोतुमिच्छामि स्पष्टं तत् ब्रुहि मे परमेश्वर ॥ ८ ॥

पार्वती म्हणे शंकरासी । षड्हस्ताची उत्पती कैसी । कोणा पासोनि कोणा हस्तासी । निरोपा स्वामी ॥२३॥

शि. उ. वस्तुनो भावहस्तश्च तस्मात् ज्ञानं ततोमनः ॥
मनसोऽहंकृतिर्जाता प्रकृतेः बुद्धिरेव च ॥ ९ ॥
बुद्धेश्चितं समुत्पन्नं क्रमशो लघुभावतः ॥
एतद् हस्तस्य विज्ञानं अतिसुक्ष्मं वरानने ॥ १० ॥

शंकर म्हणे पार्वतीला । वस्तुपासोनि भाव हस्त झाला ।

भावा पासोन उत्पन्नला। ज्ञान हस्त तो ॥२३॥ ज्ञान हस्ता पासोन सुमन हस्त झाला। सुमनहस्ती निरहंकार हस्त झाला। निरहंकारी सुबुद्धि उत्पन्नला। परंपरेंने ॥२४॥ एवं षड्हस्ताची उत्पत्ती। निरोपिली असे तुज पार्वती। भावे धरावा सुचित्ती निर्णयो हाची ॥२५॥

दे. उ. चित्तादि सर्व हस्तैस्तु षड्लिंगानां क्रमेण वै ॥
कथं वा क्रियते पुजा तद्ब्रुहि परमेश्वर ॥ ११ ॥

गिरीजेने शंभुसी पुसीले। चित्त हस्ते कोण लिंग अवधारिले। येणे परि षड्लिंग पुजिले। कोण लिंग कोण्या हस्ते ॥२६॥

शि. उ. चित्तस्याचारलिंगं स्यात् गुरुलिंगं सुबुद्धिनः ॥
शिवलिंगमहंकारो मनो हस्तेन जंगमः ॥ १२ ॥
प्रसादं ज्ञानहस्तेन महालिंगस्य भावकं ॥
इति गुह्यतमं ज्ञानं सुसुक्ष्मं श्रुणु पार्वती ॥ १३ ॥

शिव म्हणे ओ गिरीजे। चित्त हस्ते आचारलिंग अवधारिजे। सुबुद्धि हस्ते गुरु लिंग पुजिजे। पुढारी ऐक ॥२७॥ शिवलिंग पुजिजे निरहंकार हस्ते। सुमन हस्ते जंगम लिंगाते। ज्ञानहस्तें प्रसाद लिंगाते। अवधारिजे ॥२८॥ एवं भावहस्त महालिंगासी। तेणे अवधारिजे तयासी। हे षड्हस्ते षड्लिंगासी। अवधारण निरोपिलें ॥२९॥ हे तुज केले अंतर्गुह्य माझे ज्ञान। अत्यंत सुक्ष्म प्रमाण। ते तुज केले

निरोपण | तू भक्तराज म्हणोनिया ||३०|| भक्ति विश्वासे विण | हे श्रवणी न पडे निरोपण | तुझे प्रेम मज म्हणोन | बोधितसे तुजला हे ||३१||

दे. उ. कि मिश्रं चित्तवुद्धिश्च किमहंकार मिश्रितं ॥
किं मिश्रं ज्ञान भावश्च ब्रूहि मे परमेश्वर ॥ १४ ॥

हें षड्हस्त षड्स्थळासी | मिश्रित असती कोण्या पदार्थासी | ते निरोपा म्हणे शिवासी | पार्वती देवी ||३२||

शि उ. भाव: पंचसमायुक्तो ज्ञानं पंचसमन्वितं ॥
मन: पंचसमायुक्तमहकारस्तथैव च ॥ १५ ॥
बुध्दि: पंचसमायुक्ता चित्तं पंचसमन्वितं ॥
एकेकं पंचभिर्युक्तं सुसूक्ष्मं कमलानने ॥ १६ ॥

ईश्वर म्हणे गिरिजेस | एकेक हस्त पांचा पांचास | मिश्रित असे तें सावकाश | निरोपु ऐक तें ||३३|| ऐक्य स्थळाचा जो भाव हस्त | तो पांचासी असे मिश्रित | शरणास जो सुचित हस्त | तोहि मिश्रित पांचासी ||३४|| प्राणलिंग अहंकार हस्त | तोहि पांचासी असे मिश्रित | तैसा प्रसादियाचा निरहंकार हस्त | तो मिश्रित पांचासी ||३५|| माहेश्वरा सुबुद्धि हस्त | तो पांचासी असे मिश्रित | भक्तास जो सूचित्त हस्त | तोहिं मिश्रित पांचासी ||३६|| एवं हस्त येरयेरासी | मिश्रित असती पांची पांचासी | ऐकोन संतोष झाला गिरीजेसी |

मग आणिक प्रश्न करी ||३७||

दे. उ. सहभाजनस्य के भेदाः का व्याप्तिः परिमाणतः ॥
एतत् सर्वं समासेन ब्रूहि मे परमेश्वर ॥ १७ ॥

गिरीजा म्हणे शंकरासी | कोणलिंग कोण्या द्वारासी | कोण्या हस्ते कोण विषयासी | भोगीत ते निरोपावे स्वामी ||३८||

शि. उ. घ्राणेनाचारलिंगं तु गंधं गृह्णातियत् सदा ॥
जिव्हया गुरुलिंगं हि रसं गृह्णाति तत्वतः ॥ १८ ॥
चक्षुषा शिवलिंगं तद्रुपं गृह्णाति यत्तथा ॥
त्वचा जंगमलिंगं च स्पर्शं तदनुभूयते ॥ १९ ॥

भक्त भूमि अंगे सूचित हस्ते | घ्राणद्वारे गंधविषयाते | आचार लिंग अर्पणातें | भोक्तव्य होय ||३९|| माहेश्वर अपांगे सुबुद्धि हस्ते | जिव्हा द्वारे रस विषयाते | गुरुलिंग अर्पणा ते | भोक्तव्य होय ||४०|| प्रसादि तेजांगे निरहंकार हस्ते | चक्षुद्वारे रुप महाविषयातें | शिवलिंग अर्पणाते | भोक्तव्य होय ||४१|| प्राणलिंगी वायु अंगे सुमन हस्तें | त्वचा द्वारे स्पर्श विषयाते | जंगमलिंगी अर्पणाते | भोक्तव्य होय ||४२||

श्रोत्रेण शब्दं ग्रहणाति शरण्यो लिंगमुर्तिकः ॥
हृदयेन तु महालिंगं ॐकारं चापि ग्रह्यते ॥ २० ॥

शरण नभांगे ज्ञान हस्ते । श्रोत्रद्वारे शब्द विषयाते । प्रसाद लिंगी अर्पणाते । भोक्तव्य होय ॥४३॥ ऐक्य चिदंगे भाव हस्ते । हृदयद्वारे प्रणव विषयाते । महालिंग अर्पणाते । भोक्तव्य होय ॥४४॥ ऐसे पांच लिंगाचे भोक्तेपण । तुज निरोपिले विवरोन । आता महालिंगाचे भोक्तेपण । लक्षण निरोपु ऐक गिरीजे ॥४५॥

इत्येवमाश्रयेणैव सदालिंगं सुबुध्दिमान् ॥
गंधाद्यानंदपर्यंतमनुराददति सर्वदा ॥ २१ ॥

ऐसे इंद्रिय द्वारे विषय जाण । षड्लिंगी जे जे अर्पण । ते ते भक्ति महालिंगी अर्पण । सर्व तोचि म्हणोनि ॥४६॥ षड्लिंगाचा जो विस्तार । तो स्वये महालिंग साचार । म्हणोनि सर्व भोक्ता परात्पर । तोचि बोलिलला असे ॥४७॥

लिंग दृष्टया दर्शनंस्यात् लिंगहस्तेन स्पर्शनं ॥
लिंगश्रोत्रेण श्रोतव्यं लिंगजिव्हारसात्मवान् ॥ २२ ॥

लिंग दृष्टी दृष्टी देखत । लिंगाचे हस्ते देत घेत । लिंगाचे श्रोत्रे ऐकत । म्हणोनि महालिंग भोक्ता ॥४८॥ लिंग जिव्हे रस चाखत । लिंगाविण कांही न चाले पदार्थ । आणिक कांही होत जात । ते लिंगाचिये सत्ते ॥४९॥

लिंगघ्राणेन घ्राणं तु लिंगेन पदतेसह ॥
लिंगमनगतं नित्यं येनतत् सद्भाजर्न ॥ २३ ॥

लिंगाचिये घ्राणे घ्राण | गंध विषय भोगी आपण | लिंगाचे पद ते चरण चालन | लिंगा विण न चले कांही ||५०|| लिंग बोलविल्या वेदु बोले | लिंगे चालविल्या सुर्य चाले | लिंगे हालविल्या वायु हाले | सत्ता मात्रे ||५१|| लिंगे रचविल्या ब्रह्मांड रचे | लिंगे खचविल्या सर्व खचे | स्थिती नाद बिंदु कारण रचे | त्याचिया सत्ते ||५२|| क्षितीने भूते वाहवी | पर्वती बैसका पाडावी | सागरे सीमा नुल्लघांवी | ही आज्ञा लिंगाची ||५३|| उत्पत्ती करीजे ब्रह्मयाने | प्रतिपाळ कीजे विष्णूने | संहार कीजे रुद्राने | सत्तामात्रे लिंगाच्चिया ||५४|| लिंगा पासोन शक्ति झाली | तेव्हा पृथ्वी स्थितीस आली | ब्रह्मा विष्णू ही बाळे व्याली | शक्ति सामर्थ्य अद्‌भुत ||५५|| आता एक एक काय सांगावे | सर्वचि चाले लिंग सत्ता प्रभावे | एवं महालिंग कर्ता भोक्ता स्वभावे | परि अकर्तृत्व न मोडे ||५६|| जैसे भानुचे सत्ते सर्व चालत | परि तो न करिता करवित | करवोनि निराळा राहत | त्या परि अकर्ता तो ||५७|| जैसा कुलाल चक्राखालता | खुंटा असे अकर्ता | सर्व घट होती त्याचिया सत्ता | परि तो उगाची असे ||५८|| ऐसा महालिंग सर्व भोक्ता करीता | चराचर चाले तयाचिया सत्ता | परि तो न लिंपे सर्वथा | अकर्तेपणेचि असे ||५९|| तोचि होय महालिंग | स्वयंभू न चळे अभंग | शक्ति सामर्थ्य तया अंगी ||६०|| कर्ता हर्ता होऊनि असंग |

कर्ता असोनि अकर्ता । त्याची असे सर्व सत्ता । तेथें अहंकारें गर्वे वर्तता । विघ्न प्राप्त तयासी ॥६१॥ सर्वत्र लिंग रुपी जाण । तें स्वयेंचि झालो आपण । लिंगा मज भिन्न पण । नसे जाण पार्वती ॥६२॥ त्या लिंगाचे पूर्ण भक्त । ते मला असति आप्त । त्या वेगळा दुजा पुनित । न मानी मी देवी ॥६३॥ आपणा तया भेद नाही । जैसी भूषणे सुवर्णा ठायी । भानु किरणा भेद कांही । नसे जाण सत्य पै ॥६४॥ तंतु आणि वस्त्रास । मृतिका आणि घटास । आकाश तैसेंचि शब्दास । भेद नाही जाणपा ॥६५॥ तैसा मी लिंगरुपी भक्त हृदयी । वसे सदा निरालंब तत्वा ठायी । लिंग निष्ठें करोनि कैलासा लयी । अंती येतो धावोनिया ॥६६॥

सर्वेंद्रियाणां द्वारैश्च महार्लिगेन भूज्यते ॥
इति यस्य स्थिरा बुध्दिः सहभाजः स उच्यते ॥२४॥

सर्व इंद्रिय द्वारे भोक्ता । महालिंगचि तत्वता । ऐसा जाणें बुद्धिवंत दाता । तोचि जंगम तोचि भक्त ॥६७॥ करोनि अकर्ता ही खूण । कळली जया संपूर्ण । तो लिंगचि स्वये होओन । असे तोचि जंगम तोचि भक्त ॥६८॥

दृष्टात् दृष्टिः श्रुतात् श्रुतं घ्रातात् घ्रातं तथैव च ॥
स्पृष्टात् स्पृष्टं तु जानीयाद्रसनाद्रसनं तथा ॥ २५ ॥
भुक्तात् भुक्तमाख्यातं तृप्त्या तृप्तिं तथैवहि ॥
एकः प्राणो समाख्यातो सदैव सह वर्तिनां ॥ २६ ॥

दृष्टीने देखे ते ते जाण। कानी ऐके ते ते आपण। घ्राणी परिमळ घे ते जाण कोण। तया लिंगा विना ॥६९॥ जिव्हेंसी रस घेत। स्पर्शासी स्पर्शत। तया विण दुजा नितांत। कोण तो विचारी पा ॥७०॥ प्रणवादि विषयी तृप्त होत। तोचि जाणे समस्त। तया लिंगा विण मात। येथ बोलोचि नये ॥७१॥ ऐसा सर्वत्र लिंग व्यापक जाण। तेंचि ते स्वये झाले आपण। आपणिया तया भिन्नपण। न देखती कदा ॥७२॥ आपणिया तया भेद नाही। जैसे भूषण सुवर्णाचे ठायी। भानु किरणा भेद नाही। अंतरी असे एकचि ॥७३॥ अथवा तंतु आणि विस्तारा। मृतिका आणि घरा। अवकाश आणि अंबरा। भेदु जैसा नाही ॥७४॥ तैसा लिंग आपणिया। अभेद वर्ते निर्माया। तोचि शरण लिंगीया। भक्त अथवा जंगम ॥७५॥ तरि लिंग स्थिती वर्तती जे। तेणे लिंगचि आपण होईजे। ही स्थिती ऐक ओ गिरिजें। निरोपु तुज ॥७६॥ लिंग उगेचि असे जैसे। आपणहि उगेचि असिजे तैसे। लिंगासी चळण वळण नसे। आपण निचशळ तैसे व्हावे ॥७७॥ लिंग शांत असे। आपणहि तैसे विशेषे। लिंगासी बडबड नसे। आपणहि तैसाचि ॥७८॥ लिंग निराश सर्वा रहित। आपणहि निराश निश्चित। लिंग निराभिमानी निर्हेत। आपणहि तैसाचि ॥७९॥ कोणी म्हणतील आकार आहे। तैसा जरि हाहि होये। तरि जडत्व आले पाहे। उभय वर्गा ॥८०॥ ऐसे

जे बोलती । तें अज्ञान म्हणिजेती । का म्हणसी तरी लिंग आकार भाविती । म्हणोनिया ॥८१॥ जें पाताळ तूप ते थिजले । तरि काय तूप पणा मुकले । तैसे निराकार आकारले । लिंग होओनिया ॥८२॥ यालागी लिंग निराकारची असे । तया आकार प्रकार नसे । दिसे तरि कल्पिला असे । भक्ति सिध्दी साठी की ॥८३॥ एंव भक्त आणि देव । उभया नसे भिन्न भाव । तो भक्त श्रेष्ठ सावेव । लिंग होओनि ठेला ॥८४॥ म्हणोनि येरयेराचे प्राण । एक होओनि ठेले जाण । लिंग भक्त मिळोन । उभय वर्ग एकचि ॥८५॥

हृदयं हृदयंचैव श्रोत्रं श्रोत्रं च सर्वदा ।।
स्पर्शनं स्पर्शनं चैव दृष्टिर्दृष्टिस्तथा पुनः ।। २६ ।।

जिव्हा जिव्हेंद्रियं ज्ञेयं घ्राणं तद् घ्राणमेव हि।।
एकेव प्राणमाख्यातं लिंगेन सह वर्तिनः ।। २७ ।।

आपुले निज हृदयास । लिंगाचे हृदय असे सावकाश । आपुलिया श्रोत्रास । श्रोत्र लिंगाचेचि ॥८६॥ आपुले त्वगींद्रियासी जाण । लिंगाचेनि त्वगींद्रिय पण । आपुले चक्षुसी नेमुन । चक्षुपणा तेहि लिंगाचेनि ॥८७॥ आपुले जिव्हेसी । लिंग जिव्हा सावकाशी । आपुल्या घ्राणासी । घ्राण लिंगाचे ॥८८॥ आपुलिया वाक्या वाक्य पण । लिंग वाक्ये असे जाण । पाणींद्रिया लागोन । पाणींद्रिय लिंगाचे ॥८९॥

पाद इंद्रिया पाद इंद्रिय जाण | लिंगासी असती आपण | शिश्नासी शिश्नपण | लिंग निष्ठें जाण ते ||९०|| गुदासी गुदपण | ते लिंग गुदे जाण | एवं दशइंद्रियासी प्रमाण | लिंग इंद्रियाचेनि ||९१|| अंतःकरणा अंतःकरण | लिंगचि असे जाण | मनासिमन पण | तेंहि लिंगाचेनि मने ||९२|| बुद्धिसी बुद्धि जाण | लिंगाची बुद्धि आपण|आपुले चित्ताचे चित्त नेमून | लिंगाचें चित्त असे ||९३|| आपुल्या अहं-काराचा अंहकार | आपणचि असे लिंगेश्वर | एवं सर्व वर्तमान सर्वेश्वर | भक्तचि होओनि वसे ||९४|| या लागी लिंग इंद्रिया विण | न चालतो भक्तइंद्रिये जाण | म्हणोनि उभय वर्गी भिन्न | म्हणोचि नयें ||९५|| एवं उभयतासी मिश्रित जाणिजें | आपण या लिंगी एकत्व कीजे | येर येरा प्राण मिश्रित होईजे | अभिन्नपणे ||९६|| ऐसें आपण ते लिंग लिंग ते आपण|ऐसा आचरे जंगम अथवा भक्त जाण | त्या नांव बोलिजे सर्व वर्तमान | सत्यसत्य ओ गिरिजे ||९७||

लिंग देही शिवात्मायं लिंगाचारी न लौकिकः ॥
सर्वं लिंगमयं रुपं लिंगेन सह लक्ष्यते ॥ २८ ॥

लिंगी प्राणी शिवरुप होओनि | लिंगाचे वर्ते आचरणी | तो लौकिकासी न मानी जनी | लिंग ध्यानी लिंगची तो ||९८|| जो लिंगरुप देखे दृष्टी सृष्टी | अनंत ब्रम्हाडे

लिंगाचे पोटी | अध उर्ध्व मध्य शेवटी | लिंग संपुटी सर्व देखे ||९९|| लिंगापोटी सृष्टी म्हणणे | हे ही बोलणे अवाच्य जाणणे | सृष्टी आणि लिंग दोन पणे | काशासी भाविजे ||१००|| आघवा लिंगचि का न म्हणावा | भेद सांडोनि अभेदचि जानावा | हा निजभक्ति आपुला ठेवा | जाणोनि वर्तती ते ||१०१|| ते आपणिया सहित लिंगचि देखती | लिंगरुपचि सर्व सृष्टी भाविती | शिवस्मरणी शिवरुप होओनि असती | तया प्रति महालिंगी बोलिजे ||१०२|| तया आणि महालिंगासी | भेद नाही उभय वर्गासी | म्हणोनि तोचि महालिंग सर्वासी | सर्व भोक्ता होओनि असे ||१०३||

इत्थं सर्वं महालिंगं कर्ता भोक्ता प्रकाशकः ।।
यो हि भेदो न जानाति प्रसादो तस्य निष्फलः ।। २९ ।।

ऐसा महालिंगचि एक | सर्वत्र तोचि भोक्ता देख | एका वाचोनि आणिक | दुजा नाही कोणी ||१०४|| ही खूण न जाणता पुजा करी | अधोगति जाय तो अवधारी | त्याचा प्रसाद निर्फळ सुंदरी | चुकला निज सुखासी ||१०५|| एक नेणोनि पुजा करिती | एक अभिमाने ते न पुसती | एक ते अनुमानेच आचरती | गुरुमुखे विण||१०६|| एक देखा देखी करिती | एक दंभास्तव आचरती | या लागी दुःखाते पावती | जन्म मृत्यूच्या ||१०७|| म्हणोनि

संप्रदाय मार्गे विण | जे जे कीजें क्रिया आचरण | ते ते निर्फळ होय जाण | प्रसादिक क्रिया ते ||१०८|| तैसीच दुजी एक गोष्ट | जो स्वपराक्रमे बलिष्ट | पुजु पहतसे गर्विष्ट | त्याची पुजा निष्फळ होय ||१०९|| आज हे तुज लागी रहस्य | सांगतो सद्भक्ति वश | गुरुमुखे अर्चिता विशेष | पुण्य घडें तयासी ||११०|| जैसी पुजा तैसे भजन | आवडीक प्रेमे करुन | आळस न करी रात्रदिन | नामस्मरण शिवाचे ||१११|| प्रेमे टाळी वाजवून | घोषे अंबर गर्जवून | नाचोनि करी भजन | सद्भक्त माझा तो ||११२|| इति श्रीपरमरहस्य सारामृत | शिवगौरी संवादी वर्तत | त्याची टीका करोनि प्राकृत | कृत कृत्य मन्मथ ||११३||

इति श्रीपरम रहस्यें हर गौरी संवादे षड्लिंगनिर्णय निरोपणं नाम चतुर्दशोध्याय: समाप्त: ओव्या ११३ श्लोक २९

## अध्याय १५ वा



श्री गुरुभ्योनम: | मागे जे जें निरोपिले | ते ते पूर्णत्वेची भासले | पंचतत्वी भरोनि उरले | रुप तुझे स्वामिया ||१|| गुज खुण ब्रह्मांडाची | कथनी शक्ति असे अन्य

देवाची । सत्ता सर्व तुमची । कर्ते तुम्हीच ईश्वरा ॥२॥ आता पंचदशम अध्यायी । कथा रसाळ श्रवणा ठाई । वदा म्हणोनि लागे पायी । पार्वती देवी सादर ॥३॥

दे. उ. लिंगं तु षड्विधं प्रोक्तं तत्रायं परमार्थतः ॥
जीवो देहं परित्यज्य कस्मिन् लिंगे प्रलीयते ॥ १ ॥

पार्वती म्हणे शिवासी । तुम्ही षड्लिंग निरोपिले ऐक्यत्वासी । तरि देहासी प्राणलिंगासी । ऐक्य कोण लिंगी ॥४॥ तो तया लिंगी समावे कैसा । त्याचा प्रकार निरोपा सरिसा । श्रवणी झाली मन्मानसा । उत्सुकता पै ॥५॥

शि. उ. पंचेंद्रियमुखं ज्ञात्वा पदार्थंच समर्पितं ॥
यल्लिंगमनुते यस्तु तस्मिन् लिंगे प्रलीयते ॥ २ ॥

पांची लिंगे ज्या लिंगा भितरी । तो पांची लिंगा भोक्ता अवधारी । जो भोगून अभोक्ता सर्वांतरी । तया नांव महालिंग म्हणिजे ॥६॥ तो महालिंग सर्वगत असे । देहांती तेथे जीव समरसे । परि हे तया घडे अखंड ध्यासे । महालिंगानुभव असे जया ॥७॥ जो महालिंग सदा ध्यातु असे । अंतकाळी त्यासी आठवी विश्वासे । मग तोचि होय सौरसें । यांसी अन्यथा नाही ॥८॥ महालिंगा अंतकाळी आठविजे । ते होणे न चुके सहजे । म्हणोनि अंतकाळी ओजे । असिजे सावधान ॥९॥ जो महालिंगी समाधी लावी । तो जन्म

मृत्यूतें चुकवी । शिवध्यानी बुद्धि सावध ठेवी । तोची पावे मुक्तिपद ॥१०॥ अंतकाळी शिवस्मरण होणे । नसे अभ्यासाविणे । म्हणोनि नित्य नेमे शिवभजन । करावे जागृति स्वप्नी हि ॥११॥ तयाचें होय साध्य साधन । स्वरुपी राहे सावधान । ना ना परिचे भोग त्यजून । नामस्मरणी रत असिजे ॥१२॥ ना तरि म्हणशील आता भोग भोगिन । मग अंतकाळी सावध होईन । त्या वेळी महालिंगाचे स्मरण करीन । देह त्यागीन तेचि होओनि ॥१३॥ तरि हें न घडेचि सर्वथा । जरि इंद्रिये न निर्दाळिता । अथवा शिवध्यान हि नसता । अंतकाळी वस्तु होणे न घडे ॥१४॥ अंतकाळी जठराग्नि जाण । सावध असे जरि भाग्य पुर्ण । नसता जठराग्नि जाय विझोन । तेंणे धूर कोंडोनि अंधारी होय ॥१५॥ अंधारी धूर दाटला जेंव्हा । ते वेळी सावध व्हावे केंव्हा । मन बुद्धि भ्रमोनि जाय तेंव्हा । आठवण केवि होय ॥१६॥ अंतकाळी घाबरे पण । आसन घालोनि बैसेल कोण । मा आठवेल वस्तूपण । मग ब्रह्म होणे न घडे ॥१७॥ अंति जठराग्नि विझलियाने । धूर दाटलिया गुणे । तई मन बुद्धि भ्रम पणे । तेथे चिंतन हेतु कैसा ॥१८॥ जरि हेतु ध्यास का नाही म्हणसी । तो अधिच नसता निजध्यासी । तरि अंतकाळी स्मरणासी । आठव कैचा ॥१९॥ यालागी आताचि अखंडिता । निजध्यास करावा प्रित्यर्थी । तरि अंतकाळी

ध्यास हेतु तत्वता । महालिंगचि होतसे ॥२०॥ जेवी जागृति मन जेथे थोके । तेचि स्वप्नी वासनात्मक देखे। तेवि प्रयाण काळी आठवे ते न चुके । होणे देवी ॥२१॥ या लागी देह असता वस्तु ध्यास असिजे । तरि ते अंतकाळी आठवे सहजे । मग तेच होणे न चुकिजे । देहांती ओ गौरी ॥२२॥ या लागी अखंड महालिंगी ध्यास । असे प्राणिया तोचि आठवे तयास । मग जीवासी ऐक्य समरस। महालिंगी होय ॥२३॥ तुवा पुसिले होते अंतकाळी । जीव मिळे कोण लिंग मेळी । तो निरुपिली तुझी प्रश्नावळी । निर्णय करोनि ॥२४॥ येऱ्हवी असता निजरुपाला । अंतकाळ कैचा तयाला । देह असता विदेह होओनि ठेला । त्यासी मरण कैचे ॥२५॥ ज्यासी मृत्यु विकारचि शेखि नाही । तो अंतकाळ करील कधी काही । त्यासी जाणे येणे मुळीच नाही । जीवन्मुक्त नरा त्या ॥२६॥ त्यासी जन्मादि षड्विकार नाही । तेणे अंतकाळी बसोनि स्मरावे कांही । ज्यासी स्मरावे तेचि पाही । स्वये होओनि ठेला ॥२७॥ म्हणोनि अंतकाळीची व्यथा । अभक्तासी होय तत्वता । निजभक्तासी नोव्हे सर्वथा । मृत्यू व्यथा प्रयाणी ॥२८॥ मरणासी मारोनि सावकाश । मृत्युंजय झाला अविनाश। त्यासी प्रयाण काळीचा प्रयास । सर्वथा न लागे ॥२९॥ देह गेलिया मोक्ष होय जरी । तरी कां अभ्यास सोसावे शरीरी । अथवा फिरती देशांतरी । ते काय व्यर्थची

जाणावे ॥३०॥ आता तंत्र मंत्र उपदेशिती । देह गेलिया मोक्ष होय म्हणती । ते सद्गुरु सर्वथा न होती । कैवल्य दानी ॥३१॥ जरि मुक्ति ये देही न घडे । तरि वैरागी का शिणती वेडे । ब्रह्मज्ञानी गुरु न भेटता बापुडे । करितील काय ॥३२॥ या लागी सद्गुरु ज्ञानी व्हावा । तो महालिंगी मेळवी जीवा । या परि जीवाचा ऐक्य ठेवा । देवि तुज निरोपिला ॥३३॥ प्रभुरुप श्रीगुरुनाथ । जया भेटती भाग्यानुसार समर्थ । ज्याचे बोधे परब्रह्म समस्त । शिष्यासी भासे ॥३४॥ ऐसा तो परब्रह्मचि झाला । मग मनादि सर्वेंद्रियाला । वस्तुत्वे देखे तयाला । अभेदवादी होओनिया ॥३५॥

यथा तत्वं तथा दृष्टिर्यथा दृष्टिस्तथा मनः ॥
यथा मनस्तथा भावो यथा भावस्तथा लयः ॥ ३ ॥

जैसा तत्वरुपासी आला । तैसाचि बोध दृढ बाणला । जे जे देखे ते ते तयाला । महालिंगचि भासे ॥३६॥ ज्याची दृष्टी झाली चैतन्य घन । जैसी दृष्टी तैसे मन । जैसे मन तैसा भाव जाण । अभेद ज्याचा ॥३७॥ जैसा भाव तैसा लय पावला । लयत्वे वस्तुत्वे लयी विश्रांतीस आला । तो वस्तुचि होओनि ठेला । त्यासी भेद नाही ॥३८॥

अर्पितानर्पितन्नास्ति भेदं वा अर्पणे तथा ॥
पदार्थस्य प्रसादस्य किंचिद् भेदं विभावयेत् ॥ ४ ॥

ज्या पदार्थी मिळे प्रसाद । तो अर्पावा नाही भेद । तो आपणचि स्वतःसिद्ध । म्हणोनि संदेह नाही ॥३९॥ त्यासी अर्पणी अनार्पणी भेद नाही । सहज अर्पण होतसे पाही । दोन्ही इंद्रियाचे ठायी । ब्रम्हबोध ओसंडतसे ॥४०॥ श्रवणी ऐके काही जे । त्वचेने जे जे स्पर्शिजे । चक्षुने जे जे देखिजे । ते वस्तुरुपचि ॥४१॥ जिव्हेने जे जे चाखिजे । घ्राणे जो जो गंध घेईजे । ते ते वस्तुत्व मानी सहजे । सत्य शरण तो ॥४२॥ जे जे वागींद्रियाचे बोलणे । पाणींद्रियाचे जे जे घेणे । पादेंद्रियाचे जे जे चालणे । ते तया विण नाही ॥४३॥ ऐसें सर्व इंद्रियासी । घेणे देणे अहर्निशी । ते ते समर्पि महालिंगासी । म्हणोनि तया भेद नाही ॥४४॥ ऐसा जो तत्वरुप होओनि । तत्वी मिश्रित असे तत्वपणी । त्यासी अर्पित अनार्पित कोणी । भेदु न देखिजे ॥४५॥

अभावे भावमासाद्य ह्यस्थाने स्थानमाचरेत् ॥
एतद्वयपरिज्ञानी प्रसादी सावधानकः ॥ ५ ॥

तु म्हणसी अर्पित अनार्पित । भेद का नाही त्यासी निश्चित । तरि तो काय क्रिया रहित । जाला म्हणसी ॥४६॥ तरि तो ऐक विचार । तो क्रिया न टाकी चतुर । अभाव भाव सारासार । जाणता म्हणोनि ॥४७॥ तो स्थाना अस्थाना

जाणता । सव्य अपसव्य ओळखता । तो होय केवि क्रिया सांडिता । विचारोनि पाहे ओ देवि ॥४८॥ भोग्या भोग्य जाणोन । जो वर्ते जाणे तो सज्ञान । अकर्तेपणे असे ज्याचें वर्तन । तो भयाने क्रिया टाकिना ॥४९॥ अकर्तेपणे असता । तो क्रिया न टाकी सर्वथा । स्वये होओनि वस्तुता । असे म्हणोनिया ॥५०॥ या लागी अर्पितार्नर्पितासी । संदेह नाही तयासी । कां म्हणसी तरी फळासी । निराश म्हणोनिया ॥५१॥ का क्रिया आलिया वरी । तरि फुगारा न धरी अंतरी । अथवा बिघडल्यावरी अंतरी । दुःखी न होय तो ॥५२॥ तो अवघा आपणचि झाला । तो निराश फळासी आला । म्हणोनि अर्पितार्नर्पित तयाला । संदेह नाही ॥५३॥ परि तो क्रिया न टाकिता नित्य वर्ते । जडजीव तरतील या परोपकारार्थें । क्रिया करावी सर्व समर्थें । जरि झाला प्रभू रुप ॥५४॥ या लागी तो सत्य शरण । क्रिया करी चित्त वृत्ति ठेओन । क्रिया फळास निराश पण । अकर्ता म्हणोनिया ॥५५॥ ज्यासी असे ऐसे ज्ञान । तया अर्पितार्नर्पिती अलिप्तपण । म्हणोनि तया ठाई भेद लक्षण । धरुचि नये ॥५६॥ येणे परि जो होय अचरता । तया बोलिजे सदा सावधानता । तोचि शुद्ध प्रसादि तत्वता । सत्य शरण तो ॥५७॥

संयोगे च वियोगें च लघुबिंदूसुखार्पितं ॥
य: कूर्यादिष्टलिंगे च सावधानिरंतरम् ॥६॥

संयोगी अथवा वियोगी । बिंदु मात्र जे सुख घडे अंगी । ते अर्पित जाण लिंगी । तो सावधान प्रसादी ॥५८॥ ज्या ज्या क्षणी जे जे होय सुख । अणुमात्र तेंहि अर्पि देख । इष्टलिंगाचे ठायी निष्ठंक । तो सावधान प्रसादी ॥५९॥ का म्हणसी तरि ऐक । गुरुलिंग जंगम तिन्ही एक । या लागी लिंगासी पुजा करी नेमक । हें ते गुरुसी अर्पिजे ॥६०॥ या लागी जे पुजिजे । ते गुरुसी अर्पे सहजे । तैसेचि इष्टलिंगासी अर्पिजे । ते तो गुरु भोक्ता ॥६१॥ ऐसिया अर्पण । विधीने जो वर्ते । सावधान प्रसादी बोलिजे त्याते । तो जिवाहूनि आवडे आमुते । सत्य शरण ओ देवि ॥६२॥ जो सत्य शरण झाला । तो लिंग होओनि ठेला । भेदा भेद निमाला । तया पुरुषाचा ॥६३॥ त्याचे आम्हासी ध्यान । तो देव मी भक्त जाण । तो आत्मा मी देह आपण । ऐसा पढियंता तो आम्हा ॥६४॥ तया आम्हा वियोगता । कधी न पडे तत्वता । मी तयात तो मज अतौतता । होओनि असे ॥६५॥ ऐसा जो सत्य शरण । तोचि प्रसादी सदा सावधान । अंतकाळी तयाचा प्राण । वस्तुसी समरसे ॥६६॥

प्राणप्रयाणकाले च लिंगभोगोपभोगिनः ।।
अर्पयेत् सावधानेन स्वलिंगे प्राणनायकः ।। ७ ।।

लिंग भोग भोगी जो सत्य शरण । लिंगी लिंगरुप जाहला

आपण | त्यानें प्रयाण काळी सावधान | प्राण अर्पावा महालिंगी ||६७|| लिंग भोग घेता जो लिंगी प्राणी | त्यानें प्राण प्रयाण काळी मेळओनि | महालिंगी समरसोनी | महालिंगचि होईजे ||६८|| ऐसा तो अंतकाळी सावधान | महालिंगी मेळवी प्राण | त्या नामे प्राणलिंगी जाण | सत्य शरण ओ देवि ||६९|| ना तरि जन्म वरी सावधान | अंतकाळी पडे विस्मरण | तरि केलें कष्ट व्यर्थ जाण | जालें त्याचे की ||७०|| नरदेह पावोन उत्तम | करि सद्व-र्तनाचा नेम | जो पुरुष सदा सप्रेम | शिवभक्ति करितसे ||७१|| तोचि या यातनेतून | दूर असे भक्त जन | त्याची निमाली सर्वथा जाण | अविद्या बंधने पै ||७२|| जो आत्म अनात्म विचार करि | त्यासी प्राप्त होय मंगळेश्वरी | ऋद्धि सिद्धि परोपरी | राबती तेथे ||७३|| तो पुरुष शिवचि झाला | ब्रम्हीचा अधिकार त्याला | प्रति ईश्वर बोलियेला | दयाशील म्हणोनि ||७४|| ऐसिया दशे प्रत | प्राप्त होती शिवभक्त | जे आचरती शिवयोग निभ्रांत | एक निष्ठ पणे ||७५|| देह संबंधे जी जी क्रिया घडे | ते ते सुख दुःख घेता रोकडे | न मानी आपुलें कर्म साकडे | निज ईश्वर इच्छा भावितसे ||७६|| अंतकाळीचें क्लेश | भक्ता लागू नेदी सर्वेश | दूर करी तयाचा भवपाश | ऐसा निष्ठावंत भक्त | जो शिवभक्ति कारणे ||७७|| असेल गुरु कर जात | तो अहर्निश जपत | गुरु खुणेसी ||७८||

पूर्वी ध्यास जो होता गुरू खुणेचा । जरि अंतकाळी विसर पडे तयाचा । तरि जे आठवे ते साचा । होणे न चुके कदा ॥७९॥ गुरू खुण म्हणिजे श्री गुरुचे स्वरुप । अरुपचि असे होओनि रुप । जैसे पातळ तेचि गोठोन तूप । तेचि शुभ्र जाहले ॥८०॥ उदकाची गार गोठोन । साकार झाली एक क्षण । अंति विरोन नीरपण । नव जा यकी ॥८१॥ गार विरला न विरता । नीरचि असे विवेके पाहता । तैसें गुरु रुपी निराकारता । सदा शिष्याची भावना ॥८२॥ निराकार गुरुरुपाची खूण । प्रयाण काळी जे आठवण । तरि तेचि होईजे चैतन्य घन । परब्रह्मचि ॥८३॥ हेंहि बोल बोधावया बोलिलो देवि । तथासी आठव नव्हता काय पूर्वी । अंतकाळी आठव जाहला हे पदवी । बोलचि नव्हे ॥८४॥ तरि अखंड ध्यास पूर्वी असे । तरि अंतकाळी मुखासी ये अपैसे । आदि नसता अंतकाळी आठवु बैसे । तरि आठवे केवि ॥८५॥ ज्याचे जेथ असेल मानस । अंतकाळी तेचि आठवे तयास । ते होणे न चुके सावकाश । ऋषी मुनी जना ॥८६॥ ज्या ज्या भावने देह जाये । त्या त्या भावने होणे आहे । हे न चुके तेचि होय तुझीच आण । कोणी म्हणती पार्वतीची आण । वाहिली काय म्हणोन । तरि तेहि ऐका श्रोतेजन । खूण सांगेन जी ॥८८॥ पार्वती ते भक्त राज । भक्त म्हणिजे देव पणाचे बीज । देव पण आलें भक्तांगे सहज । येऱ्हवी अव्यक्त अनाम ॥८९॥

भक्त तरि देवपणे उच्चारिती । देव तरि भक्तिने मिर-विती । येरयेरा वाचून स्थिती । नुरेचि उभया ॥९०॥ भक्त भक्तिने देओ झाला । तव उभयासी भेद खंडला । आता देव भक्त म्हणणे बोल ठेला । भक्त देव एकचि ॥९१॥ या लागी देव तोचि भक्त । भक्त तोचि देव । ऐसा जरि धरी अनुभव । तरि आनेचा संदेह । का धरावा चतुरी ॥९२॥ पार्वती स्त्री रुप दिसताहि । तो निजात्मचि असे पाहो । विचार आत्मा आत्मी वस्तुचे ठायी । असे काय पाहता ॥९३॥ जैसा बहुरुपी नटे सोंग । सोंग लटिके बहुरुपी अभंग । परि सोंगा वेगळे त्याचें अंग । अनेक ऐकिले काय ॥९४॥ मत्स्य कच्छ पशु पक्षी योगी स्त्री । देव नृपति अंत्यज श्वान रुपधरी । इतुकी रुपे करी खेळा भितरी । परि रुपि न मिळे बहुरुपी तो ॥९५॥ तैसा प्रभू तो एकला । अनंत रुपे तोचि नटला । तरि पार्वती आणि शिवाला । वेगळीक असे काय ॥९६॥ म्हणोनि निज प्रिती भावे । देवीची आण वाहिली देवे । हे सत्य शरण जाणती स्वभावे अभेद पण ॥९७॥ ऐसा अभेद पणे करी पूजन । अंतकाळी असे सावधान । त्यासीच बोलिजे साव-धान पुरुष जाण । सदाशिव साक्षात तो ॥९८॥

किंचार्पिततत्प्राणर्पितंच पृथक् पृथक् ॥

अर्पितं मुख संबंधे सुखमिंद्रियगोचरम् ॥८॥

देह क्रिया प्राण क्रिया जे जे होत | ते ते जाणोनि महालिंगी अर्पित | अकर्ता क्रिया कर्मी अलिप्त | तो सत्य शरण जाणिजे ||९९|| देह प्राण क्रिया होता | तेथे सुख होय जे तत्वता | ते ते होय अर्पिता |महालिंगी जेवि||१००||

न कायप्राणकर्माणि प्राणलिंगांगसंगिनः ॥
कालोऽपि शरणं याति जीवन्मुक्तः स्वभाविनः ॥ ९ ॥

लिंग प्राणी जो पुरुष | कर्म बंध नाही तयास | का म्हणसी तरी सावकाश | विश्वास धरुनि ऐक पा ||१०१|| देह क्रिया ज्ञान क्रियेस | तो न लिंपे उभयास | अकर्ता ज्ञानी बोलिजे तयास | तोचि शुद्ध मुक्त जाण ||१०२|| प्राण आणि लिंग एक किजे | तयासी प्राणलिंगी बोलिजे | कालभय शरण येई सहजे | तया सत्य शरणासी ||१०३||

सल्लिंगी प्राणमुक्तश्च मनोमुक्तस्तु जंगमः ॥
प्रसादी कायमुक्तश्च त्रिविधस्तत्व निर्णयः ॥ १० ॥

प्राण लिंगी तो प्राण मुक्त जाणिजे | जंगम तो मनोमुक्त मानिजे | प्रसादी तो शरीर मुक्त म्हणिजे | याचा निर्णय सांगु ऐक ||१०४|| प्राण तो लिंगी ऐक्य केला | म्हणोनि प्राण मुक्त बोलिजे त्याला | जंगम तो मनोमुक्त झाला | तेहि निरोपु तुज आता ||१०५|| मनाचा संकल्प विकल्प | हेचि बंधनाचे रुप | ते मनचि झाले उन्मनी रुप | मनोमुक्त

या लागी ॥१०६॥ मनाचा संकल्प विकल्प तुटला । मनोमुक्त जंगम बोलिजे त्याला । सर्व विकारी तो सुटला । म्हणोनिया ॥१०७॥ जव संकल्प विकल्प तुटेना । तव जन्म मरण सुटेना । संकल्प गेलिया मनोभुक्त जाणा । बोलिजे जंगम ॥१०८॥ प्रसाद विश्वासे सेवितुसे । प्रसादि निष्ठे देह बुद्धि नाशे । म्हणोनि शरीर मुक्त अपैसे । तया प्रसादियाचे ॥१०९॥ ऐसी तिही प्रकारची मुक्त स्थिती । तत्व निर्णय चढे त्याचे हाती । स्वये तत्वचि होय महामूर्ति । तोचि सत्य शरण देवि ॥११०॥ तयासी लौकिक व्यवहार । नाही प्रपंच आचार । तो तारावया शिवचार । सद्गुरु बोलिजे ॥१११॥

प्राणलिंगी स्वयं शांतो लौकिकाचारवर्जितः
सर्व संग परित्यागी वर्तते शिवभाववान् ॥ ११ ॥

प्राणलिंगी जो पुरुष । तया लोकांचा उद्देश । लोकाचार नावडे तयास । तत्वी रत सदा तो ॥११२॥ तो तिन्ही लोक वर्जित । त्यासी नावडे स्वर्गपद पदार्थ । नावडे भोग विलास समस्त । तो तरि रत माझे ठाई ॥११३॥ त्यासी पाषाण तैसे कांचन । गारे ऐसे माणिक्य रत्न । स्त्री पुरुषा निवडण । नाही तया ॥११४॥ हा गज हा मशक । हा स्वामी हा सेवक । हा राजा हा रंक । नेणेचि निवाडा ॥११५॥ हा पापी दोषी हा साधू । हा चतुर हा मुर्ख

मैंदू । हा वैरी हा बंधू । भेद नाही तया ॥११६॥ निंदा स्तुति समधरी । मान आपमान नाठवे अंतरी । मी तु पणाची उजरी । नाही तया ॥११७॥ सर्वत्र मजलाचि देखत । जे जे देखे ते मजरुपचि मानित । अर्धक्षण मज विरहीत । न राहे तो ॥११८॥ तो न राहे मजविण एक क्षण । मी नाही अर्धक्षण त्याविण । ते माझे विश्रांतीचे स्थान । मी विश्रांती त्याची ॥११९॥ ऐसे असोनिया ज्ञान । स्वधर्मे वर्ते निष्ठे करुन । अज्ञ जना तारावया जाण । क्रिया करी नेमेसी ॥१२०॥ सर्वत्र मानिता अभेद। क्रिया भंग होय अबद्ध । असे धर्म शास्त्री प्रसिद्ध । भेद ठेवावा क्रिये लागी ॥१२१॥ अलिंगी स्पर्श होता जाण । तात्काळ करावे स्नान । क्रिया करी देह झिजऊन। तोचि धन्य संसारी ॥१२२॥ जो तिन्ही लोकाचे सुख त्यागी । कष्ट करोनि राहे शिवमार्गी । शिवयोगी रत विरागी । तो जाण निजभक्त ॥१२३॥ ऐसी ही नित्यमुक्त लक्षणे। श्री शिवकृपे पार्वती जाणे । गुरुभक्ताविणे हे जाणणे । दुर्लभ देवी सर्वथा ॥१२४॥

नाहं वसामि कैलासे न मेरौ न च मंदरे ॥
मद्भक्ता यत्र तिष्ठंति तत्र तिष्ठामि पार्वती ॥ १२ ॥

ऐक पार्वती विश्वासे । मी कैलासी तरी न वसे । मेरु शिखरी सर्वथा नसे । मी असे भक्ता जवळी ॥१२५॥

मी मंदरांचळी नाही | ढवळागिरी नसे पाही | माझे भक्त असती जे ठाई | तेथे मी वसतुसे ||१२६|| माझे भक्त जेंथ असती | तेंथ मी तिष्ठें कैलास पती | ते अखंड माझे सांगाती | मी सांगाती तयाचा ||१२७|| देखून भक्त वृक्षासी | मी राहे त्याचे छायेंसी | ऐसी एकोपता मज त्यासी | ऐक्य भावे अभेद ||१२८|| या लागी बसवे-श्वरासी म्हणे | तुझिया पालखातील मी तान्हे | मीश्लाघ्य तुझेनि भक्ति गुणे | भक्तिचिया प्रेमा मज ||१२९|| भक्ताचा मी विकला | भक्ता नामी अंकिला | भक्तिभावे बांधिला | कैलास नाथ ||१३०|| ज्याचे हृदय निर्मळ | निष्कपट जैसे गंगाजळ | तेंथ मी तिष्ठे शाश्वतीळ | सद्-भाव देखो निया ||१३१||

सद्भावं सद्गुणं चैव स्वधर्म सावधानकः ॥
सत्संग स्त्वनवंद्यत्व तत्र तिष्ठामि पार्वती ॥ १३ ॥

देवि मी वसे तो ठाव ऐक | जे सद्गुणी जन सद्भाविक | दर्शक्रिया सुधार्मिक | तेथमी तिष्ठ तसे ||१३२|| सात्विक आणि सत्यवादी | निरभिमानी सद्बुध्दि | सावधानी निरवधी | तेंथे मी वसतसे सदा ||१३३|| शंकर म्हणे पार्वती प्रति | जो सद्भावे अर्चि प्रेम प्रिति | तयाचे गर्भवास चुकति | स्वधर्म निष्ठे करोनिया ||१३४|| जे जे भाविक भक्त शुध्द | तया कारणें न लगे बोध | तो

स्वधर्माचारे वर्तती सिध्द | आचार ज्ञान योगे ||१३५||
तया जे मानिती आप्त | तया जन्मयातना न होय प्राप्त |
शिवपदालागी अव्यक्त | भक्त असे तोहि पै ||१३६||
व्यक्त भक्ता ओळख | लिंग भस्म धारण देख | रुद्राक्ष
माळा भरणें सुरेख | शोभतसे प्रागी तो||१३७||लिंगधारण
जया नाही | त्यानी पार्थीव पुजावे पाहो | अथवा प्राण
लिंगाचिही | पुजा करावी आदरे ||१३८|| लिंग धारण
नाही ज्यास | जरि लिंग धारीचा घडे सहवास | तरि तो
अलिंगी शुद्ध पदास | पावे शिव स्पर्शे ||१३९|| तैसाचि
भस्माचा गुण | वीरशैवाचे भस्म पावन | आत्यादरे स्पर्श
करीता जाण | तुटती जन्म फेरे ||१४०|| रुद्राक्ष परिधा-
नाची गोडी | जया असे परम आवडी | तोही पावे कैलास
भवंडी | शिवचिन्हे करोनिया ||१४१|| शिवचिन्हाची
थोरवी मोठी | न वर्णवे कोणा उठाउठी | धारण करिता
शंकर भेटी | घडतसे निश्चये ||१४२|| ऐसे भक्तराज
उत्तम | आचरति धरोनि नेम | तया जवळी वसे सप्रेम |
अन्य स्थळ नावडे ||१४३||

सद्भक्तिश्च सदाचारः सद्गोष्टिश्च सदा सुखी ॥
सम्यक् ज्ञानं सदानंदं तत्रतिष्ठामि पार्वती ॥ १४ ॥

सद्भक्त सदाचारी असती | सद्गोष्टी सदा वदती | सदा
शुखित्वे वर्तती | तेथ मी तिष्ठे सदा काळ ||१४४|| सम्यक्

ज्ञान सदा आनंद । सदा शांत सद्बोध । त्याचे हृदयी शिवानंद । सदा क्रिडतसे ॥१४५॥ जो उदास वृति सोडून। सदा आनंदी ठेवोनि मन । काल मृत्यूते विसरुन । राहे सावधान मद्भजनी ॥१४६॥ जो अनिंदक अद्वैत । जो निराश निजभरित । तयाचे हृदयी सदोवित । वास माझा असे ओ देवि ॥१४७॥

विषयान् विषवत्यक्त्वा क्रोधं पारुष्य मेवच ॥
भक्ति प्रेम दया युक्त स्तत्र तिष्ठामि पार्वती ॥ १५ ॥

विषया विषासम मानोनि । जेणे त्यागिले तत्क्षणी। त्याचे हृदयी मी शूळपाणी । सदा निष्ठतु असे की ॥१४८॥ अक्रोधी जो सदा निवांत । क्रोधाते मांग मानोनि नातळत । त्याचे हृदयी मी कैलास नाथ । अखंड असे ॥१४९॥ जो निःसंग कोणाचा । संग न धरी त्रिगुणिकांचा । सुहृद असे जीवाचा । तेथ मी असे सदा ॥१५०॥ भक्ति तरि प्रेमे करी । भूतदया सर्वावरी । तेथ मी त्रिपुरारि । सदा वसतसे ॥१५१॥

मद्भक्तिरतो नित्यं मन्नाम स्मरणं सदा ॥
शरण्योऽच्चार सयुक्तस्तत्र तिष्ठामि पार्वती ॥ १६ ॥

एकविध भक्ति प्रेमे करी । भूतदया युक्त जो अंतरी । तेथे असे मी त्रीपुरारी । अन्याठाई नसे कदा ॥१५२॥

वेद शास्त्रे सांगती युक्ति । जीवे करावी शिवभक्ति । तेंथे कलिकालाची नसें शक्ति । महिमा अद्भूत भक्तिचा ॥१५३॥ माझी भक्ति कोणती म्हणसी । माझे नांव गावे सप्रेमेशी । माझें ध्यान अहर्निशी । त्या पासी सदा वसे ॥१५४॥ नित्य नाम असे घेता । मद्रुप होय तत्वता । देखे लावी भक्ति पंथा । आचरोनि जो का ॥१५५॥ शिवकथा शिव गोष्टी । सांगता उल्हास न माये पोटी । तयापासी मी धुर्जटी । सदा तिष्ठतू असे ॥१५६॥ ते माझे अति जीवलग । ते आत्मा मी त्याचे अंग । तया मज वियोग कदा नाही ॥१५७॥ तेणेचि केला सर्व नेम । त्यानेचि केला सर्व धर्म । तोचि उत्तमाचा उत्तम । जो ध्यातो सादर नाम माझे ॥१५८॥ त्या सत्य शरणाचा मी अंकित । तो चालता मी खडे वेचित । सदा मी त्या भोवता भोवत । विघ्न निवारित तयाचे ॥१५९॥ जयास तो वचन देईल । म्हणे जाय तुझे बरे होईल । तया मज देणे लागेल । तो म्हणेल तेचि ते ॥१६०॥ सेवक जैसा स्वामी सेवेसी । सदा सादर अहर्निशी । तैसा मीहि भक्ता पासी । सेवेसी सादर सदा ॥१६१॥ मी सदा वर्ते त्याचे बोली । सदा असे त्याचे जवळी । अहर्निश तयाचे मेळी । मी चंद्रमौळी भक्तिस्तव ॥१६२॥ त्याचे आम्हासी ध्यान । आम्ही हृदयी धरु त्याचे चरण । तयाचेनि मज देवपण । तो भक्त म्हणोनि ॥१६३॥ तयाचेनि योगे मी श्लाघ्य

त्रिनयन | तो आमुचे देवतार्चन | तयाचे सद्भावे रात्रंदिन | करी पूजन मी देवि ||१६४|| तो आम्हा पढियंता अत्यंत | तोचि जंग तोचि भक्त | निराकारा अकार त्या निमित्त | घेणे घडे आम्हा ||१६५|| आम्हा तया भेद नाही | मी तोचि तो विवेके पाही | मी त्या माजी मी त्याचे ठाई | मीच होओनि असे तो ||१६७|| काशी आदि सर्वतीर्थे जाण | तयाचे चरणी होती पावन | गंगा यमुना सरस्वती मिळोन चरण धुळी वांछिती ||१६७|| का म्हणसी तरि ऐक | तीर्थी पाप फेडोनि जाती लोक | त्या तीर्थांचे पाप-क्षाळी देख | सत्य शरणाचे चरण रज ||१६८|| त्याचे चरणे तीर्थे पावन | त्याचे चरण देवतासी उद्धरण | पाषा-णासी येतसे देवपण | तयाचे चरण तीर्थे ||१६९|| ऐसे ते माझे मुकुटमणि | मी अखंड त्याचे ध्यानी | आता किती वर्णू मी वाणी | तुहि जाणसी ओ देवि ||१७१|| तो मज पुंज्यमान जंगम | तोचि सत्य शरण जाण उत्तम | त्याच्या चरणीचे तीर्थ पावन | तिन्ही देवतासी ||१७१|| ही शर-णाची परम गती | तुज कथिली ओ पार्वती | अभक्ताची काय स्थिती | ती परीसावी सावध ||१७२|| जो अभक्त खल दूर्जन | निंदी सद्भक्ताचे वचन | अवमानी धर्म निती जाण | कुमार्गी रत सदा ||१७३|| धर्म नियम तोडोनि पाही | स्वमताचार रुढवी कांही | पाखंड वाढउनि लव-लाही | स्वधर्माते त्यजवी तो||१७४|| दुर्वासने वर्ते आपण|

तैसेचि करवि रोखून । तया वश न होता जाण । खोडमोडी दुष्टत्वे ॥१७५॥ जन्मा पासून चालता धर्म । त्यागून पाळवी अधर्म । प्रसिद्ध खूण सोडुन । दुजे सांगे वर्तावया ॥१७६॥ स्वजातीची करी निंदा । त्याचे वचन न मानी कदा । यम घालुनिया आपुलिया फंदा । नेत तया यम पुरासी ॥१७७॥ तेथ त्याची घेती झडती । पाप पुण्यांची करिती गणती । जे शिक्षे लागी पात्र होती । तया ताडिती शस्त्र घाये ॥१७८॥ स्वधर्मी निष्ठा नसे ज्यासी । कुंभी पाकादि शिक्षा त्यासी । कांच रसाचे कुंडा पासी । नेती त्या बुडवावया ॥१७९॥ अग्नि स्तंभा भेटवून । सर्वेचि करविती वृश्चिक दंशन । तीक्ष्ण शस्त्रे टाकिती छेदून । पुनर्जन्मा पाठविती ॥१८०॥ पापपुण्य होता समस्थिती । मनुष्य जन्मातें घालिती । तेथे जरी स्वधर्मे वागती । नाही भिती यमाची त्या ॥१८१॥ स्वधर्मी पुण्य प्राण्यास । विनये भोगविती विलास । पुण्य क्षय झालिया निःशेष । मृत्यूलो-कांस पाठविती ॥१८२॥ ऐसी ही स्वधर्म पुण्याची भीती । यमादिका असे निश्चिती । पुण्य कर्माचा महिमा देव जाणती । वाखाणिती बहुसाळ ॥१८३॥ स्वधर्माचरणाचे यश । लाजवितसे शक्रास । म्हणोनि सांभाळावे तयास । स्वातम सुखा लागी ॥१८४॥ माझे जे परम भक्त । त्याचे धर्मावर ग्रंथ । सुक्ष्म असती अत्यंत । गुरुगम्यते ॥१८५॥ जे मज आठविती रात्रंदिन । मज अर्चिती पंचाक्षरे करोन ।

ते मज प्रिय अनुदिन। लिंगधारी ॥१८६॥ तया शिवभक्ता यम येत शरण। जे का लिंगधारी करीती भस्म धारण। तसेचि घालिती रुद्राक्षाभरण। ते पावन ब्रह्मांडिका ॥१८७॥ तेथे मी अहोरात्र वसे। भूतगणासह परियेसे। अष्ट महासिद्धि सावकाशे। राबती तेथे ॥१८८॥ न आवडे कैलास वास। कैलासी मी असे उदास। भक्त गृही संतोष वश। डुलतसे आनंदे ॥१८९॥ ऐसा सदाचारी तोचि जंगम। माझेचि स्वरुप जाण सुगम। त्या विण मज नसे प्रेम। अन्याठाई ॥१९०॥

मद्देहं जंगमं देहं मत्प्राणश्चरलिंगकः ॥
तस्माद्धिचरतीर्थेन मम तृप्तिर्वरानने ॥ १७ ॥

माझा देह तव जंगम देह। माझा प्राण तो जंगम आहे। पाहता विचारे पाहे। पूज्यमान तो आम्हा ॥१९१॥ या लागी चरण तीर्थ आम्हासी। सेवावया अधिकार नेमेसी। त्याचे तीर्थ तृप्ती आम्हासी। निज मानसी ओ देवी ॥१९२॥

अनादि जंगमं देवि संपुज्य चरणोदकं ॥
अर्पयेत्परया भक्त्या ब्रम्हाविष्णूसूरेश्वरान् ॥ १८ ॥

अनादि सिद्ध जंगम मूर्ति। निराकार तारावया भक्ता प्रति। अवतरला सत्य शरण जाणती। सत्य शरणाला आम्हा तिन्ही देवासि ॥१९३॥ त्याच्या चरणीचे तीर्थ।

अर्पित । करावया अधिकार नेमस्त । असे वो पार्वती ॥१९४॥ त्याचें चरण प्रक्षाळून । अष्टविधार्चने कीजे पुजन । अंगुष्ट तीर्थाचे सेवन । आदरें कीजे ॥१९५॥

अनादि जंगमो नित्यो निर्जवास्य चराचरं ॥
चातुर्वर्णं भवेत् शिष्यं जंगमो गुरुरुच्यते ॥ १९ ॥

अनादि सिद्ध जंगम जाण । नित्य निर्गुण निरंजन । तो चातुर्वर्णासी गुरु आपण । तारक जाणिजे ॥१९६॥ या लागी तोचि गुरुराव । त्याची दीक्षा घेओनि एकभाव । तो त्यजुनि करी अन्य गुरुदेव । तरि निरयासी जाईजे ॥१९७॥ बहूलिंग बहू दैवत पूजन । बहू प्रसादी बहूगुरु सेवन । तयासी दृष्टांत जो देईन । तो ऐक ओ देवी ॥१९८॥ जैसा दासी कुसी पुत्र झाला । तो आप्पा म्हणेंल भल त्याला । ऐसा विचार घडला त्याला । ज्याला गुरु बहू होती ॥१९९॥ एक निष्ठा एक भावो । तोचि होय देवाधि देवो । परि आधिच जाणोनि गुरुरावो । ज्ञानिया कीजे ॥२००॥ जो असे ज्ञानांकित । जयाची संतमुखी स्तुत । त्याची दीक्षा निभ्रांत । घेईजे विशेषे ॥२०१॥ ऐसा जो गुरूरुप जंगम । मीच तो जाण उत्तम । ज्याचे पुजे चा आम्हा नैम । ते विश्रांम धांम आमुचे ॥२०२॥ इति श्रीपरमरहस्य सारामृत । शिवगौरी संवादी वर्तत । त्याची टिका करोनि प्राकृत । कृत कृत्य मन्मथ ॥२०३॥

इति श्रीपरमरहस्ये हर गौरी संवादे शरण लक्षण निरोपणं नाम पंचोदशोऽध्याय संपूर्ण: ओव्या २०३ श्लोक १९

## अध्याय १६ वा

श्री गुरवे नमः। पंचदश अध्याया पर्यंत। कथिले असे रहस्य अमित। ऐकोन सद्गदीत झाले चित्त। जगदंबेचे ते काळी ॥१॥ ऐसा हा शिवधर्म उत्तम। भुतळी कैसा आला परम। ये विषयी प्रश्न सप्रेम। करितसे पार्वती ॥२॥

दे. उ. धर्मस्थास्य महादेव महिमतिशयशालिनः ॥
प्रादुर्भावो हि भुलोके कथं जातं श्रुणोमितत् ॥ १ ॥

ज्याच्या सेवने होती लोक पावन। ऐसा हा शिवधर्म परम गहन। भुमंडळी कैसा झाला उत्पन्न। ते ऐकू वाटे मज ॥३॥ या शिवाचार धर्माची प्रसिद्धि। कवण्या आचार्यानें केली वृद्धि। तयाची नांवे मज निवेदी। कृपा करोनि स्वामिया ॥४॥

शि. उ. अतः परंप्रवक्ष्यामि पंचाचार्यं समुभ्दवः ॥
तेषां नामानि स्थानानि सावधानमनाश्रुणु ॥ २ ॥

शंकर म्हणे अम्बे प्रति। तुझा प्रश्न आचार्य उत्पती। शिवधर्म असे अनादि सिद्ध स्थिती। तयाची उत्पत्ती न

वर्णवे ॥५॥ प्रथमसांगेन आचार्य नाम । पुढे कथिन अवतार ग्राम । हा स्वायंभुवागमी विस्तार क्रम । असे जाण पार्वती ॥६॥ रेणूक दारूक एको राम । पंडित विश्वाराध्य पंचम । या आचार्यांचा महिमा परम । वर्णूशके कोण तो ॥७॥ ऐसे पांची आचार्य शिवाचार मार्गी । ते पांच झाले चहुयुगी । त्यासी आम्हासी भिन्नत्व जगी । नुरेचि देवि ॥८॥ तेवि ते महंत सत्य शरण । सातशे सत्तर गण । त्याज मजला भिन्नपण । सर्वथा नाही ॥९॥ पांची आचार्य शिवाचारासी मुळ । तया पासाव शिवाचार सकळ । वीरशैव मार्ग प्रबळ । विस्तार जाहला ॥१०॥ तोचि मुळीचा शिवाचार । कल्याणी अवतरला बसवेश्वर । त्यानेंहि केला विस्तार । शिवाचाराचा ॥११॥ कोण्ही म्हणती शिवाचार नवा झाला । बसवेश्वरा पासून विस्तारला । तें नेणोनि बोलती बोला । अज्ञान पणे ॥१२॥ जहिचा शिव तहिचा शिवाचार । नवा झाला म्हणती ते पामर । अनादि शिव तरि शिवाचार । अनादि सिद्धचि असे ॥१३॥ शिव जरि होता युगानु युगी । तरि शिवाचार असेल कि जगी । जैचा शिव तैचा भक्तांगी । शिवाचार अभंग असे ॥१४॥ म्हणोनि अनादि सिद्ध । असें शिवाचार निबद्ध । नवा झाला म्हणती बुद्धिमंद । ते नेणोनि बोलती ॥१५॥ मी अनादि सिद्ध शिवमुर्ति । शिवाचारहि अनादि सिद्ध पार्वती । यालागी नुतन झाला जे

म्हणती । ते मुर्ख जाणावे ॥१६॥

यदा यदा प्राण शिवैक्य भाजां हानिर्भवेत भूमितले गणेशाः ॥
तदा तदा भूमितले वतीर्यं कूर्वंति ते वै खलू धर्म संस्था ॥३॥

शंकर म्हणे अंबे ऐक । माझे पांच जे गण नायक । महा पराक्रमी रेणूक । वीरशैव धर्म मूर्ति ॥१७॥ तयाचे परि दारुक जाण । धर्म रक्षणा कारणे सुजाण। येती न लागता एक क्षण । प्रति सृष्टी कर्ते जे ॥१८॥ ऐसे हे एका मागे एक अवतरतो गण नायक । वीरशैव धर्म प्रति पालक । शिक्षा देत धर्म भ्रष्टा ॥१९॥ ज्या काळी लिंगायत धर्म हानी । त्या काळी सर्व धर्म लया जाओनि । अधर्म वाढे सतत मेदिनी । धर्म विचार नसे कोणा ॥२०॥ स्वधर्म सांडोनिया जाण। करिती अधर्म मंडण । तेंणे पुण्य क्षय होऊन। अधर्मता प्राप्त होय ॥२१॥ अधर्म जाहलिया सृष्टी । कदा नोहे पर्जन्य वृष्टी । तेंव्हा कैलासी येऊनी परमेष्टी । प्रार्थीतसे शिवालागी ॥२२॥ म्हणे अधर्म वाढला महिवरी प्रजा सर्व जर्जर निरहारी । तयाचे संकट निवारी । कृपा दृष्टी करोनिया ॥२३॥ तेंव्हा शिव आज्ञा करी गणासी । तुम्ही त्वरे जावे मर्त्य लोकासी । सर्व धर्म चालतें ज्यासी त्यासी । कीजे सत्य या वेळी ॥२४॥ वीरशैव धर्म परम पावन। तयाची वृद्धि करिता जाण। दुजे धर्म वाढावया कारण । हेचि मुख्य

साधन पै ||२५|| रेवणसिद्ध पूर्व दिशे | दक्षिणे मरुळ सिद्ध असे | पश्चिम दिशी वसे | एकोराम ||२६|| पंडिताराध्य उत्तरेसी | विश्वाराध्य तो मध्यें प्रदेशी | शंकर निरोपि पार्वतीसी | हे चहुयुगी जाहले ||२७||

दे. उ. भवदूक्तः शिवाचारः सम्यक्ज्ञातो मयाप्रभो ।।
अतःपरं वद देव आचार्यनामानुक्रमः ।। ४ ।।

पार्वती म्हणे शिवासी | तुम्ही निरोपिले शिवाचारासी | ऐकोन संतोष झाला मानसी | देवाधिदेवा ||२८|| ऐसा शिवाचार जया पासोन | प्रबळला अति गहन | ते आचार्य कोण कोण | त्याची नामे काई ||२९|| ते कोण्या युगी कोण अवतार | त्याचें कोण भुषण कोण आचार | कोण दिशा कोण मुनिश्वर | मठ कोण कोण देंशी ||३०|| इतुकें निरोपा म्हणे पार्वती | ऐकोन सावध कैलास पती | तुझा प्रश्न बरवा म्हणती | निरोपू आता ||३१||

शि. उ. गुरुर्रेवणसिद्धख्यो सिद्धेश मरुळस्तथा ।।
एकोरामः पंडितोर्या विश्आराध्य इतिक्रमात ।। ५ ।।

हे चहु युगी झाले आपण | रेवणसिद्ध मरुळसिद्ध दोन | तिसरा एकोराम महाप्रवीण | चौथा तो पंडिताराध्य ||३२|| महाप्रतापी विश्वाराध्य | अखंड होओनि राहिले निज-बोध | निजचि ते स्वतःसिद्ध | मुनीश्वर ओ देवी ||३३|| हे ते प्रत्यक्ष रुद्रचि असे | ज्ञान प्रकाशे भानु जैसे | जे

परब्रम्ह मुनी वेषे | अवतरले देख ||३४|| बहु युगी पांची आचार्य | झाले असती गुरुवर्य | त्याची मठस्थिती कर्म कार्य | आघवे सांगो आता ||३५|| रेवणसिध्द प्रसिद्ध गुरु | जेणे कथिला शास्त्राचारू | वीरशैव धर्मांचा विस्तारू | सिद्धांत दाखविला पै ||३६|| मरूळसिद्ध नामे साचार | प्रगटले माझे नामधार | तेणे केला उध्दार | भक्ति ज्ञान जाणेतो ||३७|| एकोराम आणि पंडिताचार्य | हे तव अवतारी भुवरी गुरुवर्य | वीरशैव धर्माचे सर्व कार्य | जया आज्ञे घडतसे ||३८|| विश्वाराध्य महागुरु | सर्व श्रेष्ठ अधिकारु | गुरुत्वाचा विचारु | प्रगट करी वेळो वेळी ||३९||

प्रत्येकं च प्रवक्ष्यामि तेषां नामानि वैं श्रुणु ॥
अथ गोत्र तथासुत्रप्रवरानि यथाक्रम् ॥ ६ ॥

**ही सागितली संक्षिप्त कथा|आता विस्तारे ऐक गोत्र गाथा| दण्ड कमंडलु सूत्र सर्वथा | निरोपि तो वेगळाले ||४०||**

सद्योजात मुखोत्पन्नो रेणुकः परिकीर्तितः ॥
तन्नामरेवणःसिध्दं सूत्रं पडविडीत्यपि ॥ ७ ॥

**जी परशिवाची मुखे पांच | सद्योजात वामदेव अघोर साच | तत्पुरूष ईशान त्यातच | उद्‌भवले आचार्य गण ||४१|| अघोर पश्चिम वामदेव दक्षिण देख | सद्योजात पुर्व मुख |**

उत्तर तत्पुरूष मुख । ईशान ते मध्य की ॥४२॥ सद्योजात मुखा पासाव । उद्भवला रेणुक गुरूराव । नामे रेवणसिद्ध देव । षडविडी सूत्र कर्ता ॥४३॥

गुरोः रेवणसिद्धस्य कोल्लिपाकपुरोत्तमे ॥
सोमेशलिंगजननमावासः कदलीपुरे ॥ ८ ॥

वीर धर्म प्रति पालक प्रसिध्द । नामे श्रीगुरू रेवणसिद्ध । कोल्लिपाक नगरा भितरीशुद्ध । सोमेश लिंगी उद्भवले ॥४४॥ तेथून निघाले सत्वर वना । गुरूत्व अधिकाराचे ज्ञाना । उपदेशावया मुनिजना । वास केला आश्रमी ॥४५॥ तेथे आपुलें सिंहासन । रंभापुरी येथे स्थापून । वीरशैव धर्मा प्रगटवोन । शिक्षा करीधर्म भ्रष्टा ॥४६॥ ऐसा कृत युगी रेवणसिद्ध ।तो केवळ निबद्ध । षोडश मुद्रिका शोभला प्रसिध्द । महंत तो ॥४७॥ तो चिद्रूप चिदाकार । साकारत्वेचि निराकार । जैसी मेघमुखीची गार । पुनः विरे तत्क्षणी ॥४८॥ शिवाचार अनादिसिध्द । तोचि प्रकाशावया प्रसिध्द । अवतरला रेवणसिध्द । आदि गुरु शिवाचारासी ॥४९॥ त्यासी सर्वांगी विभूति भूषण । मस्तकी जटा मुकुट शोभायमान । कंठी हिरवी कंथा परिधान । मुनिश्वरासी ॥५०॥

अतिवर्णश्च वर्णस्यात् प्रवरेकाक्षरोमतः ॥
दण्डोऽश्वत्थ इति प्रोक्तः सौवर्णस्य कमंडलुः ॥ ९ ॥

सौवर्णः कळशस्तस्य व्याघ्राजिनांबर स्तथा ॥
तस्य कंथा हरिद्वर्णा लक्षणं वीर गोत्रिणां ॥ १० ॥

करी सुवर्णाची खापरी । व्याघ्राजिन खांद्यावरी । घेओनि कमंडलू करी । योगमुद्रा सदा ॥५१॥ मस्तकी सुवर्णाचे लिंग । पादुका चरणी चांग । चंदन सुगंध सर्वांग । तया तळी वास त्याचा ॥५२॥ ऋग्वेदाचे उच्चारण करी । बैसे तरी वज्रासना वरी । चंद्रमोळेश्वराचे करी । अखंड ध्यान ॥५३॥ तयासी सिंहाचे वाहन । इच्छा शक्तिने वर्तन । दर्शन स्पर्शने जोवा शिवपण । तात्काळ देतुसे ॥५४॥ ऐसा तो महा सिद्ध । पूर्व दिशी असे प्रसिद्ध । शिवाचारासी अग्रगण्य निबध्ध । रेवणसिद्ध तो ॥५५॥

तद्वन्मरुळसिद्धस्य वटक्षेत्रे महत्तरे ॥
सिद्धेशलिंगे जननं स्थानमुज्जयिनीपुरे ॥ ११ ॥

तैसेचि वट क्षेत्री अवतार होता । चरणी पावन झाली क्षिप्रामाता । उद्भव सिद्धेश लिंगी तत्वता । सिंहासन उज्जयिनी पुरी ॥५६॥ ते मरुळाचार्य विख्यात । शिवादेशे करोनि मर्त्य लोकांत । वीरशैव धर्मा संरक्षित । महा ज्ञानी जाण तो ॥५७॥ त्याचा दक्षिण दिशी मठ असतु । चिद्गमरुळसिद्ध महा महंतू । ज्ञान सूर्य जैसा भासतू । चिद्गगनीचा ॥५८॥ निर्विकल्प दशे असत । तया पिशाच वृति आवडत । मन उन्मनि समोहित । संतुष्ट सदा ॥५९॥ तो

कोणाचे अश्रमा नवजाय | कोणाचें शास्त्रा न पाहे | कोणाचे संगी न राहें | क्षणभरी तो ||६०|| कपिलेश्वराचे करी ध्यान | यजुर्वेदाचे उच्चारण | गोभेद लिंगाचे पूजन | वटाचें वृक्षी वास करी ||६१||

वामदेव मुखोत्पन्नो दारूकः परिकीर्तितः ।।
तन्नाममल्ळाराध्यः सूत्रं तस्य तु वृष्टिकम् १२

वामदेव मुखापासुन | झाले दारुकार्य उत्पन्न | वृष्टी सुत्राधिकारी पूर्ण | नाने मल्ळाराध्य प्रसिद्ध ||६२||

तस्य दण्डश्च पालाशो तथा ताम्रकमण्डलुः ।।
गकारोबीजमंत्रश्च शाखा दारुक ईरिता ।।१३।।
कलशस्तस्य ताम्रश्च मृगाजिनविभूषणः ।।
तस्य कंथा च मांजिष्टा लक्षणं नदा गोत्रिणां ।।१४।।

अमलाक्ष लिग अवधारी |मृगाजिन खांद्यावरी | समीप तांब्याची खापरी | तया सत्य शरणासी ||३६|| रुद्राक्षमाळा कंठी शोभती | व्याघ्र वाहन तया प्रति | जप मयुरासनी करीति | मरुळ सिद्ध ते ||६४|| क्रिया ज्ञान शक्ति धरोन | भूचरी मुद्रा गुरुचे ध्यान | नेत्र वेधी ऐसी सिध्दि जाण | तया पासी असे ||६५|| म कार अक्षरी समाधी | चर्चिली विभूति ब्रम्हावबोधी | मस्तकी जटा योग सिद्धि | चरणा लागती तयाच्या ||६६||पळसाचा दंड हाती| ताम्र कलशाची

दिव्य दीप्ती । कंथा आरक्त स्थिति । असे जया गुरुवर्या ॥६७॥ ऐसी मरूळसिध्द मुनीची । भूषणे निरोपिली तयाची । निराश निराभिमान अविद्येची । वार्ता तेहि तेथ नाही ॥६८॥ अखंड निमग्नत्व असे । आनंदे कुल्लतु पिशाच्च दशे । भाग्यदशे जया भेटतसे । तया आपणा ऐसे करी ॥६९॥ तो जरी अदृष्टे पाहे कोणाकडे । तरि त्यास ब्रम्हांड भांडार उघडे । तात्काळ वस्तु होओनि मिडे । वस्तुचि साजो ॥७०॥ गंगा सागरा शरण गेली । ती मिळोनि सागरचि झाली । परतोनी नाही आली । ठेली सागरूचि ॥७१॥ तेवि जे संता शरण गेले । ते मिळणी तद्रूपचि झाले । पुनः नरदेहा नाही आले । होओनि ठेले परब्रम्ह ॥७२॥ म्हणोनि महंत मरूळसिद्ध । शरणागता करी ब्रम्हबोध । शिवाचारासी प्रसिद्ध । तारक कृपाळू ॥७३॥

एकोरामस्य जननं द्राक्षारामे प्रकीर्तितम् ॥
रामनाथमहालिंगे तद्वासस्तु हिमालये ॥१५॥

आता तिसरा आचार्य एकोराम । तो ज्ञान भानू परब्रम्ह । निरक्षर निरामय निःसीम । निष्काम तो ॥७४॥ द्राक्षाराम क्षेत्र प्रसिद्ध । तेथे रामनाथलिंग असे सिद्ध । तेथ उद्भवला सुबुद्ध । एकोरामाराध्य तो ॥७४॥ हिमालयी क्षेत्र केदार । उषा मठ असे अति सुंदर । तेथे वास करी निरंतर । आचार्य गुरु ॥७६॥ तो आचारासी तरी अग्रगण । शिवाचारासी तो संपन्न । जयासी वंदिली वीरशैव गण । सातशे सतरो

**||७७||बसवादी प्रमथ सकळ | नमिती जयाचें चरण कमळ | तोएकोराम आचार शील | शिवाचारी मुख्य ||७८||**

मदघोरमुखोत्पन्नः शंकुकर्णेति नामतः ।।
एको रामेति तन्नाम तस्य सूत्रं तु लंबकम् ।।१६।।
ब्राह्मो दण्डस्तथा लौहः कलशश्च कमंडलूः ।।
नीलकंथा तथाऽवासः पारिजाततरोरथः ।।१७।।

शिव म्हणे गिरीजा सुंदरी | अघोर मुखाभितरी | शंकुकर्ण ते अवधारी | आचार्य वर अवतरले ||७९|| तयाचे नांव एकोराम | सर्व जीवाचे विश्राम धाम | लंबक सूत्राधिकारी परम | गोत्र भृंगी जयाचे ||८०|| तो शिवाचा अवतार | मुखी सामवेदाचा उच्चार | मणिमय लिंग निरंतर | पूजितसे ||८१|| तो द्वापारी अवतरला | वैराग्य पीठिका मिळे त्याला | पश्चिम दिशी मठ शोभला | पालाश दण्ड करी धरी ||८२|| सदा महेश्वर ध्यानी असत | पारिजातकी वास निभ्रांत | बैसका गरुडासनी शोभत | तया महासिद्धासी ||८३|| मस्तकी जटा पांच शोभत | सर्वांगी विभूति उघळत | श्रवणी कुंडले ढाळ देत | भानु प्रभा जैसी ||८४|| लिंग मुद्रा कंठी तत्वता | रत्न कंबळाची मिरवे कंथा | रुद्राक्ष माळा पवित्रता | हृदयावरी शोभती ||८५||मंत्र शक्ति वसे जिव्हाग्री | नासाग्री ध्यान तो धरी | लोह खापरी धारण करी | कलश तो हि लोह मय ||८६||

शिकारो बीजमंत्रश्च अतिवर्णाश्रमे रतः ॥
शाखा शंकुकर्णाख्या लक्षणम् भृंगीगोत्रिणाम् ॥१८॥

शिकार मंत्र बीजाक्षर | अखंड ध्यानी निरंतर | सदातन्मय मुनीश्वर | एकोराम तो ||८७|| अति वर्णाश्रमी वर्तत | शाखा शंकुकर्ण विख्यात | सामवेद विभागी असत | तेचि उपदेशी स्वशिष्या ||८८|| अमृत संजीवनीचे असे ध्यान | तयासी गजाचे वाहन | शिवाचारी असे संपन्न | महा महंत तो ||८९|| सत्य तेचि बोलणे | निःसंग निराश असणे | परि पंचक्रियेने वर्तने | काम नाही अंतरी ||९०|| ऐसा तो महा महंतु | शिवाचार युक्त समर्थु | जयाच्या सत्तेने चालतु | शिवाचार रत्न ||९१||

सुधाकुंडाख्यसुक्षेत्रे लिगे श्रीमल्लिकार्जुने ॥
जननम् पंडितार्यस्य निवासः श्री गिरौ शिवे ॥१९॥

सुधाकुंड नाम क्षेत्री जाण | मल्लिकार्जुन महालिंगातुन | प्रगटले आचार्य पूर्ण | पंडितार्य गुरुवर ||९२|| निवास केला तो अति निर्मळ | गिरीराज राज तो श्री शैल | तयाचिया दर्शने कलिमल | नष्ट होती सर्वथा ||९३||

तत्तपुरुषमुखोत्पन्नो धेनुकर्णेति नामतः ॥
तन्नाम पंडिताराध्य मुक्तागुच्छम् तु सूत्रकम् ॥२०॥

तत्पुरुष मुखा पासून | धेनुकर्ण आचार्य उत्पन्न | शिवारामीची

गुढ खुण । तुज निरोपिली ओ देवी ॥९४॥ तो चौथा आचार्य महासिध्द । जो शुध्द स्वानुभवी स्वतः सिध्द । नामे पावन प्रसिध्द । पंडिताराध्य स्वामी ॥९५॥ मुक्तागुच्छ सूत्रा चा अधिपति । महामुनि जया वंदिती । उपसूत्रे द्वादश असती । तया आचार्या जाणावे ॥९३॥

सूर्यसिंहासनाधिशो दण्डो वंशमयः शुभः ॥
राजतः कलशः प्रोक्तः तथैव च कमंडलुः ॥२१॥

उत्तर दिशी सूर्य पीठीमठ । वास तरी वंश वृक्षी सुभट । भोगलिंग तव वरीष्ठ । सर्व लिंगामाजी ॥९७॥ आचार्य तो तारक अवतार । स्वानुभवी ज्ञान भास्कर । शिवाचार तारा वया कलिभिजर । उदय झाला आराध्य भानू ॥९८॥ तो तद्रुप सदाशिव । शिवाचारा निःसंदेह देव । संदेह कल्पना सर्व वाव । केवळ चिद्रुप तो ॥९९॥ भोगेश्वराचे ध्यान करी । करी रूप्याचि खापरी । अरुढे हंस वाहनावरी । आराध्य तो ॥१००॥ कंद मूलाचा प्रसाद करी । प्राक्तनानुसार अन्न स्वीकारी । अखंड ध्यान अंतरी । गुरुलिंगाचे ॥१०१॥

वकारो मंत्र बीजं च श्रुतिराथर्वणी शुभाः ॥
श्वेत कंथा तु संप्रोक्ता लक्षणं नंदीगोत्रिणां ॥२२॥

व कार बीज महा तेजाळ । जैसा सहस्त्र विजुचा मेळ । तो जगत असे सर्व काळ । रावो सकळ सिद्धांचा ॥१०२॥

अथर्वण वेद उच्चारण | हृदयी शिवलिंग धारण | कंठे लागी पट्टवस्त्र पूर्ण | शोभले शूभ्र ||१०३|| ऐसा कलि-युगी अवतार | पंडिताराध्य महा मुनिश्वर | तेणे वाढविला शिवाचार | शिवभक्त तो ||१०४|| तया शिवा वाचून दुसरे | आन देवो देवी नसे साचारे | गुरूलिंग जंगमी ऐक्य विचारे | वर्ते सदाचारी ||१०५|| शिवमुद्रा अलंकृत भूषण | शोभे जैसा प्रकाशला भान | भक्ति सुधास्तव निर्गुण तो सगुण | होओनि अवतरला ||१०६|| मस्तकी जटा शोभती | सर्वांगी मिरवे विभूति | कर्णी कुंडले ढाळ देती | निज तेजाकार ||१०७|| गुरु लिंग जंगम भजन | सांगे सकळा एक विधान | आसनी श्वेत कंबळासन | पद्-मासनी बैसका तया ||१०८|| गुरु लिंग जंगम एक भावना | अभेद भावे धरी ध्याना | परकाय प्रवेश याहि खुणा | जाणतु असे तो ||१०९|| परकाय प्रवेश हे नवल काय | अष्ट महासिद्धि वंदिती पाय | चाऱ्ही मुक्ति आलिया न पाहे | मुक्तिचा साक्ष म्हणोनि ||११०|| शिवाचारी शिव भक्त | दीक्षा देवोनि तारिले बहुत | पंच कलश नेमस्त | स्थापोनिया ||१११|| दीक्षावंत गुरुकरजात | करोनिया शुद्ध शिवभक्त | ऐक्य दाओनि गुरु लिंग जंगमात | तिर्थ प्रसाद सेवविती ||११२|| ऐसा शिवागमी विचार | तो विस्तारला अपार | कल्याणी अवतरला बसवेश्वर | शिवाचार संपन्न ||११३||

काश्याम् विश्वेश्वरे लिंगे विश्वाराध्यस्य संभवः ॥
स्थानम् श्री काशिकाक्षेत्रे श्रुणु पार्वति सादरम् ॥२३॥

विश्वाराध्य विश्वगुरु । काशीक्षेत्री पिठाचारु । धरी विश्वेशलिंगी अवतारु । अन्न जना कारणे ॥११४॥

ईशानाख्यमुखोत्पन्नो विश्वकर्णेति विश्रुतः ॥
विश्वाराध्यस्तु तन्नाम सूत्रस्यात् पंचवर्णकम् ॥२४॥

माझे ईशान मुखापासोन । विश्वकर्णाचा अवतार जाण । विश्वाराध्य नाम पूर्ण । समर्थ गुरु ॥११५॥ तयाचे सूत्र पंचवर्ग । पांचवा शिवगण अभिन्न । वीरशैव प्रवरोत्पन्न । असे जाण विश्वार्य तो ॥११६॥

दण्डो बिल्वजः प्रोक्तः सुवर्णस्य कमंडलुः ॥
कल्पशस्तस्य सौवर्णः आसनम् स्वर्णकंबलम् ॥२५॥
ज्ञानसिंहासनम् दिव्यम् मंत्रबीज य कारकम् ॥
कथा ऽपि पीतवर्णास्यालक्षणम् स्कंदगोत्रिणाम् ॥२६॥

हा पांचवा आचार्य सुजान । ऐके याचे स्वरूप गुण । दिशे मध्ये उर्ध्व जाण । श्रेष्ठ महिमान असे त्याचे ॥११७॥ वास बिल्व वृक्षातळी साचार । तोचि दण्ड धारण करी निरंतर । खापरी करी सादर सोनियाची ॥११८॥ कंथा तोहि स्वर्ग कंबळ । व्याघ्रांबर धारण केले तेजाळ । सुवर्ण सुखासन विशाळ । वाहनी असे ॥११९॥ ज्ञान पिठी जंगम मठ । सर्व ज्ञानियां ते वरिष्ठ । उपदेशी शिवतत्त्व श्रेष्ठ । विश्व–

गुरु तो ॥१२०॥ स्वछंदे वर्ते गुरुराज । जग तारावया निर्व्याज । मुनिरूप धरोनि सहज । शिवचि आला ॥१२१॥ पूजन करी विश्वेश्वराचे । ध्यानी मनी तोचो नावे । य कार अक्षर बीजाचे । उचचारी मुखे ॥१२२॥ चिन्मय तो गुरु मुर्ति । तूर्यातीत आहे वसती । तेचि उपदेशी सहज स्थिती । परमहंस योगिया ॥१२३॥ मस्तकी शोभे जटा मुकूट । हृदयावरी रूद्राक्ष माळा वरिष्ठ । भस्मोध्धुळित देह सुभट । तेजे जैसा गभस्ती ॥१२४॥ आनंद वनी असे वास । तोहि सदा आनंदमय सावकाश । शिवानंदामृतरस । श्रोतृ द्वारे ओपि भक्ताते ॥१२५॥ ईश्वर म्हणे पार्वति प्रति । हे आचार्य अवतरले भू वरती । सूत्रे प्रगटली पूर्ण स्थिती । वीरशैवा कारणे ॥१२६॥ ऐसी पंचाचार्यांची स्थाने । तुज निरोपिली वरानने । माहेश्वराची मुळ स्थाने । असती जाण पांच ती ॥१२७॥ पांच आचार्य पांच मठ । हे कथिले गुह्य स्पष्ट । जे विरशैव शिवाचर-निष्ठ । ते हे जाणती खुण ॥१२८॥ चहुयुगी आचार्य जाहले । जना शिवभक्तिसी लाविले । सातशे सतरगणी निवडले । शिवाचार मार्गी ॥१२९॥ बसवादि प्रमथ गण । सातशे सतर असती नेमून । येऱ्हवी असती जाणे कोण । गणाची संख्या ॥१३०॥ शिवगण रूद्रगण अमरगण । शिवागमी वर्णिले असंख्य जाण । गण गणिता वेद श्रुति पूराण । मौन धरोनि राहिले ॥१३१॥ मा मी काय वर्णू

महिमा तयाची । अगाध महिमा शक्ति खुंटली वाचेची । अनंत कोटी गणना गणांची । तेथ मी काय वर्णू ॥१३२॥ एका चौकडियाचे गण । गणित केले गणून । परि अनंत चौकडियाचें जाले ते कवण । गणितसे ॥१३३॥ कृत त्रेंता युग द्वापार । कलियुगा सहित युग चार । या चहु युगाची चौकडी साचार । एक जाहली ॥१३४॥ ऐश्या चौकडचा एक सहस्त्र होती । तव अस्तमाना जाय गभस्ती । तैश्या चौकडचा एक सहस्त्र होती । तव एक दिवस होय ब्रम्हो-याचा ॥१३५॥ ऐसे तीस दिवस जाती । एक मास होय विधात्या प्रति ॥ ऐसें द्वादश मास होती । तव होय एक वरुष ॥१३६॥ ऐसे वरूषे जाती एक शत । तव ब्रम्हीयास होय अंत । त्याच्या आयुष्याचे सरे गणित । तव घटिका विष्णूची ॥१३७॥ ऐसीया घटिका साठ जाती । तव एक दिवस विष्णु प्रती । ते हे तीस दिवस जाती । तै एक मास विष्णुचा ॥१६८॥ ऐसे मास द्वादश होती । तरी एक वरुष होय विष्णु प्रती । ऐसे वरुष शत जाती । तदा विष्णु एक पडे ॥१३९॥ ऐसे द्वादश विष्णु जाती । तव अर्धपळ होय रुद्राप्रती । त्या रुद्राचे गण सांगावे किती । कोणी गगना करोनि ॥१४०॥ अनंत युगाचे महारुद्र । गणहि अनंत यु-गाचे अपार । जैसा देव तैसे भक्त साचार । जेवि देहा आत्मा असे ॥१४१॥ एसे युगानुयुगीचे गण । सांगे ऐसा आहे कोण । म्हणोनि संक्षेपे याचे प्रमाण । सातशे सतर

निरोपिले ||१४२|| या वेगळे सप्त कोटी | ते असती कैलास कपाटी | विचित्र रुपे विकटी | बहुविध तयांची |१४३| येऱ्हवी असंख्यात गण | नाम घेता उरे कोण | ते माझे पूज्यमान | मज पूजिती ते ||१४४|| तें मज पूज्य मी पूजी तयासी | अणुमात्र भेद नाही तया मजशी | म्हणोनि पुजोजें सद्भावेसी | तरि ते मीच होय ||१४५|| शिव आणि शिव गण | कदापि भिन्न नोहे जाण | शिवाचार विचारीसंपन्न | शिवगण सावध सदा ||१४६|| ऐसी शिवाचार दीक्षा जाण | पंचाचार्य करिती संपन्न | शिवाचारातें स्थापून | जना भक्ति लाविती ||१४७|| इति श्री परम रहस्य सारामृत | शिवगौरी संवादी वर्तत | त्याची टीका करोनि प्राकृत | कृत कृत्य मन्मथ ||१४८||

इति श्री परमरहस्ये शिवगौरी संवादे आचार्यावतार मठलक्षणादि कथनम् नाम षोडशोध्यायः ओव्या १४८ श्लोक २६

## अध्याय १७ वा

श्री गुरुवे नमः | श्री परमरहस्य ग्रंथ सुंदर | वीरशैव धर्माचे तत्व मंदीर | चतुर्दश भुवनें आणि त्रिलोक परिकर | नांदती जया माजी ||१|| की मूळ मातृका षोडश | पूर्ण झाल्या येथवर विशेष | अनक्षरा मातृका सावकाश | निरोपु आता ||२|| शिवचंद्राच्या ह्या सोळा कळा | भवदुःख | ही सतरावी जीवन कळा | तप्तजीवा [illegible] सकळा | ही सतरावी

अक्षय असे निश्चये ||३|| येथीचे जे ज्ञान | सर्व सुखासी असे कारण | म्हणोनि ठेवावे चित्त पूर्ण | श्रवणा ठाई ||४|| श्रवण मनन निजध्यासे | साक्षात् वस्तु भेटे विश्वासे | ना तरी व्यर्थ आयासे | का शिणवावे जीवाते ||५|| असो आता येथ विशेष विस्तार | करणे नलगे मजला फार | वीर श्रोते परम चतुर | तरी सुचनार्थी बोलिलो ||६|| पुनः प्रश्न करी जगदंबा | सच्चिद्रूप शिव सांबा | शिव-संस्कार मूळ स्तंभा | पुसेल ती ||७||

दे. उ. भगवन सर्व देवेश रहस्यम् परमम् श्रुतम् ।।
श्रोतुमीहे वीरशैव संस्काराणामनुक्रमः ।।१।।

जन्माद्यंतेष्टि पर्यंत | वीरशैव संस्कार समस्त | ऐकू म्हणे विश्वस्त | गिरिजा देवी शंकरासी ||८|| मूल संस्कार षोडश | त्या माजी असती मुख्य दश | त्याही माजी बहु विशेष | शिवदीक्षा जाणावी ||९|| जगदंबा म्हणे सदाशिवा | माझिया प्रश्नाते देवाधिदेवा | अनुलक्षोनि देआवा | उपदेश मज ||१०||

शि. उ. श्रृणुदेवि प्रवक्ष्यामि संस्काराणामनुक्रमः ।।
एतत् श्रुत्वा च कृत्वा च लभेत्सा भक्तिरुत्तमा ।।२।।

शिव म्हणे अंबे प्रती | तुझ्या प्रश्ने जड जीव उद्धरती | तेचि मी तुज प्रति | सांगेन आता ||११|| गर्भाधाना पासून

आघवे | संस्कार सोळा जाणावे | सांगेन आता त्याची नावे | त्यात मुख्य दहाचि ||१२||

> गर्भाधानम् पुंसवनम् सोमंतम् जातकर्म च ।।
> तन्नमकरणं चापि बहिर्निष्क्रमणम् तथा ।।६।।
> चौलकर्म तथैवोक्तम् वेदारंभो हि युक्तितः ।।
> शिवदीक्षा विवाहश्च संस्कारा दशनुख्यका: ।।४।।

गर्भाधान म्हणिजे ओटी भरण | तो पहिला संस्कार जाण | पिंड उत्पत्तिस मूळ कारण | हेचि असे ||१३|| पुंसवन संस्कार दुसरा | डोहाळे सीमंत म्हणति तिसरा | चौथियाचा असे उजियारा | जातकर्म म्हणोनि ||१५|| नामकरण पांचवा बहिर्निष्क्रमण सहावा | चौलकर्म म्हणती सातवा | करावा संस्कार हा ||१६|| वेदारंभ आठवा संस्कार | बटुसि करणे असे अनिवार | तयाविण ज्ञान प्रसार | होईल केंवि ||१७|| नववा संस्कार शिवदीक्षा | अत्यावश्यक असे वीरशैव पक्षा | त्या विण संतोष विरूपाक्षा | न होय चि सर्वथा ||१८|| दीक्षा हा जाती संस्कार | वीरशैवाचा मुख्य कुलाचार | त्या विण वर्ते जो पामर | भवि जाणावा निश्चये ||१९|| शिव दीक्षेची लक्षणे | कथिती श्रुति आगम पुराणे | सालसे निरोपिन तुज कारणे | शैल आत्मजे सुंदरी ||२०||

> दीयते ज्ञान संबंध: क्षीयते पाश बंधनम् ।।
> दान क्षपण संयुक्ता दीक्षा तेनेह कीर्तिता ।।५।।

निर्मल शिवैक्य ज्ञाने कुण | ज्या संस्कारे तुटे आशा पाश बंधन | म्हणोनि दीक्षा म्हणती त्या लागून | दान क्षपण भाव योगें ||२१|| ती दीक्षा असे त्रिविध | आंतरात्मा करावया शुद्ध | त्यांची नावे विविध | शास्त्रांतरी पाहवी ||२२||

गर्भाष्टमे कृता दीक्षा मुख्यासा षोडशावधि ॥
गौणी तदुर्ध्वमधमा वीरशैवान्वयायिनाम् ॥६॥

गर्भा पासून आठवे वरुष | मुख्य दीक्षा काल विशेष | मध्यम जाण वरूष षोडश | तया पुढे गौण ते ||२३|| जन्म झाल्या पासुन | देहस्थ लिंगाची आठवण | तीच सुदृढ परिपूर्ण | येणे संस्कारे होये ||२४|| दीक्षे लागी आचार्य आवाहन | प्रथम करावे जाण | अग्रासनी बैसवोन | पुजा करावी भक्ति बळे ||२५|| ते आचार्य म्हणसी कोण | तयाची सांगेंन मी निजखूण | ऐक तु सावध होओन | म्हणे भरे पार्वती ||२६|| षोडश अध्यायी वर्णीले शिवगण | सातशे सतर असती नेमून | ते शिवाचार मार्गी निपुण | रत असती एक निष्ठे ||२७|| तया सकळ गणा मधी | हे पांच आचार्य जाणते सुबुद्धि | तया पांचाविण दीक्षा सिद्धी | करुनये महामंत्री ||२८|| तेही चालविला शिवाचार | भू-मंडळी घेवोनि अवतार | हेंचि असती मुख्य अधार | वीरशैवा कारजे ||२९|| त्याचे साक्षित्वाचे जे कळस |

तीच त्याची प्रतिमा जाणिजेस | ते आचार्यंचि असती हा विश्वास | धरीजे शिवगणी ||३०|| चौघाचे चहु कलश जांणिजें | मध्ये श्री गुरुरायाचा बोलिजे | ऐसी पंच कलश दीक्षा घेईजे | तव गुरु करजात जाहला ||३१|| जववरी पंचकलश दीक्षा नाही | तव वरी भवीच बोलिजे पाही | तया शिवभक्ताचे ठाई लेखु नये सर्वथा ||३२|| तयासी तीर्थ प्रसाद तत्वता | देओ नये ओ सर्वथा | आचार्य साक्षी दीक्षा नसता | अनधिकारी तीर्थासी ||३३|| जव वरी तीर्थ प्रसाद नाही | तव वरी शिवभक्त नोहे पाही | कंठीचा लिंग तोहि | पाषाण जाणिजे ||३४|| का म्हणसी तरि ऐक | तीर्थ प्रसाद ते लिंगाचे जीवन सम्यक | तेणे विण लिंग निर्जीव देख | न मिळता तयासी ||३५|| कोणी म्हणती जई लिंग बांधिले | तईच तीर्थ प्रसाद अर्पिले | आता प्रतिदिनी अर्पावया काय घेतले | लिंगाचे आम्ही ||३६|| त्यासी दृष्टांत आहे एक | लक्ष देओन ऐक सम्यक | मग हा निमेल कुतर्क | मनाचा निश्चये ||३७|| जई वृक्ष उपवनी लाविले | तईच तया उदक घातिले | आता काय तया वृक्षाचे घेतलें | उदक घालावया ||३८|| मनी ऐसा वि चार करोन | वृक्षा उदक न देता जरी राहे उदासीन | तरी तया वृक्षाचे जीवन केवि वाढेल अनुदिन | याचा विवेक करावा ||३९|| तो वृक्ष कैसा फळेल | कैसें अमृत फळ देईल | मग कैची सुख संपदा होईल | न देता उदक वृक्षा

॥४०॥ तेंवि लिंगासी तीर्थ प्रसाद । न देता होईल कैसा सुखानंद । न फळेचि शिव सुख बोध । क्रिया भ्रष्ट म्हणोनि ॥४१॥ आणिक एक कवतुक । गुरु लिंग जंगम तिन्ही एक । तरि श्री गुरु तोचि लिंग देख । साक्षत्वे जालें की ॥४२॥ तरि लिंगा जे जे सुख देईजे । जे जे पत्र पुष्प वाहिजे । ते ते गुरुसी अर्पण सहजे । का आनाठाया जात ॥४३॥ ते गुरुसीच अर्पे जाणोन । मग तीर्थ प्रसादी का न करावा यत्न । प्रयत्ने करोनि जरि करि अर्पण । तरि श्री गुरु संतोषें ॥४४॥ म्हणोनि तीर्थ प्रसादी असावा नेम । नित्य नूतन धरावा प्रेम । परि आधि गुरु करावा हे वर्म । तेथेचि जाणिजे ॥४५॥ येऱ्हवी घरोघरी गुरु असती । स्वार्थार्थें बोधिती शिष्याप्रति । परि स्वानुभवे तद्रूप करिती । त्या नांव सद्गुरु ओ देवी ॥४६॥ स्वार्थी जे का असती गुरु । ते न होती भवसागर तारू । बोधिती अनेक मतांतरू । नानाविध ॥४७॥ हे गुरु नानाविध ॥४७॥ हे गुरु नाना मते दाविती । एक ते तीर्थाटना धाडिती । एक ते पाषाण पुजविती । नाना दैवते ॥४८॥ एक ते तपा धाडिती । एक ते करकमळी घालविती । एक ते धुम्रपान साधविती । पंचाग्नि ताप एक ॥४९॥ एक लौकिक कर्मे करविती । एक ते वायुसी झुंझावे घेवविती । एक तें आसनी बैसविती । म्हणती की उठोचि नको ॥५०॥ एक ते मौन धरविती । एक ते नागवेचि पळविती । एक

ते बळे सांडविती । स्त्री बालक माता पिता ॥५१॥ एक ते अन्न त्यागविती । एक ते कंदमुळें भक्षविती । एक ते कपाटी बैसविती । एक ते उर्ध्व बाहू ॥५२॥ एक ते जटा वाढविती । एक ते बोडकेचि ठेविती । एक केश लुंचछविती । नेणती कर्म पशुसम ॥५३॥ एक ते अजपात गोवविती । एक ते चक्रे भेदुन जा म्हणती । एक तिमिर दाविती । नेत्रापुढे जे चळतसे ॥५४॥ एक ते नासिकी लक्ष लावविती । एक नेत्र विकासोनि पाहा म्हणती । एक ते नेत्र झाकविती । अंतरीच पाहा म्हणोनि ५५॥ एक ते यज्ञ होम करविती । स्वर्गी अमृत पान करा म्हणती । इंद्रपद आणि रंभेवी दाविती । लोलुपता ॥५६॥ एक ते आकाशी चालविती । एक जळासनी बैसविती । अमृतपान करविती । अर्धचंद्रा पै जाऊनिया ॥५७॥ एक ती लिंग देह साधवी । दैवतांतराते भेटवी । परि ते आघवीच गोबी । दुःखदायक साधने ।५८। परि एका आत्मज्ञाना वाचुन । ते सर्वहि अकारण । जव नव्हे एक चैतन्य घन । तव सर्व साधने व्यर्थ ती ॥५९॥ ऐसी नाना साधने साधविती । ते गुरु परि सद्गुरु न होती । जे स्वये परब्रम्ह करिती । ते सद्गुरु जाणावे ॥६०॥ ऐसीया सद्गुरुसी जावे शरण । दीक्षा घ्यावी सद्भाव धरोन । नित्य प्रसाद तीर्थ सेवन । करावे क्रिया मार्गे ॥६१॥ तीर्थ ऐसा शब्द पडता कानी । न पाचारिता जावे लोटांगणी । किंकर वृत्तीने शरण जरणी । न्हान थोरा किजे सर्वा ॥६२।

मग स्वामीसी शरण रिघीजे । तीर्थी अज्ञा घेईजे । मंत्रे युक्तिने सेवीजे । विश्वास धरोनी ॥ ६३ ॥ ऐसा तीर्थ प्रसादी जो शिवगण । स्वभावें होय तयाचे दर्शन । त्याचा भव बंध होय छेदन । पुण्य पावन होय तो ॥ ६४ ॥ ऐसा जो सत्य शरणा । केवळ शिवची आपण । तो अनंत ब्रम्हांडें व्यापुन । अलिप्त असे ॥६५॥ तया त्रिभुवनीचे राज्य देता । थुंकोनि सांडी सर्वथा । इंद्रपदासी हाणी लाथा । मा राज्याची आवडी धरील काय ॥६६॥ तो समुळ क्रियेसी अकर्ता । निष्काम बुद्धि निरहंता । अष्टमहा सिद्धी पाया लागता । श्लाघ्यता न घे ॥६७॥ अमृत पान करीत असता । कांजीं अपेक्षा न करी सर्वथा । तेवि वस्तु सुख भोगीत असता ।इंद्रपदादिक इच्छिल काय ॥६८॥ म्हणोनी निराश निर्वासना । निःसंग आणि निष्कामना । निर्गुण अतित त्रिगुणा । शुध्द सत्वात्मक तो ॥६९॥ निर्द्वंद्व निजानंद । भेद नाही ऐक्य बोध । जे जे दिसे ते ते सच्चिदानंद । आन पदार्थ दिसे ना भासे ॥७०॥ तो सदा शिव सर्व पाहे । परी पाहता हेतु न राहे । अनायासे होओनी राहे । सर्वज्ञ तें ॥७१॥ मी सर्वज्ञ ऐसा । आठऊ न होय तया स्वयं प्रकाशा । आठव न आठव दोहीच्या विलासा । साक्षी तो जाहला ॥७२॥ साक्ष जरी म्हणावा । तरि कांही पदार्थ असावा । मग साक्षी व्हावा । पदार्थाचा ॥७३ ॥ जरी पदार्थचि नाही । मा साक्षीत्व मिरविल कांही । या लागी कांही न होओनी

पाही। पाहाता पाहणारा तो ॥७४॥ तोचि परब्रम्ह मुर्ति। शुध्द जंगम बोलिजे तया प्रति। तयाचे दर्शन मात्रे मुक्ति। ओळगंती ओ देवी ॥७५॥ मुक्ति दास्य करीती हें नवल काय। तो कृपा दृष्ठीने जरी पाहे। तरि आपुले देत आहे। स्व स्वरुपजे ॥ ७६ ॥ तो सद्भावाचा भोक्ता। सद्भावे शरण जाता। जन्म जन्मांतरीची व्यथा। सकळ हरीतु असे ॥७७॥ ते कृपेंचे सागर। त्यांची कृपा आम्हा निरंतर। ओळंगो त्याचे चरण सादर। स्वहिता लागी ॥७८॥ स्वहित जरि म्हणसी कोण। तरी तयाचेनि शिवपण। मज शिव म्हणावया कारण। त्याचिया संयोगे ॥७९॥ ऐसे ते जे महा महंत। पुजिमसे मी निभ्रांत। ते मजलागी दैवत। मी भक्त तयाचा ॥८०॥ विचारिता मी तोचि जाण। बाहिर वेषाचे पालटण। ज्ञानिये जाणती खुण। भेदाते सांडोनिया ॥८१॥ शिव म्हणे गिरीजेसी। तु माझे स्वरुप अससी। शरिर भावे भेदासी। रुप जाहले ओ देवि ॥८२॥ एकचि बहू रुपिया आपण। बहुरुपे आला घेओन। परि तो बहुरुपिया-चि आन। नाही दुसरा ॥ ८३ ॥ तैसाची मी आपण। अनंतरुपें नटलो जाण। परि रुपा अरुपा साक्षी होओन। निराळाची असे की ॥८४॥ निराळा परि मी जाण। जागतु असे आपण। जाण पणा लागुन। जाणता तो मी ॥ ८५ ॥ ऐसा जो मीमज लागी। भेटी घेणे आहे निजांगी। तरी या ग्रंथा लागी विसंबू नये ॥८६॥ ऐसे पार्वतीने ऐकोनी

वचन । तद्रुप झाली आनंदघन । मनी तन्मय होऊन । तटस्थ ठेली ॥८७॥ मग येओनी देहावरी । उठोनी साष्टांग नमस्कार करी । म्हणे मज भेटविले त्रिपुरारी । स्वामीनाथा करुणानिधे ॥८८॥ महापुरी वाहत जाता । अवचित कृपाळु काढीं दाता । तैसे तुम्ही स्वामी समर्था । तारियले आते ॥८९॥ चरणा लागे वेळोवेळा । धन्य धन्य स्वामी जाश्वनीळा । बरवे निरोपिले प्रांजळा । माझिये आवडी सारिखे ॥९०॥ हा परमरहस्य ग्रंथ जे पाहाती । ते शिवरुप स्वये होती । ब्रम्हस्वरुप स्वये पार्वती । निश्चये जाण ॥९१॥ जे शिवाचे शिवभक्त । सदा आचारी दीक्षावंत । जे जाहाले गुरुकरजात । तिही हा ग्रंथ परिसावा ॥९२॥ भविसी श्रवण न करवावा । हा शिवाचारी शिवभक्ति ऐकावा । ऐकोनी जीवी धरावा । तैसाची करावा आचारू ॥९३॥ हा ग्रंथ होता श्रवण । इंद्रिये होती प्रवीण । मार्ग कळती आचरण । आचरावया ॥९४॥ आता असो कथन फार । परमरहस्य ग्रंथ विस्तार । पार्वती प्रति ईश्वर । वारंवार सांगतसे ॥९५॥ त्याचे सार या ग्रंथाचे ठाई । वर्णिले असे सतराध्यायी । अज्ञजना आचारा विषयी । आरसा जाण पाहावया ॥९६॥ हा ग्रंथ तरि ईश्वर मुखीचा । ईश्वर तोचि नागेश साचा । भिन्न भेद म्हणता ब्र.चा । दुखंड होय ॥९७॥ तोचि तो अवतरोन । नागेश नाम भिधान । मिरवे एवढीयाने म्हणुन । भेद जाहला कायी ॥९८॥ जैसे सुवर्ण

सोनेपणें | क्षणभरी मिरवले गेंटाभिधानें | तरि वाळीजे काय सोनेपणे | नोहे म्हणोनिंया ||९९|| या लागी शिव तोचि नागेश्वरु | तोचि बसवराज श्रीगुरु | माणूर पट्टसिंहासनाधिकारु | असे जयासी ||१००|| त्याचिया कृपे करुन | परमरहस्याची टीका विस्तारुन | करविते जाहले आपण | श्री बसवराज स्वामी ||१०१|| मन्मथ शिवलिंग म्हणें | मज वर्दविले स्वामींनें | पावा वाजविता तयाते ऐकून | वाजविता तो निराळा ||१०२|| सूत्र धारियाचे बाहुले | ते चाले नाचें हाले | सुत्रधारियाचे नि बोलें | सुत्रधारी खेळे ज्या ज्या कळे | ते ते कळे खेळतुसे ||१०३|| म्हणोनी सुत्रधारी गुरु गोसावी | टीका करवीली बाहुली करवी | येथे मज मी पणाची पदवी | नुरेची सर्वथा ||१०४|| या लागी ग्रंथ करता श्रीगुरुनाथ | तोचि वदला ग्रंथार्थ | शिवगणी परिसावा प्रीत्यर्थं | म्हणे मन्मथ कर जोडोनि ||१०५| हा असे प्रसादी ग्रंथ जाण | याचें करी जो नित्य पारायण | तयाची भव व्याधि चुके मरण | अमर होय सत्य पैं ||१०६|| ज्याचा लिंगी नाही विश्वास | जे अन्य धर्माचे बनले दास | त्याचा स्पर्श न करावा ग्रंथास | अधर्मि जाण म्हणोनी ||१०७|| जे विश्वासे भावे वाचिती | ते संसार सुख भोगोनि अंति | पावती सायुज्य मुक्ति | धन्य नर तेचि पैं ||१०८|| जे दुर्जन निंदक खळ | तया नावडे ग्रंथ रसाळ | रंभा फल त्यागुनि अर्की फळ | आवडी जाण वेचितसे ||१०९||

कि दुग्ध सांडोनिया जाण | प्राशी मद्याते जाऊन | की दुर्दैवी नेत्र बांधुन | द्रव्य घटा ओलांडी ||११०|| विश्वासे जे श्रवण करिती | तयाच्या सर्व व्याधि नासती | पठण करिता धनाढ्य होती | किर्ति वाढे आपार ||१११|| पुत्र इच्छा धरोनी मनी | तत्पर होती पारायणी | तयाचा वंश विस्तार सुलक्षणी | होय जाण शिव कृपे ||११२|| हा परमरहस्य ग्रंथ परिकर | वीरशैव धर्माचे बीजांकुर | भावे करिता रक्षण साचार | रक्षी शंकर तयाते ||११३|| श्रोते शिवगण समस्त | तया विनवी किंकर मन्मथ | ग्रंथ समाप्तीस आज्ञा घेत | चित्ति सद्गद होऊनिया ||११४|| कपिलाधार पुण्य धाम | तेथेचि जालो मी पूर्ण काम | टीका केली सुगम | परमरहस्याची ||११५|| शके पंधराशें बावीस | विक्रम नाम संवत्सरास | वद्य त्रयोदशी माघ मास | ग्रंथ पूर्ण झालासे ||११६|| इति श्री परमरहस्य सारामृत | शिव गौरी संवादी वर्तत | त्याची टीका करोनि प्राकृत | कृत कृत्य मन्मथ ||११७||

इति श्री परमरहस्ये हर गौरी संवादे सर्व आचार विधी निरोपणम् नाम सप्तदशमोध्याय: समाप्त: ।। श्लोक ६ ओव्या ११७ ।।

समाप्त

